


ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैव-लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ १५ वा.

# वीरशैवसदाचारसंग्रह

हा

( महाराष्ट्र तात्पर्यासह )

वेदमूर्ति, मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं सोलापूर येथें

'श्रीदत्तप्रसाद' छापखान्यांत छापवून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली प्रती २०००.

शके १८२७, सन १९०५.

( हा ग्रंथ प्रसिद्धिकर्त्यानें सर्व हक्कांसह रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांस अर्पण केला आहे )

किंमत ०।१२

# प्रस्तावना.

हा वीरशैवलिंगिब्राह्मणधर्म अनादिकालापासून चालत आला आहे. अर्वाचीन नव्हे. परंतु वीरशैवमतानुयायी लोकांची संख्या हल्लीं इतर मतानुयायी लोकांपेक्षां फार कमी आहे. कारण कलिकालमानाप्रमाणें अज्ञानाचें प्रमाण वाढत आहे. धर्मास ग्लानि आल्यामुळें, धर्मग्रंथ पाहिले नसल्यामुळें व ज्यांच्या घरांत ग्रंथ आहेत, त्यांनीं न दिल्यामुळें व धर्मगुरूनीं जितकी खबरदारी घ्यावी, तितकी घेतली नसल्यामुळें व कित्येक धर्मगुरु अध्ययनहीन असल्यामुळें व लोकांचें लक्ष्य तिकडे न गेल्यामुळें पुष्कळ लोक परधर्मांत शिरले आहेत, त्यामुळें ह्या मताची ओळख देखील कित्येकांस नाहींशी झाली आहे. अशावेळीं आपल्या धर्माचें पुनरुज्जीवन होण्यासाठीं प्रत्येक धर्माभिमानी लोकांनीं अवश्य झटलें पाहिजे. हेंच त्यांचें पवित्र व आवश्यक कर्तव्यकर्म होय. याकरितां उपाय करणें ह्मणजे योग्य धर्मोपदेशक तयार करून त्यांच्याकडून धर्मप्रसार करविणें, व पुरातन दुर्मिळ धर्मग्रंथ छापून तयार करून प्रसिद्धी करणें असे दोन उपाय धर्मजाग्रतीसाठीं प्रशस्त दिसत आहेत. त्यांपैकीं दुसऱ्या मार्गाचें अवलंबन यथाशक्ति केलें आहे. तर तें सिद्धीस नेणें ईश्वराधीन आहे. सांप्रत सुरू असलेल्या वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमालेंत १४ ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. त्याच मालेंतील हा "वीरशैवसदाचारसंग्रह" नांवाचा १९ वा ग्रंथ होय. यांतले विषय ह्मणजे—१८ जाति १०१ कुलें यांतील मानवांना पंचाचार्यांकडून लिंगधारण करवून मोक्षोपाय दर्शविणें, पंचाचार्यांच्या सूत्रगोत्रादि विशिष्टशिष्यांना ब्राह्मण्यप्रतिपादन व वेदाधिकार प्रतिपादन, पुण्याहवाचन, गर्भाधानकाल, गर्भाधानविधि, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, उपनिष्क्रमण, चौल, दीक्षाविधि, पंचाचार्यांच्या व उपाचार्यांच्या मानाच्या हक्काचें प्रतिपादन, शिष्यवर्गसंप्रदायनिरूपण, ( मठाला शिष्य करावयाचा झाल्यास कोणाचा मुलगा घ्यावा, कोणाचा मुलगा घेऊं नये याचा विचार करणें ) पुत्रवर्गसंप्रदायनिरूपण, पट्टाभिषेक कसा करावा याचा विचार, चरपतिविधान ( चरमूर्ति करावयाचा प्रकार ) चरपट्टाधिकारिलक्षण ( चरपट्टाधि-

कार कोणाला द्यावा, व कोणाला देऊं नये याचा विचार ) परजंगमलक्षण वगैरे हे होत. दशकर्मांपैकीं ९ यांत आलीं आहेतच. तरी सदर्हू विषयांचें ज्ञान करून घेणें हें प्रत्येक वीरशैवलिंगिब्राह्मणांचें आवश्यक कर्तव्य आहे, असें समजून आह्मीं हा दुर्मिळ ग्रंथ फार प्रयासानें मिळवून बुध्यनुसार शुद्ध करून छापविला आहे. या ग्रंथाचा उपयोग वीरशैवब्राह्मण आपण करून घेऊन आपल्या मित्रमंडळींनाही करून देतील ही आशा आहे. या ग्रंथाची बालबोधलिपींत महाराष्ट्रतात्पर्यासह ही पहिली आवृत्ति आहे, ही एकच प्रत सांपडल्यामुळें ताडून पाहण्यास दुसरी प्रत नसल्यामुळें कांहीं कांहीं ठिकाणीं अशुद्ध असण्याचा संभव आहे, तरी वाचकांनीं कृपा करून यांतील दोष कळविल्यास आह्मी त्यांचे आभारी होऊं, व पुढल्या आवृत्तींत ते दोष सुधारण्यास बरें पडेल. एकूण साद्यंत ग्रंथ ताडून पाहिला असतां यापुढें आणखी कांहीं याचीं प्रकरणें असावींत, असें अनुमानानें सिद्ध होतें.

हा ग्रंथ वे. मू. पारलिंग प्रभुअय्या स्वामी वार्शीकर यांनीं आपल्या संग्रहांत असलेला १९ प्रकरणाचा पाठविला. याबद्दल त्यांचे आह्मी आभारी आहों.

या ग्रंथाचे महाराष्ट्रभाषेंतील तात्पर्य रा. रा. गंगप्पा सुगप्पा रेगळ सोलापूरकर यांनीं केलें आहे.

शुद्धिपत्रक, विषयानुक्रमणिका, प्रुफें तपासणें वगैरे कामांत वे. शा. सं. रंगाचार्यशास्त्री मुधोळकर यांनीं मदत केली आहे. याबद्दल या सर्वांचे आभारी आहोंत.

---

# विषयानुक्रमणिका.

# संस्कृत शुद्धिपत्रक.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २ | १० | नालमयलिंगं | नीलमयलिंगं |
| ८ | २ | बजिश्च | बीजश्च |
| २० | ९ | सत्र | सूत्र |
| २१ | १७ | शतभुक | शतभुक् |
| २२ | १४ | तत्सृत | तत्सूत्र |
| २६ | १ | षष्ट | षष्ठ |
| ६० | १० | विज्ञान | विज्ञानं |
| ६६ | १३ | तदा चरण | तदाचरण |
| ७० | ९ | वक्रदंताय | वक्रदंताय |
| ७१ | १२ | तुष्ट्वाऽसः सनूभिः ॥ व्यसेम | तुष्टुवाऽसस्तनूभिर्व्यशेमहि |
| ७१ | १६ | हरिश्चंद्रःश्रीशै | हरिश्चंद्रश्रीशै |
| ७३ | ९ | ह्यस्मास्त्वावेशो | ह्यस्मान्त्स्त्वावेशौऽ |
| ७३ | १० | यत्वे महि | यत्त्वेमहे |
| ७३ | १० | जुषस्व॥ | जुषस्व |
| ७३ | १० | शन्न एधि | शन्नो भव |
| ७७ | १ | पुण्याहवाचनकथनम् | गर्भाधानकालः |
| ८० | ३ | प्रमान् | पुमान् |
| ८० | ४ | इवेषुर्धिं | इवेषुर्धिं॥ |
| ८२ | ७ | गिरिशं ताभि | गिरिशंताभि |
| ८३ | १ | प्रशंशा | प्रशंसा |
| ८४ | ११ | शिष्ट्या निति | शिष्टानिति |
| ८६ | १२ | वावृत्या | वावृत्त्या |
| ८७ | ६ | अन्नपतन्न | अन्नपतेन्न |

# मराठी शुद्धिपत्रक

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | १९ | उप्तन्न | उत्पन्न |
| २ | १४ | असलेल | असलेले |
| ४ | २० | धरिलें | धरिला |
| २१ | २९ | कशेराक्ष | केशराक्ष |
| २५ | ९ | वृक्षामध्यें | वृक्षांमध्यें |
| २६ | १४ | वरिशैवनंद० | वीरशैवानंद० |
| २७ | २९ | ज्याच्या | ज्याची |
| ३० | २८ | उत्पतीला | उत्पत्तीला |
| ३१ | ३१ | दह | देह |
| ३९ | २० | लक्षणः | लक्षण |
| ३९ | २५ | पडतील | घडतील |
| ४२ | २२ | प्राणालिंग | प्राणलिंग |
| ४८ | १८ | मूर्तिच्या | मूर्तीच्या |
| ५२ | २३ | मस्ताकाशी | मस्तकाशीं |
| ५६ | १९ | लिंगाचीच आव्हान विसर्जन वगैरे पूजा त्यानें करावें. | लिंगांत आवाहन विसर्जन करूं नये. |
| ५९ | २१ | हृदयांतालि | हृदयांतील |
| ५९ | ३२ | आव्हान | आवाहन |
| ८७ | २८ | सोड | सोडतो |

# विनंति.

उपयुक्त अशा वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखितप्रति कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांचेकडे पाठवून देण्याची मेहरबानी करावी; ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व धर्मोन्नतीच्या कामीं यथाशक्ति हातभार-लावल्याचें श्रेयही मिळेल. त्या ग्रंथाचें काम संपतांच त्यांची मूळ-प्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं. आपली मूळप्रत पर-त मिळेल किंवा नाहीं याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मू-ळप्रत परत मिळण्याविषयीं इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग-आमचेकडे ग्रंथ पाठविण्याचें करावें.

प्रसिद्धिकर्ता.

## छापत असलेले ग्रंथ.

१ बसवेश्वरपुराण ( व्यासकृत ).
२ सिद्धांतशिखामणि.
३ वीरशैवाचारप्रदीपिका.
४ शिवपुराण वायवीयसांहिता.
५ संक्षिप्तविवाहविधि.
६ अनादिवीरशैवसारसंग्रह.

वरील ग्रंथ मराठी अर्थासह लौकरच तयार होतील.

विक्रीस तयार असलेलें १४ ग्रंथ सार्वजनिकसंस्थांमध्यें सर्व वर्गास हे आमचे ग्रंथ वाचण्यास मिळावे अशा हेतूनें ग्रंथाची किंमत निम्मी ठेविली आहे. लाय-ब्ररीच्या सेक्रेटरींनीं किंवा मठाच्या अधिकाऱ्यांनीं पुस्तकाची मागणी करावयाची झाल्यास वरील संस्थांना पाहिजे आहे, निम्म्या किंमतीनें पाठवा असा खुलासा पत्रांत करावा.

ॐ

॥ श्रीगणेशाय नमः ॥

## ॥ अथ श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहः प्रारभ्यते ॥

॥ तं प्रणम्य महादेवं सांबं त्रैलोक्यरक्षकम् ॥ वक्ष्ये श्रीवीरशैवानां सदाचारस्य संग्रहम् ॥ १ ॥ पाशुपत्यादितंत्रेषु श्रीमदाचारकौस्तुभे ॥ तदादिकेषु ग्रंथेषु विविच्य कथितोऽत्र वै ॥ २ ॥ ( वीरशैवप्रकाशिकायाम् ) पाशुपत्यादितंत्रेषु प्रतिपाद्यं सदाशिवम् ॥ संप्रणम्य प्रवक्ष्यामि वीरशैवप्रकाशिकाम् ॥ ३ ॥ ॥ गद्यम् ॥ इह खलु परमकारुणिको विराड्रूपः परंज्योतिर्निर्विकारो निराकारः परशिवः स्वांशभूतान् ब्रह्मविष्णुमहेश्वरान्सम्यगुत्पाद्य तत्र परमाप्ततमं सदाशिवमाकार्य तं प्रतीत्थमुपादिशत् ॥ किमिति ॥ पदार्थौ द्विविधः ॥

---

अर्थः- ॥ १ ॥ त्रैलोक्याचें संरक्षण करणाऱ्या महादेवाला पार्वतीसुद्धां नमस्कार करून वीरशैवांचे सगळे सदाचार सांगतों ( २ ) पाशुपत्य वगैरे तंत्रें, प्रसिद्ध आचारकौस्तुभ, इत्यादि ग्रंथांतून निवडून काढून यांत आचार सांगितले आहेत. ( वीरशैव प्रकाशिका ) ( ३ ) पाशुपत्य वगैरे तंत्रांतून ज्याचें प्रतिपादन केलें आहे त्या सदाशिवाला नमस्कार करून वीरशैवप्रकाशिकाग्रंथ मी सांगतों. ( गद्य ) या सृष्टींत अत्यंत दयाळू, विराट्स्वरूपी, परंज्योतिःस्वरूपी निर्विकार आणि निराकार अशा परमात्म्यानें आपल्या अंशापासून ब्रह्मा, विष्णु व महेश्वर यांना योग्य रीतीनें उत्पन्न करून, त्या तिघांपैकीं अधिक योग्यतेच्या महादेवाला बोलावून त्याला पुढील आज्ञा केली. ती अशीः— " पदार्थांचे दोन प्रकार आहेत. एक स्वतंत्र व दुसरा अस्वतंत्र. त्यांत * स्वतंत्र असा मीच तेवढा आहें. अस्वतंत्र पदार्थांचा † सचेतन व अ-

---

* स्वतंत्र ह्मणजे ( उत्पत्ति, स्थिति व लय इत्यादि कोणत्याही बाबतींत ) ज्याच्यावर दुसऱ्याचा अंमल कोणत्याही प्रकारें चालत नाहीं व जो वाटेल तें करण्याला समर्थ आहे तो.

† सचेतन ह्मणजे सजीव, जसें मनुष्यें, पशु वगैरे; अचेतन ह्मणजे निर्जीव जसें दगड, पर्वत, वगैरे.

स्वतंत्रोऽस्वतंत्रश्चेति तत्र स्वतन्त्रो ह्यहमेव अस्वतंत्रश्चेतनोऽचेतनश्चेति द्विविधः ॥ तत्रापि चेतनो नित्यमुक्तनित्यसंसारिभेदाद्विविधः ॥ तत्र वीरनंद्यादयस्तथैकाक्षरादयः प्रमथगणांताश्चेतना नित्यमुक्ताः नित्यसंसारिणस्तु सृष्टिस्थित्यन्तकर्तारो ब्रह्मविष्णुमहेश्वरादयो मनुष्यान्ताः ॥ तान् सर्वान् मन्मुखोद्भूताष्टाविंशत्यागमेषु असुरमोहकवेदविरुद्धान्दशोपागमान् विहाय सकलवेदार्थनिर्णायकाष्टादशसदागमोक्तप्रकारेण मम सद्योजातादिपंचमुखोद्भूतैः कृतयुगे एकाक्षरद्व्यक्षरत्र्यक्षरचतुरक्षरपंचाक्षर इति नामसमेतैः पंचाचार्यैः ब्रह्मादिसर्वदेवतागणान् नीलमयलिंगं धारयित्वा पंचाक्षरीमंत्रमुपदिश्य मोक्षमार्गं प्रदर्शय ॥ त्रेतायां एकवक्त्रद्विवक्त्र

---

चेतन असे दोन भेद आहेत. त्यांत सचेतन पदार्थांचेही दोन वर्ग आहेत: एक नित्यमुक्त व दुसरा नित्यसंसारी त्यापैकीं वीर नंदी वगैरे व एकाक्षर वगैरे प्रमथगणांपर्यंत असलेले ‡ नित्यमुक्त होत. उत्पत्ति, स्थिति आणि लय करणारें ब्रह्मा, विष्णु व महेश्वरापासून मनुष्यापर्यंत सगळे * नित्यसंसारी होत. त्या सगळ्यांना माझ्या मुखांतून निघालेले अठ्ठावीस आगमांमध्यें राक्षसांना मोह घालणारे व वेदविरुद्ध असलेले दहा उपागम खेरीज करून सर्व वेदांच्या अर्थाचा ज्यांत निर्णय केला आहे अशा अठरा उत्तम आगमांत सांगितलेल्या प्रकारानें माझ्या सद्योजात व पांच मुखांतून उत्पन्न झालेल्या एकाक्षर, द्व्यक्षर, त्र्यक्षर, चतुरक्षर, व पंचाक्षर अशीं ज्यांचीं नांवें आहेत, त्या पंचाचार्यांकडून ( पांच आचार्यांकडून ) कृतयुगामध्यें ब्रह्मादि सर्व देवांना नीलमय ( नीळमण्याचें केलेल्या ) लिंगाचें धारण करवून, पंचाक्षरी मंत्राचा उपदेश करून मोक्षाचा मार्ग दाखीव. त्रेतायुगांत एकवक्त्र, द्विवक्त्र,

---

‡ नित्यमुक्त ह्मणजे जन्म मरणाच्या तडाक्यांतून सुटलेले असून सदोदित मुक्त स्थितींत असणारे.

* नित्यसंसारी ह्मणजे रोज संसार करणारे. ब्रह्मा, विष्णु व महेश्वर यांचें उत्पन्न करण्याचें, संरक्षण करण्याचें व संहार करण्याचें काम रोज चालू आहे. तें कधींही बंद पडत नाहीं. हें काम करणें हाच त्यांचा संसार असल्यामुळें व तो ते रोज करीत असल्यामुळें त्यांना नित्यसंसारी ह्मटलें आहे. व मनुष्यें ही उत्पत्तिस्थितिलयाच्या चक्रांत सांपडत असल्यामुळें त्यांनाही नित्यसंसारी नांव आलें आहे.

त्रिवक्त्रचतुर्वक्त्रपंचवक्त्र इति नामसमेतैस्तैरेव पंचाचार्यैः कौशिककश्यपवसिष्ठादीन् ऋषिगणान्सर्वान्मनुष्यान्यक्षगंधर्वकिन्नरानपि सर्वान् रत्नमयलिंगं धारयित्वा पंचाक्षरीमंत्रमुपदिश्य मोक्षमार्गं प्रदर्शय ॥ द्वापरे रेणुकदारुकशंखुकर्णधेनुकर्णविश्वकर्णेति नामसमेतैस्तैरेव पंचाचार्यैः षोडशमहाराजान् हरिश्चंद्रनलपुरुकुकुत्सपुरूरवादीन् तथैव राक्षसगणान् सर्वानपि वज्रमयलिंगं धारयित्वा पंचाक्षरमुपदिश्य मोक्षमार्गं प्रदर्शय ॥ कलियुगे रेवणाराध्यमरुळाराध्यएकोरामाराध्यपंडिताराध्यविश्वाराध्य इति नामसमेतैस्तैरेव पंचाचार्यैः ब्रह्मक्षत्रियवैश्यशूद्रप्रमुखानष्टादशजातीनेकशतकुलजान्मनुष्यान् शिलामयलिंगं धारयित्वा पंचाक्षरमुपदिश्य मोक्षमार्गं प्रदर्शय इति साक्षात्परंज्योतिः परशिवः कार्यरुद्रमुपादिशत् ॥ तदुक्तक्रमेणैव प्रवर्तनशीलो महादेवः पार्वतीं प्रतीत्थमभाषत ॥ श्लोकः ॥ श्रीमत्कैलासशिखरे भासमानं निरा-

---

त्रिवक्र, चतुर्वक्र, पंचवक्र, या नांवाच्या त्याच पंचाचार्यांकडून विश्वामित्र, कश्यप, वसिष्ठ वगैरे ऋषींना, सगळ्या मनुष्यांना, व यक्ष, गंधर्व, किन्नर या सगळ्यांना रत्नमय ( रत्नाचें ) लिंग धारण करवून पंचाक्षरी मंत्राचा उपदेश करून मुक्तीची वाट दाखीव. द्वापारांत रेणुक, दारुक, शंखुकर्ण, धेनुकर्ण, विश्वकर्ण या नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या त्याच पंचाचार्यांकडून हरिश्चंद्र, नळ, पुरु, कुकुत्स, पुरूरवा इत्यादि सोळा श्रेष्ठ राजांना, त्याचप्रमाणें सगळ्या राक्षसांना वज्रमय लिंगधारण करवून, पंचाक्षरीचा उपदेश करून मोक्षाचा मार्ग दाखीव. कलियुगांत रेवणाराध्य, मरुळाराध्य, एकोरामाराध्य, पंडिताराध्य व विश्वाराध्य या नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या त्याच पचाचार्यांकडून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश व शूद्र इत्यादि अठरापगड जातीच्या व शंभर कुळांत उत्पन्न झालेल्या मनुष्यांना पाषाणाचें लिंगधारण करवून पंचाक्षरीचा उपदेश देऊन मोक्ष मिळविण्याचा मार्ग दाखीव.” याप्रमाणें केवळ ज्योतिःस्वरूप साक्षात् परमात्म्यानें कार्यरुद्राला ( निराकार परमात्म्याच्या अंशापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेव वगैरे तिघांपैकीं महादेवाला ) आज्ञा केली. त्या आज्ञेला अनुसरून चालणाऱ्या महादेवाचा पार्वतीशीं असा संवाद झाला. ( ४ ) सुंदर अशा कैलास पर्वताच्या शिखरावर रत्नखचित

मयम् ॥ रत्नसिंहासने सम्यगारूढं च सदाशिवम् ॥ ४ ॥ त्रिलोचनं चतुर्बाहुं तडित्कोटिसमप्रभम् ॥ अमितादित्यसंकाशं शुद्धस्फटिकसन्निभम् ॥ ५ ॥ नीलग्रीवं शशांकांकं खड्गखट्वांगधारिणं ॥ नागयज्ञोपवीतं च व्याघ्रचर्मोत्तरीयकम् ॥ ६॥ कमण्डलुधरं देवमक्षमालाविभूषितम् ॥ वरदाभयहस्तं च नमज्जनफलप्रदम् ॥ ७ ॥ वृषोपरि समारूढमुमादेहार्धधारिणम् ॥ दुर्दन्तं कपिलजटं शिखामध्ये तु धारिणम् ॥ ८ ॥ अमृतेनार्पितं हृष्टं दिव्यभोगसमन्वितम् ॥ दिग्देवतासमायुक्तं सुरासुरनमस्कृतम् ॥ ९ ॥ नित्यं च शाश्वतं शुद्धं ध्रुवमक्षरमव्ययम् ॥ सर्वव्यापिनमीशानं रुद्रं वै विश्वरूपिणम् ॥ १० ॥ एतादृशं महादेवं गिरिजा समभाषत ॥ भगवन् प्रष्टुमिच्छामि ममागः क्षन्तुमर्हसि ॥ ११ ॥ ब्रह्मविष्णुमहेशानां मध्ये कः प्रवरो भवेत् ॥ कः सर्वज्ञः स्वतंत्रः को जगत्स्रष्टा च को भवेत् ॥ १२ ॥

---

सिंहासनावर उत्तम रीतीनें बसलेले, तेजस्वी, निष्कलंक, नेहमीं कल्याण करणारे, ( ५ ) ज्यांना तीन डोळे व चार बाहु आहेत, ज्यांची कांति कोट्यवधि विजांप्रमाणें, अगणित सूर्याप्रमाणें ( प्रकाशमान ) व शुद्ध स्फटिकाप्रमाणें ( पांढरी ) आहे, ( ६ ) ज्यांचा गळा ( विष प्याल्यामुळें ) काळसर आहे, चंद्राला ज्यांनीं धारण केलें आहे, तलवार, खट्वांग हीं शस्त्रें ज्यांच्या हातांत आहेत, सर्पाचें ज्यांनीं यज्ञोपवीत केलें आहे, वाघाचें कातडें ज्यांनीं पांघरण्याचें वस्त्र केलें आहे. ( ७ ) ज्यांनीं कमंडलु धरिलें आहे असें देव रुद्राक्षमाळांनीं शोभणारे, ( भक्ताला ) वर देण्याकरितां व अभय देण्याकरितां ज्यांचा हात तयार आहे, शरण आलेल्या भक्ताचे मनोरथ पूर्ण करणारे, ( ८ ) नंदीवर बसलेले, ज्यांचा अर्धा देह पार्वतीनें व्यापिला आहे, ज्यांनीं मस्तकावर पिंगट जटा धरिल्या आहेत, जे पूर्ण जितेंद्रिय आहेत, ( ९ ) अमृत ज्यांच्याकडे अर्पिलें गेलें आहे असें स्वर्गांतील ऐश्वर्य भोगणारे, दिशांच्या देवता ज्यांच्याजवळ आहेत, देव व दैत्य ज्यांना नमस्कार करतात, ( १० ) जे नित्य, शाश्वत, शुद्ध, अढळ, नाशरहित, परिपूर्ण, सर्व ठिकाणीं भरलेले, व विश्वरूप आहेत, ईशान व रुद्र हीं ज्यांचीं नांवें आहेत, ( ११ ) अशा प्रकारचे जे महादेव त्यांना पार्वती ह्मणाली:—"भगवन्, अपराधाची क्षमा असावी. मला कांहीं विचारण्याची इच्छा आहे. ( १२ ) ब्रह्मदेव, विष्णु व महेश्वर या तिघांमध्यें श्रेष्ठ कोण? या तिघांत सर्वज्ञ

जगत्पालनशीलः को जगतामन्तकश्च कः ॥ किमर्थं च जगत्सृष्टं कः कः कं कमसीसृजत् ॥ १३ ॥ एवं गिरिजया पृष्टः किंचिद्धास्यमुखः शिवः ॥ समाचक्षे पुरावृत्तं पाशुपत्यागमोदितं ॥१४॥ ईश्वर उवाच ॥ अहमेव परं ब्रह्म निर्गुणश्च निराकृतिः ॥ अप्रमेयोऽप्यमेयात्मा निरालंबो निराकुलः ॥ १५ ॥ निष्किंचनश्च निर्वैरोऽप्यवाङ्मानसगोचरः ॥ विराड्रूपः स्वरमणः स्वतंत्रः सर्ववित्स्वयम् ॥ १६ ॥ परंज्योतिःस्वरूपस्य मम भेदो न विद्यते ॥ तेनैव संयुतः सोऽहमसृजं सुरयूथपान् ॥ १७ ॥ अन्यान्मनून्वसूंश्चैव सृष्टवान् गणदेवताः ॥ विद्याधराप्सरोयक्षरक्षोगंधर्वकिन्नरान् ॥ १८ ॥ पिशाचान् गुह्यकान् सिद्धान् दनुजेंद्रानसीसृजम् ॥ मूलरूपेण संसृष्टा मुखतो ब्राह्मणा इमे ॥ १९ ॥ बाहुभ्यामथ राजन्यानूरुभ्यां वैश्यसत्तमान् ॥ पद्भ्यां शूद्राश्च संसृष्टा मनसा मृगलांछनः ॥ २० ॥ अक्षणोर्दिवाकरश्चैव इंद्राग्नी मुखतश्च मे ॥

---

कोण? स्वतंत्र कोण? जगाला उत्पन्न करणाराकोण? ( १३ ) जगांचें संरक्षण करणारा कोण? जगांचा संहार करणारा कोण? कशा करितां जगाची उत्पत्ति करण्यांत आली? कोणी कोणीं कोणाकोणाला उत्पन्न केलें?" ( १४ ) असें पार्वतीनें विचारिल्यावरून किंचित् हंसून महादेव पाशुपत्य आगमांत सांगितलेली पूर्वीची हकीकत पार्वतीला सांगतात. ( १५ ) ईश्वर ह्मणतात:— "परब्रह्म तें मीच आहें. मी निर्गुण ( गुणांपासून आलिप्त ) निराकार ( ज्याला आकार नाहीं असा) फार अगाध असून अतर्क्य स्वरूपाचा, दुसऱ्यावर अवलंबून न राहणारा शांत, ( १६ ) कशांत न मिसळणारा, निर्वैर व वाणी आणि मन यांच्या आटोक्यावाहेरचा, विराट्स्वरूपाचा, आपल्याच ठायीं ( आत्मस्वरूपांत ) आनंद पावणारा, स्वतंत्र, स्वयं सर्वज्ञ, ( ज्यानें ज्ञान दुसऱ्यापासून घेतलेलें नसून स्वप्रकाशित आहे. ) ( १७ ) परंज्योतिःस्वरूपाचा आहें. माझ्या ठिकाणीं भेद नाहीं. या स्वरूपांत असतांनाच मी मोठमोठ्या देवांना उत्पन्न केलें. ( १८ ) तसेंच मनु, वसु व गणदेवता, यांना मीं उत्पन्न केलें. विद्याधर, अप्सरा, यक्ष, राक्षस, गंधर्व, किन्नर, ( १९ ) पिशाच, गुह्यक, सिद्ध, व मोठमोठे दैत्य यांनाही मींच उत्पन्न केलें. माझ्या मूल स्वरूपाच्या मुखापासून हे ब्राह्मण उत्पन्न झाले; ( २० ) भुजांपासून क्षत्रिय, मांड्यांपासून उत्तम वैश्य व पायांपासून शूद्र उत्पन्न झाले. मनापासून चंद्र, ( २१ ) डोळ्यांपासून सूर्य, मुखापासून इंद्र व अग्नि, माझ्या प्राणापासून वायु, व

प्राणाद्वायुः समुत्पन्नो नाभ्यां चैवान्तरिक्षकम् ॥ २१ ॥ शीर्षेणैव द्युलोकश्च पादाभ्यां भूमिरेव च ॥ श्रोत्राद्दिशः समुत्पन्नास्तथा लोकानसीसृजम् ॥ २२ ॥ सत्वतः सुरमुख्यांश्च ऋषींश्चापि तपोधनान् ॥ रजोगुणाच्च राजन्यान् तमसोऽप्यसुरानपि ॥ २३ ॥ समाहारान्मानवांश्च मदंगेभ्यस्तथा परे ॥ अष्टादशकुलान्येकशतसंख्यकुलान्यपि ॥ २४ ॥ तत्र संसारिणः केचिन्नित्यमुक्ताश्च केचन ॥ मम पंचमुखानीति संजानीहि वरानने ॥ २५ ॥ सद्योजातं च प्रथमं वामदेवं द्वितीयकम् ॥ अघोरं च तृतीयं तु तत्पुरुषं च चतुर्थकम् ॥ २६ ॥ ईशानं पंचमं प्रोक्तं मुखानि मम सर्वशः ॥ तान्याननानि गोत्राणि वेदोक्तानि न संशयः ॥ २७ ॥ वीरो नंदी वृषश्चैव भृंगी स्कंदस्तथैव च ॥ मत्स्वरूपाः समुत्पन्नाः पंचगोत्राधिकारिणः ॥ २८ ॥ रेणुको दारुकश्चैव शंकुकर्णश्च धेनुकः ॥ विश्वकर्णश्च पंचैते पंचगोत्रसमुद्भवाः ॥ २९ ॥ एतेषां प्रतिनामानि युगभेदेन च शृणु ॥ एकाक्षरो द्व्यक्षरश्च त्र्यक्षरश्चतुरक्षरः ॥ ३० ॥ पंचाक्षरः कृतयुगे पंच नामानि सर्वशः ॥ एकवक्त्रो द्विवक्त्रश्च त्रिवक्त्रश्चतुरा-

---

नाकपुड्यांपासून आकाश, ( २२ ) मस्तकापासून स्वर्गलोक, पायांपासून पृथ्वी, आणि कानांपासून दिशा उत्पन्न झाल्या. त्याचप्रमाणेंच भुवनें मीं उत्पन्न केलीं. ( २३ ) सत्वगुणापासून मुख्य मुख्य देव व तपोधन ऋषि, रजोगुणापासून क्षत्रिय आणि तमोगुणापासून असुर मीं उत्पन्न केलें. ( २४ ) मनुष्यांचे समूह, त्याचप्रमाणें त्यांच्या अठरा जाती व शंभर कुळें माझ्या शरीरापासूनच झालीं. ( २५ ) त्यांमध्यें कांहीं संसारी आहेत व कांहीं नित्यमुक्त आहेत. हे सुंदरि, माझीं पांच मुखें हीं आहेत असें जाण:— ( २६ ) पहिलें सद्योजात, दुसरें वामदेव, तिसरें अघोर, चौथें तत्पुरुष, ( २७ ) व पांचवें ईशान अशीं हीं पांच मुखें सर्वांना माहीत आहेत. हीं मुखेंच वेदांत सांगितलेलीं गोत्रें होत यांत संशय नाहीं. ( २८ ) वीर, नंदी, वृषभ, भृंगी व स्कंद हें पांच माझ्याच स्वरूपाचे गोत्राधिकारी उत्पन्न झाले. ( २९ ) रेणुक, दारुक, शंकुकर्ण, धेनुक व विश्वकर्ण हे पांचजण ( वरील ) पांच गोत्रांपासून झालें. ( ३० ) प्रत्येक युगायुगाला यांना वेगळीं वेगळीं नांवें आलीं आहेत, तीं ऐक. एकाक्षर, द्व्यक्षर, त्र्यक्षर, चतुरक्षर, ( ३१ ) व पंचाक्षर हीं पांच नांवें सगळ्या कृतयुगांत या पांच जणांना होतीं.

ननः ॥ ३१ ॥ पंचवक्त्र इति ख्यातस्त्रेतायां तु महेश्वरि ॥ द्वापरे रेणुकश्चेति दारुकश्च द्वितीयकः ॥ ३२ ॥ तृतीयः शंकुकर्णश्च चतुर्थो धेनुकर्णकः ॥ पंचमो विश्वकर्णाख्यः पंच नामानि वै शृणु ॥ ३३ ॥ रेवणो मरुळश्चैकोरामः पंडित एव च ॥ विश्वाराध्य इति प्रोक्तः कलावपि मम प्रिये ॥ ३४ ॥ वीरशैवमतोद्धारहेतवे पंचमानपि ॥ मन्मुखेभ्यः समुत्पाद्य तैरेवाकार्षमंजसा ॥ ३५ ॥ तेषां नामानि गोत्राणि सूत्रदण्डकमण्डलून् ॥ मंत्रबीजं च प्रवरं शाखां कंथां च वर्णकम् ॥ ३६ ॥ प्रत्येकं च प्रवक्ष्यामि प्रतिनामानि च शृणु ॥ सद्योजातमुखोत्पन्नो रेणुकः परिकीर्तितः ॥ ३७ ॥ तन्नाम रेवणाराध्यः सूत्रं पडिवडीत्यपि ॥ अतिवर्णश्च वर्णः स्यात्प्रवरैकाक्षरो मतः ॥ ३८ ॥ दण्डोऽश्वत्थ इति प्रोक्तो हरिद्वर्णः कमण्डलुः ॥ नकारो मंत्रबीजश्च शाखा रेणुक ईरिता ॥ ३९ ॥ तस्य कंथा हरिद्वर्णा लक्षणं वीरगोत्रिणां ॥ वामदेवमुखोत्पन्नो दारुकः परिकीर्तितः ॥ ४० ॥ तन्नाम मरुळाराध्यस्तस्य सूत्रं च वृष्टिकम् ॥ अतिवर्णश्च वर्णः स्यात्प्रवरो द्व्यक्षरो

---

एकवक्त्र, द्विवक्त्र त्रिवक्त्र, चतुरानन, ( ३२ ) व पंचवक्त्र, अशीं नांवें त्रेतायुगांत यांना होतीं. हे पार्वती, द्वापारांत पहिला रेणुक, दुसरा दारुक, ( ३३ ) तिसरा शंकुकर्ण, चौथा धेनुकर्ण व पांचवा विश्वकर्ण अशीं नांवें पडलीं तीं लक्ष्यांत ठेव. ( ३४ ) प्रिये कलियुगांत देखील रेवण, मरुळ, एकोराम, पंडिताराध्य, व विश्वाराध्य या नांवाचे गोत्राधिकारी ( ३५ ) पांचजण वीरशैवमताचा उद्धार करण्याकरितां मी माझ्या मुखांपासून उत्पन्न करून त्यांजकडूनच तें कार्य ( वीरशैव मतोद्धाराचें ) लवकर करविलें, ( ३६ ) त्यांचीं नांवें, गोत्रें, सूत्र, दण्ड, कमंडलु, मंत्रबीज प्रवर, शाखा, कंथा व वर्ण ( ३७ ) हीं एकेक नांवानांवाला वेगळीं वेगळीं सांगतों ऐक. सद्योजात मुखापासून रेणुक उत्पन्न झाल्याचें सांगितलें आहे. ( ३८ ) त्याचेंच कलियुगांतील नांव रेवणाराध्य असून सूत्र पडिवडी असें आहे. त्याचा वर्ण अतिवर्ण व त्याचा एकाक्षर प्रवर होय. ( ३९ ) त्याचा अश्वत्थ दण्ड, पीत ( पिंवळा ) कमंडलु, नकारमंत्रबीज रेणुक शाखा, ( ४० ) व त्याची पीतकंथा; हीं वीरगोत्र्यांचीं लक्षणें झालीं ( गात्र वीर होय. ) वामदेव मुखापासून दारुक उत्पन्न झाला आहे. ( ४१ ) त्याचें नांव कलियुगांतील मरुळाराध्य,

मतः ॥४१॥ पालाशस्तस्य दण्डोऽभूत्ताम्रस्य तु कमण्डलुः ॥ मकारो मंत्रबीजश्च शाखा दारुक ईरिता ॥ ४२ ॥ कलशस्तस्य ताम्रस्य वामदेवमुखं तथा ॥ तस्य कंथा तु मांजिष्ठा लक्षणं नंदिगोत्रिणाम् ॥ ४३ ॥ अघोराख्यमुखोत्पन्नः शंकुकर्ण इतीरितः ॥ एकोरामेति तन्नाम तत्सूत्रं मुक्तगुच्छकम् ॥ ४४ ॥ प्रवरस्त्र्यक्षरस्तस्य वर्णःस्यादतिवर्णकः ॥ न्यग्रोधस्तस्य दण्डोऽभूल्लोहस्त्वस्य कमण्डलुः ॥ ४५ ॥ शिकारो मंत्रबीजश्च शाखा तु शंकुकर्णका ॥ कलशस्तस्य लोहःस्यादघोरमुखमीरितम् ॥ ४६ ॥ तस्य कंथा च कापोतीचिन्हं वृषभगोत्रिणाम् ॥ तत्पुरुषाख्यमुखोत्पन्नो धेनुकर्णेति विश्रुतः ॥ ४७ ॥ तन्नाम पंडिताराध्यस्तस्य सूत्रं तु लंबकम् ॥ अतिवर्णश्च वर्णः स्यात् प्रवरश्चतुरक्षरः ॥ ४८ ॥ दण्डस्तस्य तु वैणुःस्यात्कांश्यस्य च कमण्डलुः ॥ वाकारो मंत्रबीजश्च शाखा तु धेनुकर्णका ॥ ४९ ॥ कलशस्तस्य कांश्यस्य तत्पुरुषमुखमीरितम् ॥ तस्य श्वेतमयी कंथा लक्षणं भृंगिगोत्रिणाम् ॥ ५० ॥ ईशानाख्यमुखोत्पन्नो विश्वकर्णेति विश्रुतः ॥ विश्वाराध्येति तन्नाम तत्सूत्रं

---

वृष्टिक सूत्र, अतिवर्ण वर्ण, द्व्यक्षर प्रवर, ( ४२ ) पलाश ( पळसाचा ) दंड ताम्र कमंडलु, मकारमंत्रबीज, दारुक शाखा. ( ४३ ) ताम्र ( तांब्याचा ) कलश, वामदेवमुख व मांजिष्ठ ( तांबडी ) कंथा ही नंदिगोत्र्यांचीं लक्षणें झालीं, ( गोत्र नंदी होय ). ( ४४ ) अघोर मुखापासून शंकुकर्ण उत्पन्न झाला. एकोराम हें त्याचें ( कलियुगांतील ) नांव, मुक्तगुच्छ सूत्र, ( ४५ ) त्र्यक्षर प्रवर, अतिवर्ण वर्ण, न्यग्रोध ( वडाचा ) दण्ड, लोह कमंडलु, ( ४६ ) शिकार मंत्रबीज, शंकुकर्ण शाखा, लोह ( तांबूस ) कलश व अघोर हें त्याचें मुख होय. ( ४७ ) आणि त्याची कपोत ( कपोतासारख्या वर्णाची ) कंथा होय. हीं वृषभ गोत्र्यांचीं लक्षणें होत ( गोत्र वृषभ होय ). धेनुकर्ण या नांवानें प्रसिद्ध असलेला तत्पुरुषमुखापासून उत्पन्न झाला. ( ४८ ) पंडिताराध्य हें त्याचें ( कलियुगांतील ) नांव त्याचें लंबक सूत्र, अतिवर्ण वर्ण, चतुरक्षर प्रवर, ( ४९ ) वेणु ( वेळूचा ) दण्ड, कांस्य ( कांशाचा ) कमंडलु, वाकार मंत्रबीज, धेनुकर्ण शाखा, ( ५० ) कांस्य ( कांशाचा ) कलश, तत्पुरुष मुख, व श्वेतमय कंथा हीं भृंगिगोत्र्याचीं लक्षणें झालीं ( गोत्र भृंगी होय ). ( ५१ ) विश्वकर्ण हा ईशान नांवाच्या मुखापासून उत्पन्न झाला. विश्वाराध्य हें त्याचें कलियुगांतील नांव, पंचवर्ण हें

पंचवर्णकम् ॥ ५१ ॥ पंचाक्षरश्च प्रवरो वर्णः स्यादतिवर्णकः ॥ दण्डो वैल्व इति प्रोक्तः सौवर्णश्च कमण्डलुः ॥ ५२ ॥ यकारो मंत्रवीजश्च शाखा तु विश्वकर्णका ॥ कलशस्तस्य सौवर्णं ईशानं मुखमीरितम् ॥ ५३ ॥ तस्य कंथा च सौवर्णा लक्षणं स्कंदगोत्रिणां ॥ त एतेऽप्युपसूत्राणां गुरवः परिकीर्तिताः ॥ ५४ ॥ चरस्थापनपट्टाभिषेकेषु शुभकर्मसु ॥ तथैवानुग्रहे चैव निग्रहेऽपि मम प्रिये ॥ ५५ ॥ आव्हाने च विसर्जे च मम पंचमुखोद्भवाः ॥ रेणुकाद्याश्च गुरवः स्वस्वगोत्रानुसारतः ॥ ५६ ॥ यस्मान्मन्मुखसंजाताः स्वतंत्राश्चेति विश्रुताः ॥ तेभ्यो ये वै समुत्पन्ना द्वादशैवोपसूत्रकाः ॥ ५७ ॥ अमुख्या अस्वतंत्रा वै महाचार्यानुगाश्च ते ॥ सर्वेषां गोत्रसूत्राणि भिन्नानि हि वरानने ॥ ५८ ॥ एकैकस्य च गोत्रस्य शाखासूत्रादिकं पृथक् ॥ यस्य गोत्रस्य या शाखा यत्सूत्रं यः कमण्डलुः ॥ ५९ ॥ या कंथा यश्च दण्डश्च गुरुस्तैश्च समन्वितः ॥ एवमेव हि पंचानां गोत्राणां गुरवःस्मृताः ॥ ६० ॥ स च पीठा-

---

त्याचें सूत्र, ( ५२ ) पंचाक्षर प्रवर, अतिवर्ण वर्ण, विल्वदण्ड, सुवर्ण कमंडलु, ( ५३ ) यकारमंत्रवीज, विश्वकर्णशाखा, सुवर्णकलश, ईशानमुख, ( ५४ ) व सुवर्ण कंथा, ही स्कंद गोत्र्यांचीं लक्षणें सांगितलीं ( गोत्र स्कंद होय ). उपसूत्रांचे हे ( वर सांगितलेले पांचजण ) गुरु होत. ( ५५ ) चरमूर्तींचें स्थापन करण्याच्या कामीं, पट्टाभिषेकाच्या कामीं व इतर शुभकर्मांमध्यें, त्याचप्रमाणें अनुग्रहाच्या कामांत ( शिष्यांना उपदेश देण्याच्या कामांत ), शिक्षा देण्याच्या कामांत, तसेंच प्रिये, माझ्या ( ५६ ) आव्हान विसर्जनाच्या कामांत माझ्या पांच मुखांपासून उत्पन्न झालेले रेणुक वगैरे पांचजण आपापल्या गोत्रानुसारानें गुरु होत. ( ५७ ) माझ्या मुखांपासून उत्पन्न झालेले सगळे आचार्य स्वतंत्र आहेत ह्मणून सांगितलें, परंतु त्यांपासून (त्या महाचार्यांपासून) जे वारा उपसूत्रक उत्पन्न झाले, ( ५८ ) ते मुख्य नसून आणि स्वतंत्र नसून महाचार्यांना अनुसरणारे आहेत ( मुख्य आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें वर्तणारे आहेत ). हे सुंदरि, सगळ्यांचीं गोत्रें आणि सूत्रें वेगवेगळीं आहेत ( ५९ ) प्रत्येक गोत्राची शाखा व त्याचें सूत्र वगैरे वेगळें आहे. ज्या गोत्राची जी शाखा, जें सूत्र, जो कमंडलु, ( ६० ) जी कंथा, व जो दंड असेल त्यांनीं ( त्या दंड, कमंडलु, सूत्रादिकांनीं ) युक्त असेल तो त्या गोत्राचा गुरु होय. याचप्रमाणें पांचही गोत्रांचे गुरु जाणावेत. ( ६१ ) तोच

धिकारी स्यादाराध्यश्च स एव हि ॥ आचार्यश्च स एवायं सिंहासनपतिश्च सः ॥ ६१ ॥ एतानि पंच नामानि पंचानां सूत्रिणां पृथक् ॥ महासूत्रस्य चैकस्य चोपसूत्राणि द्वादश ॥ ६२ ॥ तेषामप्युपसूत्राणां पृथङ्नामानि संति हि ॥ सिंहासनपतित्वं च नास्तितेषां कदाचन ॥ ६३ ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे सुप्रभेदागमोक्तवीरशैवप्रकाशिकोक्तानुसारेण आचार्योत्पत्तिकथनं नाम प्रथमं प्रकरणं समाप्तम् ॥ १ ॥.

---

( गुरु ) पीठाधिकारी, तोच सेवा घेण्याला योग्य, तोच आचार्य व तोच सिंहासनाचा अधिकारी होय. ( ६२ ) पांच सूत्रांचीं हीं पांच वेगळीं नांवें सांगितलीं. ( यांतील ) प्रत्येक महासूत्रांचीं बारा बारा उपसूत्रें आहेत. ( ६३ ) त्या उपसूत्रांचींही वेगळीं नांवें आहेत. परंतु त्यांना ( उपसूत्रांतील आचार्यांना ) सिंहासनाचा अधिकार मुळींच नाहीं."

याप्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील सुप्रभेदागमांत सांगितलेल्या वीरशैव प्रकाशिकेला अनुसरून लिहिलेलें आचार्योत्पत्तिकथननांवाचें पहिलें प्रकरण संपलें.



## ॥ अथ द्वितीयं प्रकरणम् ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥ सुप्रभेदागमे ॥ वीरशैवप्रकाशिकायां ॥ उपसूत्राणि लिख्यन्ते महासूत्रोद्भवानि च ॥ रेणुकस्य विलासेन पड्विडेर्द्वादशैव हि ॥ १ ॥ पुराणं पच्छकंथा च षडंगी सुरगी तथा ॥ महिषी दिगंवरश्चैव वेणी भित्तिस्तथैव च ॥ २ ॥ मोरटश्चैव नाटिश्च शौरी सुत्तूरसंज्ञकम् ॥ पड्विडेश्चैव संजातान्युपसूत्राणि द्वादश ॥ ३ ॥ दारुकस्य विलासेन वृष्टिसूत्राच्च द्वादश ॥ कार्वोन्नः स्वर्णकथा च सिंगी मसणिरेव च ॥ ४ ॥ कुठारश्च तथा भैत्री कठारश्चामरी तथा ॥ कवाटः कुक्षकंथा च ज्वलत्कंथा तथैव च ॥५॥ शृंगिश्चैते द्वादशैव वृष्टिसूत्रात्समुद्भवाः ॥ शंखुकर्णविलासेन मुक्तगुच्छाच्च द्वादश ॥ ६ ॥ गोणिकंथा तथा दन्ती जठरस्त्रिगुणिस्तथा ॥ केशकंथा ललाटश्च व्याघ्रकंथा च लोचनः ॥ ७ ॥ भगिनीजालकंथा च नटनो वोदडिस्तथा ॥ मुक्तगुच्छात्समुत्पन्नाश्चैते द्वादश विश्रुताः ॥ ८ ॥ धेनुकर्णविलासेन लंवकाद्द्वादशैव हि ॥ त्रिपुटी रज्जुकंथा च कापी भस्मी तथैव च ॥ ९ ॥ रौप्यं कौपी-

---

(सुप्रभेदागम व वीरशैवप्रकाशिका) (१) महासूत्रांपासून झालेलीं उपसूत्रें लिहितों. रेणुकाच्या लीलेनें पड्विडी या महासूत्रापासून वारा उपसूत्रें उत्पन्न झालीं. ( २ ) पुराण, पच्छकंथा, षडंगी, सुरगी, महिषी, दिगंबर, वेणी, भित्ति, ( ३ ) मोरट, नाटि, शौरी व सुत्तूर या नांवाचीं वारा उपसूत्रें पड्विडी सूत्रांपासून झालीं. ( ४ ) दारुकाच्या लीलेनें वृष्टिसूत्रापासून वारा उपसूत्रें उत्पन्न झालीं. कार्वोन्न, स्वर्णकंथा, सिंगी, मसणि, ( ५ ) कुठार, भैत्री, कठार, चामरी, कवाट, कुक्षकंथा, ज्वलत्कंथा, ( ६ ) आणि शृंगि याप्रमाणें वृष्टिमहासूत्रापासून वारा उपसूत्रें उत्पन्न झालीं. शंखुकर्णाच्या विलासानें मुक्तगुच्छ नांवाच्या महासूत्रापासून वारा उपसूत्रें झालीं. ( ७ ) गोणिकंथा, दन्ती, जठर, त्रिगुणि, केशकंथा, ललाट, व्याघ्रकंथा, लोचन, ( ८ ) भगिनी, जालकंथा, नटन व वोदडि अशीं मुक्तगुच्छसूत्रापासून वारा उपसूत्रें उत्पन्न झालीं. ( ९ ) धेनुकर्णाच्या लीलेनें लंवक नांवाच्या महासूत्रापासून वारा उपसूत्रें निर्माण झालीं. त्रिपुटी, रज्जुकंथा, कापी, भस्मी, ( १० ) रौप्य, कौपी,

चंद्रगुण्डो मृत्कंथाप्यलक एव च ॥ वसनो मुंडिखड्गी च लंवसूत्रात्समुद्भवाः ॥ १० ॥ विश्वकर्णविलासेन पंचवर्णाच्च द्वादश ॥ कंवालो वृषभश्चैव दशमुखो रज्जुकंथकः ॥ ११ ॥ वीटिः पंचमुखश्चैव गोचरो गगनं तथा ॥ मुसडी लगुडी चैव शिथिली पशुपतिस्तथा ॥ १२ ॥ पंचवर्णान्महासूत्रादुद्भूताः सर्वमंगले ॥ जाता अपि महात्मभ्यः सर्वेऽप्येतेऽस्वतंत्रकाः ॥ १३ ॥

पार्वत्युवाच

महाचार्यसमुद्भूताः कथं तेऽप्यस्वतंत्रकाः ॥ तत्र किं कारणं देव तत्सर्वं वद विस्तरात् ॥ १४ ॥

ईश्वर उवाच

मन्मुखोत्पत्तिराहित्यादस्वतंत्रा हि ये प्रिये ॥ ते सर्वे वीरशैवानां सामान्यानां पुरोहिताः ॥ १५ ॥ सामान्यवीरशैवानां दीक्षालिंगस्य धारणे ॥ उपदेशे विवाहे च गौणतो गुरवो मताः ॥ १६ ॥

पार्वत्युवाच

कथं कुर्वन्त्यस्वतंत्रा वीरशैवालयेषु च ॥ दीक्षोपदेशनं चैव लिंगधारणपूर्वकं ॥ एतद्विस्तार्य भगवन् वक्तुमर्हसि सांप्रतम् ॥ १७ ॥

---

चंद्रगुंड, मृत्कंथा, अलक, वसन, मुंडी, व खड्गी अशीं बारा उपसूत्रें लंवक सूत्रापासून झालीं. ( ११ ) विश्वकर्णाच्या लीलेनें पंचवर्ण नांवाच्या महासूत्रापासून बारा उपसूत्रें झालीं; कंवाल, वृषभ, दशमुख, रज्जुकंथा, ( १२ ) वीटि, पंचमुख, गोचर, गगन, मुसडी, लगुडी, शिथिली व पशुपति ( १३ ) अशीं हीं बारा उपसूत्रें पंचवर्णमहासूत्रापासून झालीं. उपसूत्रधारी आचार्य महाचार्यांपासून झाले तरी ते स्वतंत्र नाहींत." पार्वती ह्मणते– ( १४ ) "भगवन्, महाचार्यांपासून उत्पन्न होऊनही हे ( उपसूत्रधारी आचार्य ) अस्वतंत्र कां आहेत? याचें काय कारण असेल तें सगळें खुलासेवार सांगावें." ईश्वर ह्मणतात:—( १५ ) "प्रिये, माझ्या मुखांपासून उत्पन्न झाले नसल्यामुळें जे अस्वतंत्र आहेत, ते सगळ्या सामान्य वीरशैवांचे पुरोहित होत. ( १६ ) हे ( उपसूत्रधारी ) आचार्य ( महाचार्यांपेक्षां ) गौण असल्यामुळें ते सामान्य वीरशैवांना दीक्षा देण्यांत, लिंगधारण करविण्यांत, उपदेश देण्याचे कामीं व लग्नाचे कामीं त्यांचे ( सामान्य वीरशैवांचे ) गुरु मानिले आहेत." पार्वती ह्मणत्येः-( १७ ) "हे भगवन्, हे अस्वतंत्र उपसूत्रधारी वीरशैवांच्या घरीं लिंगधारण करवून दीक्षा कशी देतात, तें आतां कृपाकरून वि-

ईश्वर उवाच

अस्वतंत्राश्च ते सर्वे महासूत्रावलंविनाम् ॥ उपदेशानंतरं वै द्वादशाश्चोपसूत्रकाः ॥ १८ ॥ तदनुग्राहतस्तेषां गोत्रप्रवरवर्णकैः ॥ करीरमंत्रदंडाद्यैः कमंडल्वादिभिर्युताः ॥ १९ ॥ वीरशैवालयेष्वेतेऽप्यस्वतंत्रप्रवर्तकाः ॥ यतः कर्माणि कुर्वन्ते गौणतो गुरवः स्मृताः ॥ २० ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे सुप्रभेदागमोक्तानुसारेण उपसूत्र तदस्वतंत्रत्वकथनं नाम द्वितीयं प्रकरणं समाप्तम् ॥

---

स्तारानें सांगावें." ईश्वर ह्मणतातः–( १८ ) "महासूत्रधारी जे महाचार्य त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागणारे हे वारा, वारा उपसूत्रधारी महाचार्यांपासून आपण उपदेश घेतल्यानंतर ( १९ ) त्यांच्या (महाचार्यांच्या) कृपेनें त्यांचें गोत्र, प्रवर, वर्ण, कलश, मंत्र, दंड वगैरे व कमंडलु वगैरे चिन्हें धारण करितात ( २० ] आणि मग हे अस्वतंत्र उपसूत्रधारी वीरशैवांच्या घरीं ( वर सांगितलेलीं धर्मासंवंधीं ) कर्में करितात, ह्मणून यांना गौण प्रकारचे गुरु ह्मटलें आहे." या प्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील सुप्रभेदागमाला अनुसरून लिहिलेलीं उपसूत्रें व त्यांचें अस्वतंत्रत्वकथननांवाचें दुसरें प्रकरण संपलें.



## ॥ अथ गुरुद्वैविध्यकथनन्नाम तृतीयप्रकरणम् ॥

### ( सुप्रभेदागमे )

---

पार्वत्युवाच

गुरवो बहवस्संति गृहस्थानां गृहे गृहे ॥ प्रधानाः केऽप्रधानाः के विस्तराद्वद मे प्रभो ॥ १ ॥

ईश्वर उवाच

लोके गुरुत्वं द्विविधं प्राधान्याद्गौणतोऽपि वा ॥ प्राधान्येन गुरुत्वं तु मन्मुखोद्भूतपंचके ॥२॥ तेऽपि स्वदण्डकलशकमण्डलुसबीजकैः ॥ परानुपेक्ष्य कुर्वन्ति लिंगधारणपूर्वकम् ॥ ३ ॥ उपदेशे विवाहे च शिक्षायां रक्षणेऽपि च ॥ त एव मुख्यगुरवः प्रधानास्ते प्रकीर्तिताः ॥४॥ तज्जन्यसूत्रजातास्तु स्वसूत्राधिपतेस्तथा ॥ कलशान्मंत्रदण्डांश्च गृहीत्वा दंडखंडनं ॥ ५ ॥ निग्रहानुग्रहांश्चैव आव्हानं च विसर्जनं ॥ लिंगधारणदीक्षे तु विवाहं चोपदेशनं ॥ ६ ॥ परानपेक्ष्य कुर्वन्ति तत्तस्माद्गौणतश्च ते ॥ गुरुशब्देन वाच्या हि वर्तन्ते शै सु ॥७॥

---

पार्वती ह्मणतेः– ( सुप्रभेदागम ) ( १ ) ' हे प्रभो, गृहस्थांच्या घरोंघर पुष्कळ गुरु आहेत. परंतु त्यांमध्यें मुख्य कोण आहेत? व गौण कोण आहेत? हें कृपाकरून सविस्तर सांगावें.' ईश्वर ह्मणतातः– ( २ ) ' जगांत गुरु दोन प्रकारचे आहेत, एक मुख्य व दुसरे गौण. मुख्य गुरुत्व माझ्या मुखापासून उत्पन्न झालेल्या ( रेवणाराध्य वगैरे ) पांचजणांकडेमात्र आहे. ( ३ ) आपला दण्ड, कमंडलु, कलश, व मंत्रबीज धारण करून तेच दुसऱ्यांकडे लक्ष्य न देतां लिंगधारण वगैरे धर्मकर्में करितात. ( ४ ) उपदेश देणें, लग्नकार्य, शिक्षण व संरक्षण या या कामांत सर्वांशीं तेच मुख्य गुरु मानिले गेले आहेत. ( ५ ) या पांचजणांपासून झालेल्या सूत्रांत उत्पन्न झालेले आचार्य आपापल्या सूत्राधिपतींचा ( महाचार्यांचा ) कलश, मंत्र व दंड धारण करून दंडखंडन ( ६ ) शिक्षा देणें, अनुग्रह करणें, आवाहन, विसर्जन, लिंगधारण, दीक्षा, लग्नकार्य, उपदेश ( ७ ) हीं धर्मकृत्यें दुसऱ्यांकडे लक्ष्य देऊन ( महाचार्यांच्या आज्ञेनें ) करतात. ह्मणून शिवभक्तांच्या घरीं हे गौणरूपानें गुरु मानिले जातात.

इति द्वैविध्यमुदितं गुरूणां विहितं तथा ॥ तल्लीलया समुद्भूतेषूपसूत्रेषु चैव हि ॥ ८ ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे सुप्रभेदागमोक्तानुसारेण गुरुद्वैविध्यकथनं नाम तृतीयं प्रकरणं समाप्तम् ॥

---

( ८ ) याप्रमाणें महाचार्य आणि त्यांच्या लीलेनें उत्पन्न झालेलीं उपसूत्रें यांमध्यें असलेला भेद सांगितला.'

याप्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील सुप्रभेदागमांत सांगितलेल्या रीतीनें ( लिहिलेलें ) हें गुरुद्वैविध्य कथन ( गुरूचे दोन भेद सांगणें ) या नांवाचें तिसरें प्रकरण संपलें.



## ॥ अथ उपाचार्यकथनंनाम चतुर्थप्रकरणम् ॥

### ( सुप्रभेदागमे )

### पार्वत्युवाच

पंचसंख्या महाचार्याः कर्तारः पंचनामकाः ॥ इति त्वयैव कथितं पुरा मे श्रुतवत्यहं ॥ १ ॥ लोकेऽस्मिन् जगतामीश उपाचार्याश्च संति वै ॥ कौमार्यःस्तावरार्यश्च मठार्यश्च गणार्यकः ॥ २ ॥ मालार्यश्चेति विख्याताः पंचोपाचार्यनामकाः ॥ त्वयोक्ते वीरशैवाख्ये मते सर्वोत्तमोत्तमे ॥ ३ ॥ चतुर्विधप्रकाराणां शैवानां लिंगधारणे ॥ वैवाहादिकमांगल्ये पुण्यसर्वेषु कर्मसु ॥ ४ ॥ शवस्थापनश्राद्धादिकार्येष्वेतान् विना क्वचित् ॥ उपाचार्यान्वीरशैवमतोत्पन्ननृणामपि ॥ ५ ॥ गतिर्नास्ति यतो नित्यं सर्वदेशेषु शंकर ॥ सर्वकाल उपाचार्या व्यापका जगतीतले ॥ ६ ॥ शैवानां सर्वकर्माणि कुर्वन्ति नितरां प्रभो ॥ अतः के त उपाचार्याः कर्तारः प्रतिभांति हि ॥ ७ ॥ पूर्वमुक्ता महाचार्याः सिंहपीठाधिपाः किमु ॥ कर्तारः सर्वकार्येषु वीराणामथवा वद ॥ ८ ॥ उपाचार्याश्च कर्तारो महा-

(सुप्रभेदागम) पार्वती ह्मणते-( १ ) 'पांच नांवाचे पांच महाचार्य मुख्य आहेत असें आपणच पूर्वी सांगितलेले मीं ऐकिलें. ( २ ) परंतु हे जगदीशा, या पृथ्वीवर उपाचार्यही आहेत. *कौमार्य, स्तावरार्य, मठार्य, गणार्य, ( ३ ) व मालार्य ( मठपति ) अशा पांच नांवाचे पांच उपाचार्य आपण सांगिलेल्या वीरशैव नांवाच्या सर्वोत्कृष्ट मतांत आहेत. ( ४ ) चार प्रकारच्या शैवांचें लिंगधारण, लग्नादि मंगळ कार्यें, सर्व पुण्यकृत्यें, ( ५ ) प्रेतविधि, व श्राद्धादि कर्में यांमध्यें या उपाचार्यांवांचून वीरशैव मतांत उत्पन्न झालेल्या मनुष्यांचें केव्हांही ( ६ ) चालत नाहीं. ह्मणून हे शंकरा पृथ्वीतलावर हे उपाचार्य सगळीकडें सर्वकाळ व्यापून गेले आहेत. ( ७ ) प्रभो, शैवांचीं सगळीं कृत्यें बहुतकरून हेच करितात. तेव्हां हे उपाचार्य कोण आहेत? मला हेच मुख्य ( सर्व कर्में करणारे अधिकारी ) दिसतात. ( ८ ) आपण पूर्वी सिंहासनाधिपति महाचार्य सांगितले, ते वीरशैवांचीं सर्व कृत्यें करणारे मुख्य अधिकारी आहेत कीं, काय? सांगावें. ( ९ ) महाचार्यांच्या आज्ञेवरून हे उपाचार्यच धर्मकृत्यें करितात? किंवा हे प्रभो

* यांना देशभेदानें गणकुमार किंवा महंत असेंही ह्मणतात.

चार्यानुगा इमे ॥ उपाचार्यानुगास्तेषां महाचार्याः किमु प्रभो ॥ ९ ॥ किंवा दशविधानां तु समत्वं विद्यतेऽनघ ॥ एवमादिषु संदेहा मम संति कृपानिधे ॥ १० ॥ भक्तानां मुक्तिदं क्षिप्रमेतद्विस्तार्य मे वद ॥ श्रोतुं कौतूहलं चित्तं लोकसंशयकारकम् ॥ ११ ॥ इत्येवं गिरिजापृष्टः शंकरः प्रश्नमस्तुवत् ॥ तदा विस्मयमानस्तामुवाच मधुरं वचः ॥ १२ ॥

ईश्वर उवाच

जगज्जननि मत्प्राणप्रिये मंगलरूपिणि ॥ वीरशैवमतांभोधिवर्धने चंद्रसन्निभे ॥ १३ ॥ साधु पृष्टं त्वया कान्ते लोकोद्धरणहेतवे ॥ एतत्क्रमं प्रवक्ष्यामि शृणु त्वं सावधानतः ॥ १४ ॥ मद्धृदयात्समुद्भूत उपार्याख्यो मठार्यकः ॥ मम दक्षिणस्कन्धे तु समुद्भूतो गणार्यकः ॥ १५ ॥ मम वामवरस्कंधान्मालार्यस्य समुद्भवः ॥ तथा दक्षिणपादाच्च जातः स्तावरसंज्ञकः ॥ १६ ॥ पुनर्वामपदोद्भूतः कौमार्याख्य उपार्यकः ॥ एतदाख्यायुता ऽऽचार्या उपाचार्या इति श्रुताः ॥ १७ ॥ मत्सेवार्थं यथा सृष्टा पैशाचगणनायकाः ॥ विष्णुसेवाकारणार्थं

---

महाचार्य उपाचार्यांच्या मतानें हीं कर्मे करितात? (१०) किंवा हे अनघा, या दहा प्रकारच्या आचार्यांचा अधिकार सारखाच आहे कीं काय? हे दयासागरा, इत्यादि प्रकारच्या माझ्या शंका आहेत. (११) भक्तांना मुक्ति देणारी ही माहिती मला सविस्तर सांगावी. लोकांचा संशय दूर व्हावा ह्मणून शंका घेणारें माझें मन ऐकण्याला उत्सुक झालें आहे.' (१२) असें पार्वतीनें विचारल्यावर शंकरांनीं (चांगला प्रश्न विचारिला ह्मणून) तिच्या प्रश्नाची स्तुति केली. आणि हंसत हंसत मधुरवाणीनें तिला सांगूं लागले. ईश्वर ह्मणतातः–(१३) "हे जगन्माते मंगळरूपिणि, प्राणप्रिये वीरशैव मतरूपी समुद्राला भरती आणण्याला तूं चंद्रासारखी आहेस. (१४) प्रिये, लोकांचा उद्धार करण्याच्या हेतूनें तूं चांगलें विचारिलेंस. हा (तूं विचारिलेला) क्रम सांगतों, लक्ष्य देऊन ऐक. (१५) माझ्या हृदयापासून मठार्य नांवाचा उपाचार्य उत्पन्न झाला. माझ्या उजव्या खांद्यापासून गणार्य उत्पन्न झाला. (१६) माझ्या डाव्या खांद्यापासून मालार्य उत्पन्न झाला- तसेंच माझ्या उजव्या पायापासून स्तावर नांवाचा उपार्य उत्पन्न झाला. (१७) आणि माझ्या डाव्या पायापासून कौमार्य नांवाचा उपार्य उत्पन्न झाला. या या नांवांच्या आचार्यांना उपाचार्य ह्मणतात. (१८) माझी सेवा करण्याकरितां ज्याप्रमाणें पिशाच व गणाधिपति उत्पन्न करण्यास आले; वि-

शौनकादिगणो यथा ॥ १८ ॥ महीपानां च सेवार्थै परिचारिगणो यथा ॥ देशिकानां च सेवार्थै यथा शिष्या गुणाकराः ॥ १९ ॥ उपाचार्याश्च तद्वत्तु महाचार्येषु सेवकाः ॥ मन्मुखोद्भूतपंचार्याः पंचपीठाधिपास्तथा ॥ २० ॥ त एव वीरशैवानां प्रशस्यन्तेऽधिकारिणः ॥ मद्रूपा अतएवैषामुपार्याः सेवका मताः ॥ २१ ॥ ग्रामाचार्या उपाचार्या इति नामद्वयं मतम् ॥ तदभावो यदा चास्ति शैवसद्मनि मंगले ॥ २२ ॥ तदा स्वतारतम्येन कुर्वन्ति हि महीतले ॥ पूर्वं त्वयोक्तकर्माणि सर्वाण्यपि महीतले ॥ २३ ॥ पूज्योऽपूज्याश्च विद्यन्ते तेषां मध्ये सदाऽनघे ॥ पूज्यो मठार्य एवैकः सर्वेऽपूज्या भवंति हि ॥ २४ ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे सुप्रभेदागमानुसारेणोपाचार्यकथनं नाम चतुर्थं प्रकरणं समाप्तम् ॥

---

ष्णूची सेवा करण्याकरितां शौनक वगैरे गण ज्याप्रमाणें उत्पन्न करण्यांत आले; ( १९ ) राजांच्या सेवेकरितां जसे परिचारक ( नोकर चाकर ) असतात; गुरूंची सेवा करण्याला जसे गुणवान् शिष्य असतात; ( २० ) त्याप्रमाणेंच उपाचार्य हे महाचार्यांचे सेवक होत. आणि माझ्या मुखांपासून जे पांच सिंहासनाधिकारी आचार्य उत्पन्न झाले, ( २१ ) तेच वीरशैवांचे मुख्य अधिकारी मानिले जातात. ते माझेंच स्वरूप असल्यामुळें उपाचार्य हे त्यांचे ( महाचार्यांचे ) सेवक होत. ( २२ ) त्यांचीं ग्रामाचार्य व उपाचार्य अशीं दोन नांवें आहेत- शिवभक्ताच्या शुभगृहांत महाचार्य हजर नसतील ( २३ ) त्यावेळीं हे उपाचार्य आपापल्या योग्यते प्रमाणें ( ज्याला जितका अधिकार असेल त्याप्रमाणें ) पृथ्वीवरील तूं पूर्वी सांगितलेलीं सर्व कर्मे करतात. ( २४ ) हे अनघे, त्यांच्यामध्यें देखील पूज्य व अपूज्य ( पूजा करण्याला योग्य व अयोग्य ) असे नेहमीं असतात. एक मठार्य मात्र पूज्य असून बाकीचे सगळे अपूज्य होत."

येथें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील सुप्रभेदागमाला अनुसरून 'उपाचार्यकथन' नांवाचें चवथें प्रकरण संपलें.

---

## ॥ अथ सुप्रभेदागमोक्तप्रकारेण पंचमोत्पत्ति-कथनन्नाम पंचमप्रकरणम् ॥

पार्वत्युवाच

देवदेव जगन्नाथ सर्वानुग्रहकारक ॥ जननं पंचमानां हि श्रोतुमिच्छामि सांप्रतम् ॥ १ ॥

ईश्वर उवाच

ममेशानमुखोत्पन्नः पंचवक्त्रगणेश्वरः ॥ तन्मुखात्पंचमानां तु जननं विद्धि मत्प्रिये ॥ २ ॥

पार्वत्युवाच

नामानि पंचमानां तु तेषां पुत्रान् पृथक् पृथक् ॥ सर्वेषां गोत्र-सूत्राणि शाखाः प्रवरकांस्तथा ॥ पृथग्विस्तार्य तत्सर्वं वद मे करुणाकर ॥ ३ ॥

ईश्वर उवाच

ममोर्ध्वमुखसंजातः पंचवक्त्रगणेश्वरः ॥ अतिवर्णाश्रमोपेतो वीरशैवमताधिकः ॥ ४ ॥ तस्य वक्त्रेषु संभूताः पंचमाः पंच संख्यकाः ॥ कथ्यते हि मया देवि तेषां गोत्रादिकं पृथक् ॥ ५ ॥

---

सुप्रभेदागमांत सांगितलेल्या रीतीनें पंचमांची उत्पत्ति सांगण्याला आरंभ करितों. पार्वती ह्मणत्येः–(१) "हे देवाधिदेवा, जगन्नाथा, आपण सर्वांवर कृपा करणारे आहां. तर मला आतां पंचमांची उत्पत्ति ऐकण्याची इच्छा आहे ( ती सांगावी )." ईश्वर ह्मणतातः–( २ ) माझ्या ईशाननांवाच्या मुखापासून पंचमुखी गणेश्वर उत्पन्न झाला. त्याच्या पांच मुखापासून पंचमांची उत्पत्ति झाली; समजलें प्रिये? " पार्वती ह्मणत्येः–( ३ ) " पंचमांचीं नांवें त्यांचे वेगळे वेगळे पुत्र, तसेंच सगळ्यांचें गोत्र, सूत्र, शाखा व प्रवर हीं, हे दयाळू देवा, मला सविस्तर सांगावीं." ईश्वर ह्मणतातः—( ४ ) " माझ्या ऊर्ध्व ( ईशान ) मुखापासून पंचवक्त्र ( पांच मुखांचा ) गणाधीश्वर उत्पन्न झाला. तो * अतिवर्णाश्रमी असून सर्व वीरशैवांमध्यें श्रेष्ठ होता. ( ५ ) त्याच्या पांच मुखांपासून पांच पंचम उत्पन्न झाले. देवि, त्यांचें गोत्र वगैरे मी वेगवेगळें सांगतों.

---

* अतिवर्ण आश्रम कशाला ह्मणावें याची सविस्तर माहिती पुढील सहाव्या प्रकरणांत सांगितली आहे.

पंचास्यमुखसंभूता यतः सर्वे ततोऽधिकाः ॥ पंचमाः सर्ववर्णेभ्यो मद्भक्ता मत्प्रियाः सदा ॥ ६ ॥ अतिवर्णाश्रमाचारा लिंगाराधन-तत्पराः ॥ ते वै साक्षान्महादेवि मोदन्ते ह्यागमेषु च ॥ ७ ॥ मखा-रिश्चैव कालारिः पुरारिस्तु स्मरारि वै ॥ वेदारिः पंचमश्चेति पं-च नामानि वै शृणु ॥ ८ ॥ एतेषां पंचमानां तु चोपदेष्टा च यो गुरुः ॥ तस्य गोत्रादिकं यद्यज्ज्ञेयं तत्तत्सदाऽमले ॥ ९ ॥ स्वगो-त्रैःसह संबंधो नैव कार्यः कदाचन ॥ प्रमादाद्वा प्रकुर्वीत संबंधस्तु स दोषभाक् ॥१०॥ एतेषां पंचमानां वै गोत्रसूत्रादिकं पृथक् ॥ मखारिपंचमाख्यस्य वीरगोत्रं वरानने ॥ ११ ॥ तच्छाखा रेणुका-भिख्या सूत्रं पडविडीत्यपि ॥ एकाक्षरश्च प्रवरो मूलवर्णो नका रकः ॥ १२ ॥ कलशस्तु हरिद्वर्ण आराध्यो रेवणो मतः ॥ तस्य मंत्रः प्रसादाख्यो दशवर्णमहामनुः ॥ १३ ॥ ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं नमः शिवाय ॥ इति मंत्रः सदा तस्य उपदेश उदीरितः ॥ अत्याश्रमी गृहस्थःस्यादिष्टलिंगेन संयुतः ॥ एतैश्च लक्षणैर्युक्तो म-

---

(६) हे पंचम पांच मुखांपासून झालेले असल्यामुळें ते सगळे सर्व जातींमध्यें श्रेष्ठ व माझे भक्त असून मला नेहमीं प्रिय आहेत. (७) ते सगळे अतिवर्णाश्र-माच्या आचारानें वागणारे व लिंगपूजेंत निष्णात असून आगमांमध्यें ते साक्षात् आनंद पावतात. (८) मखारि, कालारि, पुरारि, स्मरारि आणि वेदारि या प्रमाणें पंचमांचीं पांच नांवें लक्ष्यांत ठेव. (९) हे पुण्यशालिनि या पंचमांचा जो उपदेशक गुरु असेल त्याचें जें जें गोत्र वगैरे असेल, तें तेच यांचें असें नेहमीं जाणावें. (१०) आपल्या गोत्राशीं कधींच संबंध (रक्तसंबंध, सोयरीक) करूं नये. जर चुकून असा संबंध घडला तर तो सदोष होतो. (११) या पंचमांचें गोत्र सूत्र वगैरे वेगळें वेगळें आहे ( जरी पंचमांच्या उपदेशक गुरूचें जें गोत्र सूत्र वगैरे असेल तेंच त्यांचें असतें, तरी सगळ्या पंचमांचा एकच गुरु नसल्यामुळें, त्यांचीं वेगवेगळीं गोत्र सूत्रें झालीं आहेत. ) सुंदरी, मखारिपंचमाचें वीरगोत्र होय. (१२) त्याची शाखा रेणुक नांवाची, सूत्र पडविडी, प्रवर एकाक्षर, नकार मू-ळवर्ण, (१३) कलश पीत आणि गुरु रेवणाराध्य होय. प्रसाद नांवाचा त्याचा मंत्र असून त्या मंत्राचे दहा वर्ण ( अक्षरें ) आहेत. (१४) 'ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं नमः शिवाय' हा त्याच्या उपदेशाचा मंत्र सांगितला आहे. अ-त्याश्रमी गृहस्थानें इष्टलिंग धारण करावें. हीं ज्याचीं लक्षणें आहेत तो मखारि

खारिः पंचमो भवेत् ॥ १४ ॥ तत्सूत्राच्च समुत्पन्ना द्वादशैवोपपंचमाः ॥ तेषां पृथक् च नामानि श्रृणु देवि वदाम्यहं ॥ १५ ॥ शतांगः प्रमुखश्चैव शर्करो वृषभाख्यकः ॥ सहस्राक्षः सधर्माख्यो विषमो मोचकाव्हयः ॥ १६ ॥ वृकभेदी कुंजरारिः शेषः शिखिवहाख्यकः ॥ मखारिपंचमादेते संभूता ह्युपपंचमाः ॥ १७ ॥ अतःपरं प्रवक्ष्यामि कालारेर्लक्षणं श्रृणु ॥ कालारिपंचमाख्यस्य नंदिगोत्रं प्रकीर्तितम् ॥ १८ ॥ तच्छाखा दारुका नाम प्रवरो ह्यक्षरो मतः ॥ तत्सूत्रं वृष्टिकाख्यं स्यान्मूलवर्णो मकारकः ॥ १९ ॥ कलशस्तस्य ताम्रश्च आराध्यो मरुळो मतः ॥ माया पंचाक्षराख्यश्च नववर्णो महामनुः ॥ २० ॥ ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं नमः शिवाय ॥ अयमेव महामंत्रश्चोपदेशे प्रशस्यते ॥ अतिवर्णी गृहस्थःस्यादिष्टलिंगार्चनापरः ॥ २१ ॥ एतैश्च लक्षणैर्युक्तः कालारिः पंचमस्तथा ॥ तत्सूत्राच्च समुत्पन्ना द्वादशैवोपपंचमाः ॥ २२ ॥ तेषां पृथक् च नामानि श्रृणु देवि वदाम्यहं ॥ केशराक्षो मृगारिश्च नाकेशो ऋषनामकः ॥ २३ ॥ शिलांगः शृंगशीर्षश्च चेलांबरकुहासनः ॥ शतभुक् बहुजिव्हश्च नागदन्तो फणाव्हयः ॥ कालारिपंचमादेते

---

पंचम होय. ( १५ ) या सूत्रापासून बारा उपपंचम उत्पन्न झाले. देवि, त्यांचीं निरनिराळीं नांवें सांगतों ऐक. ( १६ ) शतांग, प्रमुख, शर्कर, वृषभ, सहस्राक्ष सधर्म, विषम, मोचक, ( १७ ) वृकभेदी, कुंजरारि, शेष आणि शिखिवह या प्रमाणें बारा उपपंचम मखारिपंचमापासून उत्पन्न झाले. ( १८ ) आतां कालारिपंचमाचें लक्षण सांगतों ऐक. या कालारि पंचमाचें नंदी गोत्र होय. ( १९ ) त्याची शाखा दारुक, नांवाची, प्रवर ह्यक्षर, सूत्र वृष्टि नांवाचें आणि मूलवर्ण मकार हा होय. (२० ) त्याचा कलश ताम्र आणि गुरु मरुळाराध्य जाणावा. मायापंचाक्षर नांवाचा त्याचा मंत्र असून तो नऊ वर्णांचा आहे. ( २१ ) ' ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं नमः शिवाय ' हाच त्याचा उपदेशाचा मंत्र होय. अतिवर्ण गृहस्थानें इष्टलिंग धारण करावें. ( २२ ) कालारि पंचमाचीं हीं लक्षणें झालीं. त्याच्या सूत्रापासूनही बारा उपपंचम उत्पन्न झालें. ( २३ ) देवि, त्यांचीं निरनिराळीं नांवें सांगतों ऐक. केशराक्ष, मृगारि, नाकेश, ऋष, ( २४ ) शिलांग, शृंगशीर्ष, चेलांवर, कुहासन, शतभुक्, बहुजिव्ह, नागदन्त आणि फण असे बारा उपपंचम कालारिपंचमापासून उत्पन्न झाले.

संभूता उपपंचमाः ॥ २४ ॥ पुरारिपंचमस्याथ वृषगोत्रं प्रकीर्तितम् ॥ तच्छाखा शंखुकर्णाख्या प्रवरस्त्र्यक्षरो मतः ॥ २५ ॥ तत्सूत्रं मुक्तगुच्छाख्यं मूलवर्णः शिकारकः ॥ कलशः कृष्णवर्णः स्याद्रामाचार्यो महागुरुः ॥ २६ ॥ सूक्ष्मपंचाक्षरीमंत्रस्त्वष्टाक्षरसमन्वितः ॥ ॐ न्हां न्हीं न्हूं नमः शिवायेत्युपदेशाधिकारकः॥२७॥ अतिवर्णी गृहस्थः स्यादिष्टलिंगार्चनापरः ॥ एतैश्च लक्षणैर्युक्तः पुरारिः पंचमस्तथा ॥ २८ ॥ तत्सूत्राच्च समुत्पन्ना द्वादशैवोपपंचमाः ॥ तेषां पृथक् च नामानि कथयामि श्रृणुष्व ते ॥ २९ ॥ अग्निभुक् कर्मकारी च जावालो निर्जरस्तथा ॥ निःशूलश्च शशांकश्च ललाटाक्षोऽक्षराख्यकः ॥ ३० ॥ पादाख्यो विकटांगश्च शिलादश्च हरिन्मुखः ॥ पुरारिपंचमादेते संभूता उपपंचमाः ॥ ३१ ॥ स्मरारिपंचमस्याथ गोत्रं वै भृंगिनामकम् ॥ तच्छाखा धेनुकर्णाख्या प्रवरश्चतुरक्षरः ॥ ३२ ॥ तत्सूत्रं लंवकं प्रोक्तं वाकारो मूलवर्णकः ॥ कलशः श्वेतवर्णः स्यादाराध्यो पंडितस्तथा ॥ ३३ ॥ स्थूलपंचाक्षरीमंत्रः सप्तवर्णसमन्वितः ॥ ॐ न्हां न्हीं नमः शिवाय सर्वोत्कृष्टोऽयमीरितः ॥ ३४ ॥ एतादृशमहामंत्र उपदेशाधिका-

---

(२५) पुरारि पंचमाचें वृषभ गोत्र होय. शंखुकर्ण ही त्याची शाखा आणि त्र्यक्षर हा त्याचा प्रवर होय. ( २६ ) त्याचें सूत्र मुक्तगुच्छ नांवाचें, मूलवर्ण शिकार कलश कृष्णवर्ण आणि गुरु रामाचार्य ( एकोरामाराध्य ) हा होय. ( २७ ) सूक्ष्मपंचाक्षर हा त्याचा मंत्र असून तो आठ अक्षरांचा आहे. 'ॐ न्हां न्हीं न्हूं नमः शिवाय ' हा त्याचा उपदेशाचा मंत्र होय. ( २८ ) अतिवर्णी गृहस्थानें इष्टलिंगाची पूजा करावी. पुरारि पंचमाचीं हीं लक्षणें झालीं. तसेंच ( २९ ) त्याच्या सूत्रापासूनही बाराच उपपंचम उत्पन्न झाले. त्यांचीं नांवें वेगळीं वेगळीं तुला सांगतों ऐक. ( ३० ) अग्निभुक्, कर्मकारी, जावाल, निर्जर, निःशूल, शशांक, ललाटाक्ष, अक्षर, ( ३१ ) पाद, विकटांग, शिलाद व हरिन्मुख असे हे बारा उपपंचम पुरारि पंचमापासून उत्पन्न झाले. ( ३२ ) स्मरारि पंचमाचें गोत्र भृंगि नांवाचें होय. त्याची शाखा धेनुकर्णनांवाची, प्रवर चतुरक्षर, ( ३३ ) सूत्र लंवक, मूलवर्ण वाकार, कलश श्वेत आणि गुरु पंडिताराध्य हा होय. ( ३४ ) 'ॐ न्हां न्हीं नमः शिवाय' असा हा सर्वोत्कृष्ट सात अक्षरांचा स्थूलपंचाक्षरमंत्र त्याचा मंत्र होय. ( ३५ ) या महामंत्राच्या उपदेशाचा

रकः ॥ अत्याश्रमी गृहस्थः स्यादिष्टलिंगार्चको भवेत् ॥ एतैश्च लक्षणैर्युक्तः स्मरारिः पंचमस्तथा ॥ ३५ ॥ तत्सूत्राच्च समुत्पन्ना द्वादशैवोपपंचमाः ॥ सहस्रशीर्षः पीतांगो नगमाली निराशनः ॥३६॥ यमद्युतिश्च सप्तांगो लतांगो मृत्युनाशनः ॥ नतनुर्घोटवक्त्रश्च निरोगी चाभयाव्हयः ॥ स्मरारिपंचमादेते संभूता उपपंचमाः ॥ ३७ ॥ वेदारिपंचमस्याथ स्कंदगोत्रमितीर्यते ॥ तच्छाखा विश्वकर्णाख्या प्रवरः पंचमाक्षरः ॥ ३८ ॥ तत्सूत्रं पंचवर्णाख्यं मूलवर्णो यकारकः ॥ कलशस्तस्य सौवर्णो विश्वाराध्यो गुरुः स्मृतः ॥ ३९ ॥ मूलं षडक्षरो मंत्रः षडक्षरसमन्वितः ॥ ॐ नमः शिवायेति मंत्रमाता षडक्षरी ॥ एतादृशमहामंत्रस्योपदेशः प्रशस्यते ॥ ४० ॥ अत्याश्रमी गृहस्थः स्यादिष्टलिंगार्चने रतः ॥ एतैश्च लक्षणैर्युक्तो वेदारिः पंचमस्तथा ॥ ४१ ॥ तत्सूत्राच्च समुद्भूता द्वादशैवोपपंचमाः ॥ तेषां पृथक् च नामानि शृणुष्वाहं वदामि ते ॥ ४२ ॥ पश्चाद्दृष्टिश्च पुष्टास्यो गिरिवक्त्रश्च गोमुखः ॥ सुवर्णनखपद्मांघ्री दशाननविषाननौ ॥ ४३ ॥ उग्रदेहः शतपदः सहस्रस्कंदनामकः ॥

---

तो अधिकारी आहे. अत्याश्रमी गृहस्थानें इष्टलिंगाची पूजा करावी. या लक्षणांचा स्मरारि पंचम झाला. तसेंच ( ३६ ) त्याच्या सूत्रापासूनही बारा उपपंचम उत्पन्न झाले. सहस्रशीर्ष, पीतांग, नगमाली, निराशन, ( ३७ ) यमद्युति, सप्तांग, लतांग, मृत्युनाशन, नतनु, घोटवक्र, निरोगी आणि अभय या नांवांचे बारा उपपंचम स्मरारिपंचमापासून उत्पन्न झाले. ( ३८ ) वेदारिपंचमाचें स्कंन्दगोत्र होय. विश्वकर्णनांवाची त्याची शाखा असून पंचाक्षर हा त्याचा प्रवर होय. ( ३९ ) त्याचें पंचवर्णनांवाचें सूत्र, यकार मूलवर्ण, सुवर्णकलश आणि विश्वाराध्य हा गुरु आहे. ( ४० ) सगळ्या मंत्रांची आई जो 'ॐ नमः शिवाय' नांवाचा सहाअक्षरांचा षडक्षर मंत्र, तो त्याचा मूलमंत्र असून या महामंत्राच्या उपदेशाचा तो अधिकारी आहे. ( ४१ ) अत्याश्रमी गृहस्थानें इष्टलिंगाची अर्चा करावी. या लक्षणांचा वेदारि पंचम झाला. तसेंच ( ४२ ) त्याच्या सूत्रापासून बाराच उपपंचम उत्पन्न झाले. त्यांचीं वेगवेगळीं नांवें तुला सांगतों ऐक. ( ४३ ) पश्चाद्दृष्टि, पुष्टास्य, गिरिवक्र, गोमुख, सुवर्णनख, पद्मांघ्रि, दशानन, विषानन, ( ४४ ) उग्रदेह, शतपद, सहस्रस्कंद, आणि त्रिवदन असे

त्रिवदनश्च वेदारेः संभूताश्चोपपंचमाः ॥ ४४ ॥ स्वयंभुवागमे ॥ अवतीर्य महीभागे मदनुज्ञानुसारतः ॥ पंचास्यपंचपुत्राणां दीक्षां कृत्वा विधानतः ॥ ४५ ॥ उद्धार्य भुवि मद्भक्तान्पंचाराध्या इतीरिताः ॥ आराध्यैः पंचभिरेते दीक्षिताः खलु पंचमाः ॥ ४६ ॥ वंशस्तु पंचमानां वै गतो वृद्धिं वरानने ॥ ममेशानमुखाज्जातः पुरा पंचास्यसंज्ञकः ॥ ४७ ॥ तस्मात्पंचास्यगणपः पंचमश्चेति कीर्तितः ॥ तद्वत्तद्वंशसंभूताः पंचमा इति विश्रुताः ॥ ४८ ॥ यथा मत्पंचवक्त्रेषु श्रेष्ठमीशानमाननम् ॥ तथा सर्वेषु वर्णेषु श्रेष्ठाः पंचमवंशजाः ॥ ४९ ॥ तनुं समर्प्य गुरवे जंगमाय धनं तथा ॥ मह्यं मनो महीभागे वर्तन्ते च मम प्रिये ॥ ५० ॥ मद्भक्तानां त एवाद्या वीरशैवा इतीरिताः ॥ शैवास्तदितरे लोकाः सत्यं सत्यं नगात्मजे ॥ ५१ ॥ पंचमा वीरशैवास्ते मन्मतोद्धारहेतवः ॥ मदन्यदैवविमुखा मद्भक्ता मत्प्रियाः सदा ॥ ५२ ॥ यथा नदीनां सर्वासां गंगा स्त्रीणां भवान्यहं ॥ पुंसां वाराणसीक्षेत्रं क्षेत्राणां मणिक-

---

बारा उपपंचम वेदारिपंचमापासून उत्पन्न झाले. ( स्वयंभुवागम ) ( ४५ ) माझ्या आज्ञेप्रमाणें भूमीवर अवतार घेऊन, माझ्या पंचवक्त्र गणाधीश्वराच्या पांच मुलांना विधीनें दीक्षा देऊन ( ४६ ) ज्यांनीं माझ्या भक्तांचा उद्धार केला, ते पंचाराध्य होत. त्याच पांच आराध्यांकडून या पंचमांना दीक्षा मिळाली. ( ४७ ) हे सुंदरि, त्याच पंचमांचा वंश पुढें वाढला. पूर्वी माझ्या ईशान नांवाच्या मुखापासून पंचास्य ( पांच मुखांचा ) नांवाचा गणाधीश्वर उत्पन्न झाला. ( ४८ ) त्यामुळें त्या पंचास्य गणाधीश्वराला पंचम ह्मणूं लागले. त्याप्रमाणेंच त्याच्या वंशांत उत्पन्न झालेले सगळे पंचम या नांवानें प्रसिद्धीस आलें. ( ४९ ) माझ्या पांचही मुखांमध्यें ईशानमुख जसें श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणें पंचमवंशांत उत्पन्न झालेले सगळ्या जातींत श्रेष्ठ होत. ( ५० ) प्रिये, ते शरीर, ( तनु ) गुरूला, पैसा ( धन ) जंगमाला, आणि मन मला अर्पण करून राहतात. ( ५१ ) हे पार्वति, मी खरें खरें सांगतों कीं, माझ्या सर्व भक्तांमध्यें वीरशैवच मुख्य होत. त्यांखेरीज इतर सगळे शैव होत. ( ५२ ) या वीरशैव पंचमांचा माझ्या मताचा उद्धार करणें हाच हेतु असतो. मजवांचून दुसरें दैवत ते भजत नाहींत. ते नेहमीं मला फार प्रिय आहेत. ( ५३ ) ज्याप्रमाणें सर्व नद्यांमध्यें गंगा श्रेष्ठ आहे, स्त्रियांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस, पुरुषांमध्यें मी श्रेष्ठ आहें, क्षेत्रांमध्यें काशी-

र्णिका ॥५३॥ तीर्थानां सर्वमंत्राणां मम पंचाक्षरीमनुः ॥ कैलासः स-
र्वलोकेषु पादपानां सुरद्रुमः ॥ ५४ ॥ वीरशैवमतं देवि तथा
सर्वोत्तमोत्तमम् ॥ पंचमानां समुत्पत्तिरियं पर्वतनंदिनि ॥ ५५ ॥
इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे सुप्रभेदागमोक्तानुसारेण पंचमो-
त्पत्तितच्छाखाप्रवरादिकथनन्नाम पंचमं प्रकरणं समाप्तम् ॥

---

क्षेत्र श्रेष्ठ आहे, मणिकर्णिका तीर्थ ( ५४ ) सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ आहे, सर्व मंत्रांत माझा पंचाक्षरीमंत्र श्रेष्ठ आहे, लोकांमध्यें कैलास श्रेष्ठ आहे, किंवा वृक्षांमध्यें कल्पतरु श्रेष्ठ आहे, ( ५५ ) देवि, त्याप्रमाणें वीरशैवमत सगळ्या उत्तम मतांत उत्तम आहे. पार्वति, याप्रमाणें ही पंचमांची उत्पत्ति झाली.

येथें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील सुप्रभेदागमांत सांगितलेल्या प्रकारानें पंचमोत्पत्ति आणि त्यांच्या शाखाप्रवरादिकथन नांवाचें पांचवें प्रकरण संपलें.



## ॥ अथ अप्राकृत सृष्टिकालादिकथनन्नाम षष्टप्रकरणम् ॥

### ॥ वीरशैवानंदचंद्रिकायाम् ॥ चतुर्दशप्रकरणे ॥

---

उक्ता वर्णाश्रमाचाराः प्राकृताः श्रुतिसंमताः ॥ अतिवर्णाश्रमाचारा ये तु श्रुत्यंतगोचराः ॥ १ ॥ तानहं श्रोतुमिच्छामि त्वत्तस्तत्वविदां वर ॥ शृणु त्वं निष्कलंकेन मनसा सावधानतः ॥ २ ॥ अमायैर्विबुधैः श्राव्यान्वसव क्षोणिपालक ॥ ब्रवीम्यत्याश्रमाचारान्सर्वश्रुत्यन्तगोचरान् ॥ ३ ॥ अतिवर्णाश्रमाः पूर्वे नंद्यादिप्रमथाः स्मृताः ॥ तत्संततिसमायाता वीरशैवा इति श्रुताः ॥ ४ ॥ तत्संततीनां विस्तारास्तद्धर्मा मुक्तिदायिनः ॥ श्रुत्यन्तप्रतिपन्नास्त इति शैवागमोदितम् ॥ ५ ॥ ब्रह्मचारी गृहस्थश्च वानप्रस्थश्च भिक्षुकः ॥ अतिवर्णाश्रमी चेति क्रमाच्छ्रेष्ठा विचक्षण ॥ ६ ॥ गृहस्थोऽपि वनस्थस्य यतेरप्यंबुजेक्षण ॥ विद्योत्कर्षबलेनैव गुरुर्भवति नान्यथा ॥ ७ ॥ वानप्रस्थाश्रमस्थोऽपि तथा सन्यासिनो हरे ॥ विद्योत्कर्ष-

---

(वरिशैवानन्दचंद्रिका, प्रकरण चवदावें) (१) 'श्रुतीला मान्य असे सामान्य वर्णाश्रमाचार आपण सांगितले. वेदांतांत जे अतिवर्णाश्रमाचार सांगितले आहेत, ( २ ) ते, हे श्रेष्ठ तत्वज्ञा, आपणापासून ऐकण्याची माझी इच्छा आहे.' 'तूं निर्मळ मनानें लक्ष्य देऊन ऐक. ( ३ ) हे राजा वसवा, निष्कपट अशा शहाण्यांना ऐकण्याला योग्य असे जे अतिवर्णाश्रमाचार उपनिषदांत सांगितले आहेत, ते मी तुला सांगतों. ( ४ ) पूर्वी नंदी वगैरे प्रमथ अतिवर्णाश्रमीच होते. त्यांची जी संतति झाली, तिला वीरशैव ह्मणतात. ( ५ ) त्या संततीचा जो विस्तार झाला, तो विस्तार त्याच ( नंदी वगैरे प्रमथांनीं जो धर्म पाळिला त्या ) धर्मांचा, मुक्ति देणारा व उपनिषदांना अनुसरणारा झाला असें शैवागमांत सांगितले आहे. ( ६ ) हे चतुरा, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, भिक्षुक व अतिवर्णाश्रमी या पांच जणांत क्रमानें एकापेक्षां दुसरा श्रेष्ठ होय ( ह्मणजे ब्रह्मचाऱ्यापेक्षां गृहस्थ श्रेष्ठ, गृहस्थापेक्षां वानप्रस्थ श्रेष्ठ, वानप्रस्थापेक्षां भिक्षुक श्रेष्ठ आणि भिक्षुकापेक्षां अतिवर्णाश्रमी श्रेष्ठ होय. ) ( ७ ) हे कमलाक्षा, ज्ञानातिशयाच्या बळानें गृहस्थ देखील वनांत राहणाऱ्या तापस्याचा ( वानप्रस्थाचा ) गुरु होतो. पण तें ज्ञान नसेल तर होत नाहीं. ( ८ ) त्याचप्रमाणें हे हरे, ज्ञानातिशयाच्या जोरावर वानप्रस्थ ( वायकोसह वनांत जाऊन तप करणारा ) देखील सन्यास्याचा गुरु होतो.

बलेनैव गुरुर्भवति नान्यथा ॥ ८॥ अतिवर्णाश्रमी प्रोक्तो गुरुः सर्वाधिकारिणाम् ॥ न तस्मादधिकः कोऽपि यथाहं पुरुषोत्तम ॥९॥ अतिवर्णाश्रमी साक्षाद्गुरूणां गुरुरुच्यते ॥ यस्य वर्णाश्रमाचारो गलितः स्वात्मदर्शनात् ॥ १० ॥ यो वर्णानाश्रमान्सर्वानतीत्य स्वात्मन्ति स्थितः ॥ सोऽतिवर्णाश्रमी प्रोक्तः सर्ववेदार्थवादिभिः ॥११॥ पंचाक्षरी पराविद्या शिवज्योतिरवाप्तये ॥ ॐकारः प्रणवः सूक्ष्मो विद्यानां बीजमुत्तमम् ॥ १२ ॥ तस्मादशेषतत्वानि प्रणवेन विशोधयेत् ॥ सितेनोध्दूलयेद्देहमग्निरित्यादिसप्तभिः ॥ १३ ॥ त्रियायुषं जमदग्निरिति कुर्यात्त्रिपुंड्रकम् ॥ यः पशुः पशुत्वं च व्रतेनानेन संत्यजेत् ॥ १४ ॥ वृत्तम् ॥ शिरो ललाटश्रुतिकण्ठबाहूरुनाभिदेशेषु षडंगुलानि ॥ विचिंतयेत्स्वात्मनि शंभुमीशं शिवं वरं शान्तमुमासहायम् ॥ भस्मांगमाविष्कृतसर्वदीप्तमत्याश्रमाचारमिमं व-

---

ज्ञानाचा अभाव असेल तर तसा होणार नाहीं (९) हे पुरुषश्रेष्ठा, अतिवर्णाश्रमी सर्व आश्रमस्थांचा गुरु ह्मणवितो. मी जसा ( सर्वांहून श्रेष्ठ ) आहें, तसा त्याहून ( अतिवर्णाश्रमस्थाहून ) दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं. (१०) अतिवर्णाश्रमी हा प्रत्यक्ष गुरूंचा गुरु होय. आत्मस्वरूपाच्या दर्शनामुळें ज्याचा वर्णाश्रमासंबंधीं आचार गळून पडतो ( पूर्ण ज्ञानानें ब्रह्मस्वरूपीं लीन झाल्यामुळें मी असुक जातीचा किंवा असुक आश्रमाचा, व त्या जातीसंबंधानें किंवा आश्रमासंबंधानें मला असुक रीतीनें वागल पाहिजे, हें भान ज्याचें आपोआप सुटून जातें ), (११) आणि जो सर्व वर्ण आणि आश्रम यांच्या पलीकडे राहून आपल्या स्वरूपांत लीन होतो, त्याला सर्व वेदार्थज्ञ अतिवर्णाश्रमी ह्मणतात. (१२) परमात्म्याची प्राप्ति करून देण्याला पंचाक्षरी ही सर्वांत श्रेष्ठ विद्या आहे. सूक्ष्म प्रणव जो ॐकार, तो सर्व विद्यांचें मूळबीज आहे. (१३) ह्मणून सर्व तत्वें प्रणवानें शुद्ध करावीं. ' अग्निरिति ' वगैरे सात मंत्रांनीं अंगाला भस्म लावावें. (१४) ' त्रियायुषं जमदग्नि ' या मंत्रानें त्रिपुंड्र लावावें. या व्रतानें पशूचें पशुत्व देखील जाईल (१५) मस्तक, कपाळ, कान, गळा, बाहु, मांड्या आणि नाभि या या ठिकाणीं सहा बोटें (प्रत्येक भस्माचा पट्टा सहा बोटें लांब होईल अशा प्रमाणानें ) भस्म लावावें, आणि आपल्या अंतःकरणांत—पार्वती ज्याच्या अर्धांगीं आहे, ज्यानें सर्वांगाला भस्म फासलें आहे ज्याची अंगकांति लखलखत आहे, व ज्याला ईश, शंभु, व शिव ह्मणतात त्या श्रेष्ठ परमात्म्याचें—चिंतन करावें. याला

दंति ॥१५॥ ॐकारबोधितं तत्वं शाश्वतं शिवमुच्यते ॥ अव्यक्ताप्रकृतौलीनं परंज्योतिरनुत्तमम् ॥ १६ ॥ तदन्तः परमं तत्वमनाधारं निरंजनम् ॥ ध्यायीत तन्मनो नित्यमेकरूपं महेश्वरम् ॥ १७ ॥ विशोध्य सर्वतत्वानि प्रणवेनाथवा पुनः ॥ संस्थाप्य मयि चात्मानं निर्मले परमे पदे ॥ १८ ॥ प्लावयेदात्मनो देहं तेनैव ज्ञानवारिणा ॥ मदात्मा मन्मयो भस्म गृहीत्वा ह्यग्निहोत्रजम् ॥ १९ ॥ तेनोध्दूल्य च सर्वांगमग्निरित्यादिमंत्रतः ॥ चिंतयेदात्मनीशानं परंज्योतिःस्वरूपिणम् ॥ २० ॥ एष पाशुपतो योगः पशुपाशविमुक्तये ॥ सर्ववेदान्तसारोऽयमत्याश्रम इति श्रुतिः ॥ २१ ॥ उध्दूलनं त्रिपुंड्रं च ज्ञानांगत्वेन केवलम् ॥ आमनंति मुनिश्रेष्ठा अथर्वशिरसि स्थितम् ॥ २२ ॥ व्रतं पाशुपतं येन सम्यगाचरितं बुधाः ॥ तस्य ज्ञानं विजायेत तेन पाशविमोचनम् ॥ २३ ॥ उध्दूलनं त्रिपुंड्रं च ज्ञानांगत्वेन केवलम् ॥ आमनंति मुनिश्रेष्ठाः श्वेताश्वतर-

---

( अशा वर्तनाला ) अत्याश्रमाचार ह्मणतात. ( १६ ) ॐकारानें ज्या तत्वाचा बोध होतो, जें अविनाशी आहे, जें अव्यक्त ( इंद्रियांना अगोचर ) आहे, जें प्रकृतीमध्यें लीन न होणारें त्या अनुपम परंज्योतीला ( परमात्मस्वरूपाला ) शिव ह्मणतात. ( १७ ) त्या शिवाचें–आधाररहित, निर्लेप, नित्य, एकरूप, सर्वांवर सत्ता चालविणारें–जें अंतस्तत्व ( आंतील तत्व ) किंवा मन, त्याचें ध्यान करावें. ( १८ ) किंवा प्रणवानें पुनः सर्व तत्वें शोधून निर्मळ आणि परमपद जो मी त्या माझ्या ठिकाणीं आत्म्याला स्थिर करून ( १९ ) त्याच ज्ञानरूपी पाण्यांत आपला देह बुडवावा ( त्या ज्ञानांत मग्न व्हावें. ) मजमध्यें आत्म्याला स्थिर करून, माझेंच स्वरूप होऊन, अग्निहोत्रापासून होणारें भस्म घेऊन ( २० ) ' अग्निरिति ' वगैरे मंत्रानें तें भस्म अंगाला लावून अंतःकरणांत परंज्योतिःस्वरूपी ईश्वराचें चिंतन करावें. ( २१ ) याला पाशुपत योग ह्मणतात. हा पशुपाशापासून मुक्त करितो. सगळ्या वेदांताचा यांत सार आहे व हाच अत्याश्रम होय, असें श्रुतींत ह्मटलें आहे. ( २२ ) केवळ ज्ञानरूप होऊन अंगाला भस्म व त्रिपुंड्र लावावें असें अथर्वशिरस् नांवाच्या उपनिषदांत असल्याचें श्रेष्ठ मुनि समजतात. ( २३ ) सुज्ञहो हें पाशुपतव्रत जो उत्तम रीतीनें करील, त्याच्यामध्यें ज्ञान उत्पन्न होऊन त्यायोगानें संसारपाशांतून तो मुक्त होईल. ( २४ ) केवळ ज्ञानरूप होऊन भस्म व त्रिपुंड्र धारण करावें असें श्वेताश्वतरशाखेच्या मुनींनीं

शाखिनः ॥ २४ ॥ अयमत्याश्रमो धर्मो यैः समाचरितो मुदा ॥
तेषामेव शिवज्ञानं संसारोच्छेदकारणम् ॥ २५ ॥ लिंगं शिवो भ-
वेत्क्षेत्रमंगं संयोगमाश्रयः ॥ तस्माल्लिंगांगसंयुक्तो योऽपि सोऽत्याश्रमी
भवेत् ॥ २६ ॥ एतद्वेदशिरोनिष्ठाः प्राहुः पाशुपतं मुने ॥ एतच्छि-
रोव्रतं प्राहुः केचिदत्याश्रमं बुधाः ॥ केचित्तद्व्रतमित्याहुः केचिच्छां-
भवमैश्वरम् ॥ २७ ॥ वृत्तम् ॥ ब्रह्माण्डतो निर्गमनाभ्युपायो ना-
स्त्यैव शास्त्रेष्वखिलेषु भूप ॥ व्रतेन वा पाशुपतेन मुक्तिर्मृतेन
काश्यामपि वाप्यतेऽत्र ॥ २८ ॥ उत्पत्तिमेषां भूपाल वदामि शृणु
सांप्रतम् ॥ २९ ॥ विजयतंत्रे ॥ अस्ति सच्चित्सुखाकारमलक्षणप-
दास्पदं ॥ निर्विकल्पं निराकारं निरस्ताशेषवैषमम् ॥ ३० ॥ परि-
च्छेदकथाशून्यं प्रपंचातीतवैभवम् ॥ प्रत्यक्षादिप्रमाणानामगोचरपदे
स्थितम् ॥ ३१ ॥ स्वप्रकाशविराजन्तमनामयमनूपमम् ॥ सर्वज्ञं
सर्वगं शान्तं सर्वशक्तिनिरंकुशम् ॥ ३२ ॥ शिवरुद्रमहादेवभवा-

---

सांगितलें आहे. ( २५ ) या अत्याश्रमाच्या धर्माचें जे आचरण करितील,
त्यांनाच संसाराचा नाश करण्याचें परमात्मसंबंधी ज्ञान होईल. ( २६ ) लिंग
हाच शिव होय, अंग हें त्याचें क्षेत्र आणि दोहोंचा संयोग हा आश्रय होय.
ह्मणून लिंग आणि अंग या दोहोंचा ज्याच्या ठिकाणीं संयोग होतो तोच अ-
त्याश्रमी होय. ( २७ ) हे मुने, यालाच ( लिंगांगसंयोगाला ) वेदान्त जाणणारे
पाशुपत ह्मणतात, कोणी मुख्य व्रत ह्मणतात, कोणी ज्ञाते अत्याश्रम ह्मणतात,
कित्येक व्रत ह्मणतात व कित्येक शांभव ( शंभु संबंधी ) किंवा ऐश्वर ( ईश्वरसं-
बंधी ज्ञान ) व्रत ह्मणतात. ( २८ ) राजा ब्रह्मांडांतून निघून जाण्याला ( मु-
क्त होण्याला ) कोणत्याही शास्त्रांत उपाय सांगितलेला नाहीं. मुक्ति ही पाशुपत
व्रतानें किंवा काशींत मृत्यु पावल्यानें मात्र मिळते. ( २९ ) राजा, आतां यांची
( अत्याश्रमी शिवभक्तांची ) उत्पत्ति सांगतों ऐक. ( विजयतंत्र ) ( ३० ) जें
सच्चिदानंदमय आहे, जेथें ओळखण्याचें कोणतेंही चिन्ह नाहीं, जें निर्विकल्प
व निराकार असून जेथें कोणत्याही प्रकारचा उंचनीचपणा नाहीं, ( ३१ ) जेथें
भेदाभेदाची गोष्टच खपत नाहीं, जेथील वैभव मायेच्या पलीकडचें आहे, प्रत्य-
क्षादि प्रमाणांचा रिघाव चालणार नाहीं अशा ठिकाणीं जें आहे, ( ३२ ) जें
आपल्याच प्रकाशानें शोभत आहे, जें निर्लेप, निरुपम ( उपमा देतां येण्याला
अशक्य, ) सर्व जाणणारें, सर्व ठिकाणीं व्यापिलेलें, शांत, सर्व शक्तिमान्, व
स्वतंत्र आहे, ( ३३ ) ज्याला शिव, रुद्र, महादेव, भव वगैरे नांवें असून जें

द्विपदसंज्ञकम् ॥ अद्वितीयमनिर्देश्यं परंब्रह्म सनातनम् ॥ ३३ ॥ अप्रलीनमभूत्पूर्वं चेतनाचेतनात्मकम् ॥ स्वात्मलीनं जगत्कार्यं स्वप्रकाशं तदद्भुतम् ॥ ३४ ॥ शिवाभिधं परं ब्रह्म जगन्निर्मातुमिच्छया ॥ स्वरूपमादधे किंचित्सुखस्फूर्तिविजृंभितम् ॥ ३५ ॥ निरस्तदोषसंबंधं निरुपाधिकमव्ययम् ॥ दिव्यमप्राकृतं नित्यं नीलकण्ठं त्रिलोचनम् ॥ ३६ ॥ चंद्रार्धशेखरं शुद्धं शुद्धस्फटिकसन्निभम् ॥ शुद्धमुक्ताफलाभासमुपास्यं गुणमूर्तिभिः ॥ ३७ ॥ विशुद्धज्ञानकरणं विषयं सर्वयोगिनाम् ॥ कोटिसूर्यप्रतीकाशं चंद्रकोटिसमप्रभम् ॥ अप्राकृतगुणाधारमनन्तमहिमास्पदम् ॥ ३८ ॥ तदीया परमा शक्तिः सच्चिदानंदलक्षणा ॥ समस्तलोकनिर्माणसमवायस्वरूपिणी ॥ ३९ ॥ तदिच्छया ऽभवत्साक्षात्तत्स्वरूपानुकारिणी ॥ स शंभुर्भगवान् देवः सर्वज्ञः सर्वशक्तिमान् ॥ ४० ॥ जगत्सिसृक्षुः प्रथमं ब्रह्माणं सर्वदेहिनाम् ॥ कर्तारं सर्वलोकानां विदधे विश्वनायकः ॥ ४१ ॥

---

अद्वितीय ( एकटेंच, ) दाखविण्याला अशक्य, सनातन, परब्रह्म, ( ३४ ) व अविनाशी पूर्वीं होतें, तें सचेतन व अचेतन यांत भरलेलें, स्वतांमध्येंच लीन झालेलें जगाचें कारणरूप ( ज्याच्यापासून जग उत्पन्न झालें. ) स्वतां प्रकाशमान अद्भुत, ( ३५ ) असें शिव नांवाचें परब्रह्म जगाची उत्पत्ति करण्याच्या इच्छेनें ज्यांत किंचित् आनंदाची स्फूर्ति दिसते अशा पुढील स्वरूपाला पावलें ( त्या परब्रह्मापासून पुढील स्वरूप झालें ) ( ३६ ) ज्याला दोषाचा कांहीं संपर्क नाहीं, जें उपाधिरहित, अखंड, दिव्य, असामान्य, व नित्य, असून ज्याचा गळा काळसर आहे, ज्याला तीन डोळे आहेत, ( ३७ ) ज्याच्या मस्तकीं अर्धचंद्र आहे, जें शुद्ध, केवळ पांढऱ्या स्फटिकासारखें किंवा शुद्ध मोत्यांसारखें, गुणवानांना उपासना करण्याला योग्य, ( ३८ ) केवळ ज्ञान देणारें, सर्व योग्यांचा विषय झालेलें, जें कोटि सूर्यासारखें असून कोटि चंद्रासारखा ज्याचा प्रकाश आहे, अलौकिक गुणांचा जें आगर असून अनंतमहिमांचे जें घरच आहे ( असें स्वरूप परब्रह्मापासून झालें. हें स्वरूपच महादेव होय. ) ( ३९ ) सच्चिदानंद लक्षणांची सर्वब्रह्मांडांच्या उत्पत्तीला मूळ कारणरूप झालेली त्याचीच श्रेष्ठ शक्ति ( ४० ) त्याच्या इच्छेनें साक्षात् त्याच्याच स्वरूपाचें अनुकरण करणारी झाली. ( त्याच्यापासून त्याच्याच सारखी एक शक्ति उत्पन्न झाली ) त्या भगवान् सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् प्रभु शंभूनें ( ४१ ) जगाची उत्पत्ति करण्याच्या इच्छेनें सर्व लोकांतील सर्व प्राण्याला उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाला प्रथम उत्पन्न केलें. विश्वांचा

तस्मै प्रथमपुत्राय शंकरः शक्तिमान् विभुः ॥ सर्वज्ञः सकला विद्याः सानुग्रहमुपादिशत् ॥ ४२ ॥ प्राप्तविद्यो महादेवाद्ब्रह्मा विश्वनियामकात् ॥ समस्तलोकं निर्मातुं समुद्योगपरोऽभवत् ॥ ४३ ॥ कृतोद्योगोऽपि निर्माणे जगतां शंकराज्ञया ॥ अज्ञातोपायसंपत्तिरभवन्मायया वृतः ॥ ४४ ॥ विधातुमखिलान्लोकानुपायं प्राप्तुमिच्छया ॥ पुनस्तं प्रार्थयामास देवदेवं त्रियंबकम् ॥ ४५ ॥ नमस्ते देवदेवेश नमस्ते करुणाकर ॥ अस्मदादिजगत्सर्वं निर्वापनविधिक्षम ॥ ४६ ॥ उपायं वद मे शंभो जगत्सृष्ट्यां जगत्पते ॥ सर्वज्ञः सर्वशक्तिस्त्वं सर्वकर्ता सनातनः ॥ ४७ ॥ इति संप्रार्थितः शंभुर्ब्रह्मणा विश्वनायकः ॥ उपायमवदत्तस्मै लोकसृष्टिप्रवर्तकम् ॥ ४८ ॥ उपायमीश्वरेणोक्तं लब्ध्वापि चतुराननः ॥ न समर्थोऽभवत्कर्तुं नानारूपमिदं जगत् ॥ ४९ ॥ पुनस्तं प्रार्थयामास ब्रह्मा विव्हलमानसः ॥ देवदेव महादेव जगत्प्रथमकारण ॥ ५० ॥ नमस्ते सच्चिदानंद स्वेच्छाविग्रहराजित ॥ भव शर्व महेशान सर्वकारणकारण ॥ ५१ ॥

---

अधिपति, ( ४२ ) शक्तिमान्, विभु व सर्वज्ञ अशा त्या शंकरानें त्या आपल्या पहिल्या मुलाला ( ब्रह्मदेवाला ) कृपेनें सगळ्या विद्या शिकविल्या. ( ४३ ) विश्वांचा चालक अशा महादेवापासून विद्या शिकून ब्रह्मदेव सर्व ब्रह्मांडें उत्पन्न करण्याच्या उद्योगाला लागला. ( ४४ ) शंकराच्या आज्ञेनें ब्रह्मदेवानें जगांची उत्पत्ति करण्याचा प्रयत्न केला तरी तो मायेनें वेष्टिला होता ह्मणून (उत्पत्तीच्या) उपायाचें त्याला ज्ञान झालें नाहीं. ( ४५ ) सर्व भुवनांच्या उत्पत्तीचा उपाय समजावा या इच्छेनें त्यानें पुनः देवाधिदेव त्र्यंबकाची प्रार्थना केली. ( ४६ ) 'हे देवाधिदेवा तुला नमस्कार असो; हे करुणाकरा तुला मी नमस्कार करितों. आमच्यासुद्धां सर्व सृष्टीचा संहार करण्याला आपण समर्थ आहां. ( ४७ ) हे शंभो, हे जगत्पते, जगाला उत्पन्न करण्याचा उपाय मला सांगावा. ( कारण ) आपण सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, सर्वकर्ते आणि सनातन आहां.' ( ४८ ) ब्रह्मदेवानें अशी प्रार्थना केल्यावर विश्वाचा अधिपति अशा शंभूनें सृष्टि उत्पन्न करण्याचा उपाय त्याला सांगितला. ( ४९ ) ईश्वरानें सांगितलेला उपाय मिळवूनही, अनेक रूपाचें हें जग निर्माण करण्याला ब्रह्मदेव समर्थ झाला नाहीं. ( ५० ) मग पुनः खिन्नमनानें ब्रह्मदेवानें ( ईश्वराची ) प्रार्थना केलीः—' हे देवाधिदेवा महादेवा, आपण जगाचें मूळ कारण आहां. ( ५१ ) आपण सच्चिदानंदरूप व इच्छेप्रमाणें दह

भवदुक्तोऽप्युपायो मे न किंचिज्ज्ञायतेऽधुना ॥ सृष्टिं विधेहि भगवन्प्रथमं परमेश्वर ॥ ज्ञातोपायस्ततः कुर्यां जगत्सृष्टिमुमापते ॥ ५२ ॥ इत्येवं प्रार्थितः शंभुर्ब्रह्मणा विश्वयोनिना ॥ ससर्जात्मसमप्रख्यान् सर्वज्ञान्सर्वशक्तिकान् ॥ ५३ ॥ प्रबोधपरमानंदपरिवाहितमानसान् ॥ प्रमथान् विश्वनिर्माणप्रलयादिविधिक्षमान् ॥ ५४ ॥ सृष्टप्रमथवर्गेषु वर्णाश्रमपरिक्रमान् ॥ अप्राकृतसदाचारानुपादिशदथ प्रभुः ॥ तस्मात्तद्गोत्रजाः सर्वे शिवभक्ता धृतव्रताः ॥ ५५ ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे वीरशैवानंदचंद्रिकानुसारेण अप्राकृत सृष्टिकालादिकथनन्नाम षष्ठं प्रकरणं समाप्तम् ॥

---

धारण करणारे आहां. हे भवा, हे शर्वा, हे महेशा आपणांला नमस्कार असो. आपण सर्व कारणांचें कारण आहां. ( ५२ ) आपण मला उपाय सांगितला. परंतु मला आतां कांहीं समजत नाहीं. हे भगवन् हे परमेश्वर, आपण पहिल्यानें सृष्टि उत्पन्न करावी. ह्मणजे हे उमापते, त्यावरून मी उपाय समजून घेऊन जग निर्माण करीन' ( ५३ ) विश्वयोनि ( विश्वाच्या उत्पत्तीचें कारण ) ब्रह्मदेवानें अशी प्रार्थना केल्यावर, ईश्वरानें आपल्या बरोबरीच्या योग्यतेचे, सर्वज्ञ, सर्व शक्तिमान्, ( ५४ ) परमात्म्या विषयींच्या बोधापासून होणाऱ्या आनंदांत ज्यांचीं मनें गटकळ्या खातात व विश्वाची उत्पत्ति आणि लय करण्याची ज्यांमध्यें शक्ति आहे, अशा प्रमथ गणांना उत्पन्न केलें. ( ५५ ) उत्पन्न केलेल्या प्रमथवर्गांना प्रभूनें वर्णाश्रमाचा क्रम आणि अप्राकृत ( असामान्य ) सदाचार सांगितला. ह्मणून त्या प्रमथांच्या गोत्रांत उत्पन्न झालेले सगळेजण शिवभक्त आणि शिवव्रत करणारे आहेत.

याप्रमाणें वीरशैवसदाचारसंग्रहांतील वीरशैवानंदचंद्रिकेला अनुसरून लिहिलेलें अप्राकृतसृष्टिकालादिकथन नांवाचें सहावें प्रकरण संपलें.

## अथ सुप्रभेदागमोक्तवीरशैवाधिक्य शैवभेदादिविवरण निरूपणन्नाम सप्तमप्रकरणम्

विशुद्धाः प्राकृताश्चेति द्विविधा मानुषाः स्मृताः ॥ शिवसंस्कारिणः शुद्धाः प्राकृता इतरे मताः ॥ १ ॥ वर्णाश्रमादिधर्माणां व्यवस्था हि द्विधा मता ॥ एका शिवेन निर्दिष्टा ब्रह्मणा कथिताऽपरा ॥ २ ॥ शिवधर्मो हि कथितः शिवाश्रमनिषेविणाम् ॥ शिवसंस्कार हीनानां धर्मः पैतामहःस्मृतः ॥ ३ ॥ वर्णाश्रमविभागस्तु धर्मतो नतु जातितः ॥ भक्तमाहेश्वरेष्वेषु दीक्षया चैकभावतः ॥ ४ ॥ सोऽयं धर्मः संग्रहेण प्रोच्यते नातिविस्तरम् ॥ तपः कर्म जपो ध्यानं ज्ञानं चेत्यनुपूर्वकम् ॥ ५ ॥ शिवार्थे देहसंशोषस्तपः कृच्छ्रादि नो मतम् ॥ शिवार्चा कर्मविज्ञेयं वाह्यं यागादि नोच्यते ॥ ६ ॥ जपः पंचाक्षराभ्यासः प्रणवाभ्यास एव वा ॥ रुद्राध्यायादिकाभ्यासो न वेदाध्ययनादिकम् ॥ ७ ॥ ध्यानं शिवस्वरूपादिचिन्ता नात्मादिचिंत-

---

(सुप्रभेदागम) (१) मनुष्यांचे दोन वर्ग आहेत. एक शुद्ध आणि दुसरा प्राकृत (सामान्य) शिवसंस्कार ज्यांना होतात ते शुद्ध, व वाकीचे प्राकृत (सामान्य) होत. (२) वर्ण, आश्रम वगैरे संबंधीं धर्माची व्यवस्थाही दोन प्रकारची आहे. एक शंकरांनीं सांगितलेली व दुसरी ब्रह्मदेवानें सांगितलेली. (३) शैव आश्रमांत असलेल्यांना शैवधर्म सांगितला आहे, आणि शैवसंस्कार ज्यांना झालेले नाहींत त्यांना ब्रह्मदेवाचा (ब्रह्मदेवानें घालून दिलेला) धर्म सांगितला आहे. (४) भक्त व माहेश्वर (जंगम) यांच्यामध्यें दीक्षेमुळें एकभाव असल्यामुळें (भेद नसल्यामुळें) वर्णाश्रमाचा विभाग जातीवर नसून धर्मावर आहे. (५) तो धर्म थोडक्यांत संग्रह करून सांगतों. तप, कर्म, जप, ध्यान व ज्ञान ह्या क्रमानें शिवधर्म होय. (६) शिवाकरितां शरीर झिजविणें याला तप ह्मणावें. कृच्छ्र वगैरे व्रतें करणें तप नव्हे. शिवपूजा करणें हेंच कर्म होय. वाह्य यज्ञयाग वगैरे करण्याला (शिवभक्तांचें) कर्म ह्मणत नाहींत. (७) जप ह्मणजे पंचाक्षरमंत्राचा अभ्यास, किंवा प्रणवाचा अभ्यास, अथवा रुद्राध्याय वगैरे याचा अभ्यास. जप ह्मणजे वेदाचा अभ्यास वगैरे नव्हे. (८) शिवाचें स्वरूप वगैरे चिंतणें हेंच ध्यान होय. स्वतःचें वगैरे चिंतन हें ध्यान नव्हे. शैवागमांचा अर्थ जाणणें यालाच ज्ञान ह्मणतात; दुसऱ्या शास्त्राचा अर्थ जाणणें ज्ञान नव्हे.

नम् ॥ शिवागमार्थविज्ञानं ज्ञानं नान्यार्थवेदनम् ॥ इति पंचप्रकारोऽयं शिवयज्ञः प्रकीर्तितः ॥ ८ ॥ अनेन पंचयज्ञेन यः पूजयति शंकरम् ॥ भक्त्या परमया युक्तः स वै भक्त इति स्मृतः ॥ ९ ॥ अन्तःप्रकाशमानस्य संवित्सूर्यस्य संततम् ॥ मनसा यदुपस्थानं तत्संध्यावंदनं विदुः ॥ १० ॥ सत्यं क्षमा दया शौचं नियमो मार्दवं तथा ॥ तपस्त्यागो ब्रह्मचर्यं संतुष्टिश्चार्जवं तथा ॥ ११ ॥ धर्मा एकादश प्रोक्ता भक्तानां शुभवांछिनाम् ॥ लिंगार्चनादिकं कर्म कार्यं दीक्षान्वितैर्नरैः ॥ १२ ॥ इति शिवार्चनादीनामेव पंचयज्ञसंध्यावंदनादिकत्वेनोक्तत्वात् ॥ तथा च शंकरसंहितायाम् ॥ यदा यदा हि धर्मस्य हानिर्भवति भूतले ॥ तदा तदावतारोऽयं गणेशानां महीतले ॥ १३ ॥ वृत्तम् ॥ यदायदा प्राणशिवैक्यभाजां हानिर्भवेद्भूमितले गणेशाः ॥ तदा तदा मर्त्यकुलेऽवतीर्य संभूय कुर्वन्ति हि धर्मसंस्थाम् ॥ १४ ॥ इति शंकरसंहितावचनानुसा-

---

याप्रमाणें हा पांच प्रकारचा शिवयज्ञ सांगितला आहे. ( ९ ) श्रेष्ठ प्रकारची भक्ति धरून या पंचयज्ञानें जो शंकराची पूजा करितो, त्यालाच भक्त ह्मणावें. ( १० ) अंतःकरणांत ज्याचा प्रकाश पडला आहे, त्या ज्ञानसूर्याची मनानें नेहमीं पूजा करणें यालाच संध्यावंदन ह्मणतात. ( ११ ) सत्य ( खरें बोलणें व चालणें ), क्षमा, दया, शौच ( मनानें व शरीरानें शुद्ध–पवित्र असणें ), नियम ( नेमानें वागणें ), मृदुपणा ( विनय–नम्रता ), तप, त्याग ( सन्यास–अलिप्तपणा ), ब्रह्मचर्य, संतोष, आणि सरळपणा ( मनाचा मोकळेपणा, निष्कपटत्व ), ( १२ ) असे हे अकरा धर्म ज्यांची आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा आहे त्या भक्तांकरितां सांगितले आहेत. ज्यांनीं दीक्षा घेतली आहे, त्यांनीं लिंगपूजा वगैरे कर्में करावीं. याप्रमाणें शिवपूजा इत्यादि करणें हेंच पंचयज्ञ संध्यावंदन वगैरे होय असें सांगितलें आहे. तसेंच शंकर संहितेंत ह्मटलें आहे कीं:– ( १३ ) " पृथ्वीवरील धर्माची जेव्हां जेव्हां हानि होते, तेव्हां तेव्हां गणेशाचा हा अवतार पृथ्वीवर होतो. ( १४ ) ज्या ज्यावेळीं प्राणाचें आणि शिवाचें ऐक्य पावणाऱ्या भक्तांची ( प्राणामध्यें व शिवांमध्यें भेद न ठेवतां शिवामध्यें प्राणाला समरसून टाकून शिवरूप पावणाऱ्या भक्तांची ) हानि होते, त्या त्या वेळीं गणाधीश्वर मृत्युलोकांत मनुष्यांच्या कुळांत अवतार घेऊन धर्म संस्थापना करितात." असें शंकर संहितेंतील वचन आहे आणि त्याप्रमाणें पहिल्या प्रकरणांत आचार्यांची

रेण प्रथमप्रकरणोक्ताचार्योत्पत्तिसारेण च ॥ तथा च ॥ प्रवक्ष्यामि भवितॄंश्च श्रृणु तज्जननक्रमम् ॥ द्राक्षारामे रामनाथलिंगे युगचतुष्टये ॥ एकोरामस्य जननमावासस्तु हिमालये ॥ १५ ॥ सुधाकुण्डाख्यसुक्षेत्रे लिंगे श्रीमल्लिकार्जुने ॥ जननं पंडितार्यस्य निवासः श्रीगिरौ शिवे ॥ १६ ॥ तथा रेवणसिद्धस्य कोल्लिपाके पुरोत्तमे ॥ सोमेशलिंगे जननमावासःकदलीपुरे ॥ १७ ॥ तद्वन्मरुळसिद्धस्य वटक्षेत्रे महत्तरे ॥ सिद्धेशलिंगे जननं स्थानमुज्जयनीपुरे ॥ १८ ॥ काश्यां विश्वेश्वरे लिंगे विश्वाराध्यस्य संभवः ॥ स्थानं श्रीकाशिकाक्षेत्रे श्रृणु पार्वति सादरम् ॥ १९ ॥ कृताद्युगचतुष्के ते पंचाराध्या यथाविधि ॥ मम पंचमुखोद्भूताः संस्थाप्य सकलान् भुवि ॥ २० ॥ दीक्षां कृत्वा क्रमादेव पंचमानां नगात्मजे ॥ कलौ तद्वंशजातानां दीक्षानुग्रहकारणात् ॥ निधाय निजशिष्यांश्च पुनस्ते मां समागताः ॥ २१ ॥ इत्यादिना पंचाचार्यावतरणस्य तच्छिष्यगोत्रसूत्रप्रवरादीनां स्वयंभुवागमे घण्टाघोषमुक्तत्वात् इदानीमपि

---

उत्पत्तिही सांगितली आहे. तसेंच ( १५ ) " पुढें होणाऱ्या आचार्यांचा जन्म क्रमानें सांगतों, ऐक. द्राक्षाराम येथील रामनाथ लिंगामध्यें चारही युगांत एकोरामाचा जन्म होऊन हिमालयांत त्याचें वास्तव्य होईल. ( १६ ) अमृतकुंड नांवाच्या उत्तम क्षेत्रांत श्री मल्लिकार्जुनलिंगांत पंडितार्यांची उत्पत्ति होऊन, हे पार्वति, त्याचें वास्तव्य श्रीगिरिपर्वतावर होईल. ( १७ ) तसेंच कोल्लिपाक नांवाच्या प्रसिद्ध गांवांत सोमेशलिंगामध्यें रेवणसिद्धाचा जन्म होऊन, कदलीपुरांत त्याचा वास होईल. ( १८ ) त्याचप्रमाणें मरुळसिद्धाचा जन्म प्रसिद्ध वटक्षेत्रांतील सिद्धेशलिंगांत होऊन, उज्जयनीमध्यें त्याचें राहणें होईल. ( १९ ) पार्वति, लक्ष्य देऊन ऐक, काशींतील विश्वेश्वरलिंगांत विश्वाराध्याचा जन्म होऊन त्या काशीक्षेत्रांतच त्याचें वास्तव्य होईल. ( २० ) कृत वगैरे चार युगांत माझ्या मुखांपासून उत्पन्न झालेले हे पंचाराध्य पृथ्वीवर सगळ्याची यथायोग्य स्थापना करून, ( २१ ) पंचमांना क्रमानें दीक्षा देऊन, पार्वति, कलियुगांत पंचमांच्या वंशजांना दीक्षेचा अनुग्रह करण्याकरितां आपल्या शिष्यांना ठेवून , पुनः मला येऊन मिळतील." इत्यादि वचनांनीं पंचाचार्यांचा अवतार आणि त्यांच्या शिष्यांचें गोत्र, सूत्र, प्रवर वगैरे स्वयंभुवागमांत आक्रोश करून सांगितलें असल्यामुळें ( जोरानें प्रतिपादिलें असल्यामुळें ) सध्यां देखील या पंचाचार्यांचीं पांच सिं-

तेषां पीठपंचकस्य हिमालयादिषु सुप्रसिद्धतया स्थितत्वाच्च । ब्राह्मणोऽस्य मुखमासीदिति ब्राह्मणपदवाच्यशिवमुखोद्भूतेषु घंटाकर्णादिष्वाचार्येषु ब्राह्मण्यस्य निसर्गसिद्धत्वाच्च । तद्वंशीयानामपि ब्राह्मण्यं सिद्धमेवेत्यलं मणिवंधवद्धकंकणदर्शनस्यादर्शान्वेषणेन ॥ अथैवमपि ॥ जन्मना जायते शूद्रः कर्मणा जायते द्विजः ॥ वेदाभ्यासेन विप्रःस्याद्ब्रह्मविद्ब्राह्मणो भवेत् ॥ २२ ॥ इति महाभारतवचनानुसारिणः प्राकृतब्राह्मणाः ॥ एतेषां तु तदभाववत्त्वाद्विजत्वं वेदाधिकारित्वादिकं कथं युज्यत इतिचेच्छृणु ॥ तेषामवश्यकर्तव्यायाः शिवदीक्षायाः ॥ "रुद्रो भूत्वा यजेद्रुद्रं नारुद्रो रुद्रमर्चयेत्" इति शंकरसंहितोक्तप्रमाणपरिप्राप्तरुद्राराधनयोग्यताफलकपूर्वनिष्ठजीवत्वनिरासपूर्वकशिवत्वप्रतिष्ठापनयनप्रयोजकत्वात्तादृशशिव-दीक्षावतामुपनयनं विनापि तेषां तद्बलेनैव द्विजत्वद्वारा रुद्राध्ययनरुद्राराधनादिष्वधिकारित्वसिद्धेश्च ॥ तथाहि ॥ गरुडपुरा-

---

हासनें हिमालय वगैरे ठिकाणीं प्रसिद्धपणें असल्यामुळें आणि 'ब्राह्मण हा ईश्वराचें तोंड होता ( ब्राह्मण ईश्वराच्या तोंडापासून उत्पन्न झाला' ) या वचनाप्रमाणें ब्राह्मण शब्दवाचक जें शिवमुख त्यांपासून उत्पन्न झालेले घंटाकर्णादि आचार्य ब्राह्मण होते हें आपोआपच सिद्ध होत असल्यामुळें त्यांचे वंशजही ब्राह्मण होत असें ठरतें. इतकें ( सांगितलें म्हणजे ) बस्स आहे. हाताच्या कंकणाला आरसा नको. आतां असेंही होईल कीं, ( २२ ) "मनुष्य जन्मतः शूद्र असतो, कर्मानें ( उपनयन संस्कारानें ) द्विज होतो, वेदाभ्यासानें विप्र होतो आणि ब्रह्म जाणल्यावर ब्राह्मण होतो" या महाभारतांतील वचनाला ब्राह्मण अनुसरतात. यावरून हे या महाभारतांतील वचनाला अनुसरणारे नसल्यामुळें ब्राह्मण्य व वेदांचा अधिकार यांना कसा येईल? अशी शंका येईल, तर त्याचें उत्तर ऐक. त्यांना ( घंटाकर्ण वगैरे आचार्यांच्या वंशजांना ) जी शिवदीक्षा अवश्य देण्यांत येते, ती शिवदीक्षा 'रुद्र होऊन रुद्राची पूजा करावी, रुद्र न होतां रुद्राची पूजा करूं नये' या शंकरसंहितेंतील प्रमाणानें प्राप्त झालेल्या रुद्राराधनाची योग्यता देऊन पूर्वी असलेलें जीवत्व नाहींसें करून शिवत्व स्थापन करणारी असल्यामुळें तशा प्रकारची शिवदीक्षा ज्यांना झाली आहे, त्यांना उपनयन संस्कारावांचूनही त्या दीक्षेच्या बळानें ब्राह्मण्य मिळून त्या द्वारानें रुद्राध्ययन रुद्राराधन वगैरे क-

णे ॥ वंशावलिप्रयातानां लिंगधारणशालिनाम् ॥ ज्ञानिनां शिवभक्तानां शूद्रत्वं नैव विद्यते ॥ २३ ॥ नमके चमके पंचब्रह्मंत्रादिवैदिके ॥ तेषामेवाधिकारोऽस्ति शिवदीक्षाप्रभावतः ॥ २४ ॥ इति ॥ वस्तुतस्त्वलिंगिब्राह्मणकुमारस्यानुपनीतत्वे शूद्रत्वं ॥ वीरशैवब्राह्मणस्यानुपनीतत्वेऽपि शिवदीक्षयैव ब्राह्मण्यमिति परमार्थः ॥ पारमेश्वरे ॥ दीयते लिंगसंबंधः क्षीयते च मलत्रयं ॥ दीयते क्षीयते यस्मात्तस्माद्दीक्षेति कथ्यते ॥ २५ ॥ गर्भाष्टमे कृता मुख्या दीक्षा सा षोडशावधि ॥ गौणा तदूर्ध्वमधमा दीक्षा वीरान्वयायिनाम् ॥ २६ ॥ इति दीक्षाकालं निरूप्य ॥ कुण्डमण्डपहोमाद्यैर्न्यासैरध्वकलादिभिः ॥ मंत्रोपदेशसहिता क्रियादीक्षेति गीयते ॥ २७ ॥ इत्यारभ्य कृच्छ्रपुण्याहनांदीसमाराधनांकुरार्पणमंटपदेवताप्रतिष्ठापंचब्रह्मकलशार्चनहोमषडध्वशोधनधान्याधिवासजलाधिवा--

---

र्मांचा अधिकार येतो असें ठरतें. तसेंच गरुडपुराणांत म्हटलें आहे कीं, ( २३ ) लिंग धारण करणाऱ्यांच्या वंशांत उत्पन्न झालेल्या ज्ञान्यांना व शिवभक्तांना शूद्रत्व नाहीं ( २४ ) यांना जी शिवदीक्षा मिळते तिच्या प्रभावानें नमक, चमक पंचब्रह्म मंत्र वगैरे वैदिककर्मांचा यांनाच अधिकार आहे." वास्तविक पाहतां जो लिंगधारण करीत नाहीं त्या ब्राह्मणाच्या मुलाची मुंज झाली नाहीं तर तो (मुलगा) शूद्र होय. परंतु वीरशैवब्राह्मणाची मुंज झाली नाहीं तरी शिवदीक्षेमुळेंच तो ब्राह्मण आहे, हें अगदीं सत्य आहे. पारमेश्वरतंत्रांत सांगितलें आहे कीं–"(२५) लिंगसंबंध दिला जातो ( लिंगधारण करविण्यांत येतें) आणि त्यावरोबर मलत्रयाचा क्षय होतो ( तीन प्रकारचा मल नाहींसा होतो. ) म्हणून जिच्यायोगानें लिंगसंबंध दिला जाणें आणि मलत्रयाचा क्षय होणें ह्या गोष्टी एकदम घडतात तिला दीक्षा म्हणतात. ( २६ ) वीरशैवांच्या वंशजांना गर्भापासून आठवे वर्षी दीक्षा दिली म्हणजे ती मुख्य दीक्षा होते, सोळा वर्षांपर्यंत दिली तर गौणदीक्षा होते. आणि त्या वयानंतर दिली म्हणजे ती अधम ( कनिष्ठ प्रतीची ) दीक्षा होते." असा दीक्षेचा काल सांगून–"( २७ ) कुंड, मंडप, होम वगैरे विधानांनीं, अध्व, कला वगैरे न्यासांनीं आणि मंत्राचा उपदेश करून जी क्रिया करण्यांत येते, तिला दीक्षा म्हणतात" असा दीक्षेला आरंभ करून कृच्छ्र, पुण्याहवाचन, नांदी समाराधन, अंकुरार्पण, मंटपदेवतांची स्थापना, पंचब्रह्म कलशाची पूजा होम, षडध्वशोधन, धान्याधिवास, जलाधिवास, पंचगव्यप्राशन,

सपंचगव्यप्राशनषट्त्रिंशत्कलान्यासरूपांगसंस्कारलिंगसंस्कारपूर्विका आज्ञा–उपमा-स्वस्तिकारोहण-कलशाभिषेक-विभूतिपट्ट–लिंगायत्त–लिंगस्वायत्ताख्यसप्तविधदीक्षाविधानस्य वातुलागमादिषूक्तत्वात्तत्प्रकारकदीक्षैवास्माकं संप्रदायसिद्धतया प्रतिभाति ॥ तत्सर्वं विस्तरभयान्न लिखितम् ॥ तथा च ॥ अष्टावरणसंपन्नः पंचाचारपरायणः ॥ वैदिकं कर्म कुर्वीत ज्ञानैकफलसाधनम् ॥ २८ ॥ शिवभक्तोऽपि विप्रोऽपि वेदाध्यायपरायणः ॥ स एव शिव इत्युक्तः सत्यमेव न संशयः ॥२९॥ अदीक्षितानां विप्राणां शिवागमविलोकनम् ॥ पापमेतन्महादेवि सत्यमेव न संशयः ॥३०॥ इति वीरागमादिवचनप्रामाण्यात् ॥ भूतिरुद्राक्षसंयुक्तो लिंगधारी सदा शुचिः ॥ पंचाक्षरं जपन्योगी शिवभक्त इति स्मृतः ॥ ३१ ॥ इति सिद्धान्तशिखामणिवचनप्रामाण्याच्च ॥ शिवदीक्षाभिजातानां शिवैकभक्तानां वीरशैवानां शि-

---

छत्तीस कलांचा न्यासरूपी अंगसंस्कार, लिंगसंस्कार केल्यानंतर आज्ञा, उपमा, स्वस्तिकारोहण, कलशाभिषेक, विभूतिपट्ट, लिंगायत्त, लिंगस्वायत्त अशा नांवाची सात प्रकारची दीक्षा वातुलादि आगमांत सांगितली आहे. त्या त्याप्रकारची दीक्षाच आह्मांला सांप्रदाया प्रमाणें ठरलेली दिसते. तें सगळें लिहिलें तर फार वाढेल या भयानें लिहिलें नाहीं. तसेंच “ ( २८ ) * अष्टावरणांनींयुक्त आणि ‡ पंचाचारानें चालणाऱ्यानें, ज्ञान हेंच फळ ज्यामुळें साधतें, असें वैदिक कर्म करावें. ( २९ ) ब्राह्मण असून आणि शिवभक्त असून जो वेदाचा अभ्यास करितो, तोच खरोखर शिव होय यांत संशय नाहीं. ( ३० ) हे पार्वति, शिवदीक्षा न घेतां जे ब्राह्मण शिवागम पाहतील ( वाचतील, ) त्यांना खरोखर पातक लागतें यांत संशय नाहीं.” असें वीरागम वगैरे आगमांतील वचनांचें प्रमाण असल्यामुळें; आणि “ ( ३१ ) विभूति व रुद्राक्षधारण करणारा, लिंगधारी, नेहमीं पवित्र असून पंचाक्षरीमंत्राचा जप करणारा जो योगी त्याला शिवभक्त ह्मणतात.” असें सिद्धान्तशिखामणींतील वचनाचें प्रमाण असल्यामुळें, शिवदीक्षा ज्यांना झाली आहे अशांच्या पोटीं जन्मलेल्या व केवळ शिवाची भक्ति करणाऱ्या वीरशैवांना शिवांचें ज्यांत प्रतिपादन आहे अशा वेदांचें व आगमांचें

---

* गुरु, लिंग, जंगम, पादोदक, प्रसाद, विभूति, रुद्राक्ष व मंत्र या आठांना अष्टावरण ह्मणतात.

‡ लिंगाचार, शिवाचार, सदाचार, गणाचार, व भृत्याचार, असे हे पंचाचार होत.

चप्रतिपादकवेदागमाध्यायनज्ञानैकफलसाधनवैदिककर्मानुष्ठानाधिकारित्वं स्पष्टं ॥ अन्यच्च ॥ आचारभेदाच्छैवस्य भेदः संकथ्यतेऽधुना ॥ सामान्यशैवं प्रथमं मिश्रशैवं ततःपरम् ॥ ३२ ॥ शुद्धशैवं तथा ज्ञेयं वीरशैवं ततः परम् ॥ एतेषां लक्षणं वक्ष्ये शृणु देवि यथा क्रमम् ॥ ३३ ॥ सामान्यभेदः पूजादिः शिवस्य परमात्मनः ॥ सर्वत्र शिवभावश्च सामान्यमिति गीयते ॥ ३४ ॥ यदा यदा शिवं पश्येत्तदा कुर्याच्छिवार्चनम् ॥ प्रदक्षिणनमस्कारौ दर्शनं वा समाचरेत् ॥ ३५ ॥ शिवचिन्हेषु भक्तेषु शिवकार्येषु पार्वति ॥ भक्तिं कुर्वीत सततं मनोवाक्कायकर्मभिः ॥ ३६ ॥ सामान्यशैवमाख्यातं मिश्रशैवमतः शृणु ॥ शिवं विष्णुं च ब्रह्माणं कुमारं गणनायकम् ॥ आदित्यमंबिकां चैव मिश्रीकृत्य समर्चनम् ॥ ३७ ॥ सर्वत्र देवताबुद्धिर्माहात्म्यं शिव एव वा ॥ शिवधर्मान्यधर्माणां समाचरणमादरात् ॥ ३८ ॥ अन्यपूजामिश्रितत्वान्मिश्रशैवमुदाहृतम् ॥ अतःपरं शुद्धशैवं वक्ष्यामि शृणु पार्वति ॥३९॥

---

अध्ययन करण्याचा, त्यापासून केवळ ज्ञानाची फलप्राप्ति करून घेण्याचा व वैदिक कर्में करण्याचा अधिकार आहे, असें स्पष्ट होतें. दुसरें, ( ३२ ) आचारभेदामुळें ( आचार वेगळे वेगळे असल्यामुळें ) शैवांचेंही भेद झाले आहेत, ते आतां सांगतों. १ सामान्यशैव, २ मिश्रशैव, ( ३३ ) ३ शुद्धशैव आणि ४ वीरशैव. देवि, यांचें लक्षण क्रमानें सांगतों ऐक. ( ३४ ) सामान्य शैवाचें लक्षणः परमात्मा शिवाची पूजा वगैरे करणें व सर्व ठिकाणीं शिवाची भावना ठेवणें हें सामान्य लक्षण झालें. ( ३५ ) जेव्हां जेव्हां शिवलिंग दृष्टीस पडेल, तेव्हां तेव्हां त्या शिवाची पूजा करणें, प्रदक्षिणा घालणें, नमस्कार करणें, किंवा दर्शन घेणें ( ३६ ) पार्वति, शिवचिन्हांच्या ठिकाणीं, शिवभक्तांचे ठिकाणीं व शिवसंबंधीं जीं जीं कार्यें पडतील त्या त्या कार्यांच्या ठिकाणीं मनानें, वाणीनें, शरीरानें व आचरणानें नेहमीं भक्ति ठेवणें ( ३७ ) हीं सामान्य शैवांचीं लक्षणें होत. आतां मिश्रशैवांचीं लक्षणें सांगतों ऐक, शिव, विष्णु, ब्रह्मदेव, षण्मुख, गणपति, सूर्य, व देवी या सगळ्यांना मिसळून पूजा करणें, ( ३८ ) सर्व ठिकाणीं ईश्वराची भावना ठेवणें किंवा शिवाला अधिक महत्व देऊन शिवधर्माखेरीज अन्य धर्मांचें ही भक्तीनें आचरण करणें, ( ३९ ) इत्यादि रीतीनें दुसऱ्या देवाची पूजा मिसळल्यामुळें अशा भक्ताला मिश्रशैव ह्मणतात. पार्वति, या पुढें

शुद्धशैवमिति प्रोक्तं तद्भवं शैवमुच्यते ॥ एक एव महादेवः सांबः सत्यादिलक्षणः ॥ ४० ॥ तदन्यदेवास्तद्भक्तास्तदुद्भूतास्तदाश्रिताः ॥ लिंगस्य पूजावेलायां ये चान्ये देवसत्तमाः ॥ तेषामावरणत्वेन पूजां कृत्वा न चान्यथा ॥ ४१ ॥ गुरुणा दत्तलिंगं तु करपीठेऽपि वा यजेत् ॥ गुरूपदिष्टनियमात्सावधानं समाचरेत् ॥ ४२ ॥ प्रमादात्पतिते लिंगे नष्टे दग्धे हृतेऽपि वा ॥ विनिर्गते ततः पीठाद्येन केन च दूषिते ॥ ४३ ॥ गुरुपादांबुजं स्मृत्वा जप्त्वाऽघोरं तदाज्ञया ॥ तल्लिंगमेव वान्यद्वाधारयेत्पूजयेत्पुनः ॥ ४४ ॥ प्रमादान्नियमे लुप्ते मूलपंचाक्षरीं जपेत् ॥ प्रायश्चित्तमिदं देवि व्रतजातादिलोपने ॥ ४५ ॥ शुद्धशैवमिति प्रोक्तं वीरशैवमतः शृणु ॥ सर्वेषामपि शैवानां वीरशैवं महत्तरम् ॥ ४६ ॥ सुलभा देवपूजा च सुलभं च क्रियावहम् ॥ अल्पक्रियं बहुफलं वीरशैवं महेश्वरि ॥ ४७ ॥ अन्येषामपि शैवानां मुक्तिर्जन्मत्रयेण च ॥ अन्य-

---

शुद्ध शैवाचें लक्षण सांगतों ऐक. ( ४० ) शुद्धशैव ज्याला ह्मणतात त्यापासून उत्पन्न झालेल्या मनुष्याला शैव ह्मणतात. सत्य वगैरे ( सच्चिदानंद ) लक्षणांनीं युक्त व पार्वतीसह असणारा महादेव हाच काय तो मुख्य देव असून ( ४१ ) त्यावांचून दुसरे देव हे त्याचे भक्त, त्याच्या पासून झालेले व त्याच्या आश्रयानें राहणारे असें समजून, लिंगपूजेच्या वेळीं जे दुसरे देव असतील त्यांची मुख्यत्वानें पूजा न करितां आवरणत्वानें पूजा करावी. ( ४२ ) किंवा गुरूंनीं दिलेल्या लिंगाची हस्तपीठावर पूजा करावी. गुरूंनीं सांगितलेल्या नियमांप्रमाणें हुशारीनें वागावें. ( ४३ ) चुकून लिंग खालीं पडलें, हरवलें, जळालें, कोणी काढून घेतलें, हातांतून निघून गेलें किंवा कोणत्याही कारणानें दूषित झालें तर ( ४४ ) गुरूंचीं पावलें स्मरून, त्याच्या आज्ञेनें अघोर मंत्राचा जप करून त्याच लिंगाचें किंवा दुसऱ्या लिंगाचें धारण करून पुनः पूजा करावी. ( ४५ ) चुकून एखाद्या नियमाचा लोप झाला तर मूलपंचाक्षरीचा जप करावा. हे देवि कोणत्याही व्रतादिकाचा लोप झाला तरी त्याला हेंच प्रायश्चित्त होय. ( ४६ ) हें शुद्धशैवाचें लक्षण झालें. आतां वीरशैवाचें लक्षण ऐक. सगळ्या शैवांमध्यें वीरशैव धर्म अधिक श्रेष्ठ आहे. ( ४७ ) वीरशैव धर्मांत देवपूजा सोपी व क्रियाही सोप्या आहेत. हे पार्वति, वीरशैवधर्म थोड्या क्रियांचा असून पुष्कळ फळ देणारा आहे. ( ४८ ) दुसऱ्या सर्व शैवांना मुक्ति तीन जन्मांनीं

शैवं तु तत्सर्वं फलाल्पं च बहुक्रियम् ॥ ४८ ॥ वेदान्तजन्यं यज्ज्ञानं 'विद्येति' परिगीयते ॥ विद्यायां रमते यस्माद्वीर इत्यभिधीयते ॥ ४९ ॥ एक एवायमेतस्मिन्सर्वस्मिन्जगतीत्रये ॥ विशिष्ट ईर्यते यस्माद्वीर इत्यभिधीयते ॥ ५० ॥ वीरशैवलक्षणं तु ॥ वृत्तम् ॥ यो हस्तपीठे निजलिंगमिष्टं विन्यस्य तल्लीनमनःप्रचारः ॥ बाह्यक्रियासंकुलनिस्पृहात्मा संपूजयत्यंग स वीरशैवः ॥ ५१ ॥ अत्र निजेष्टलिंगमिति ॥ सा कला परमा सूक्ष्मा तत्वानां बोधिनी परा ॥ तामाकृष्य यथान्यायं लिंगे समुपवेशयेत् ॥ ५२ ॥ "इत्यागमवाक्यात्" स्वनाभिहृदयकण्ठभ्रूमध्यब्रह्मरंध्रेषु दिव्यस्थानेषु स्थितं ब्रह्मशिवरुद्रादिसंज्ञकं परमात्मरूपशिवलिंगमेव श्रीगुरुणा विधिवदुपसन्नाय सच्छिष्याय वीरशैवाय पूर्वोक्तप्रकारेण करपीठे प्रतिष्ठितं तल्लिंगं वीरशैवस्य स्वीयप्राणलिंगम् ॥ स्थावरलिंगमनुपदिष्टत्वात्परकीयम् ॥ तस्मादनुपदिष्टस्थावरलिंगपूजाव्या-

---

मिळते. तसेंच दुसऱ्या सर्व शैवधर्मांत क्रिया पुष्कळ असून फळ फार थोडें मिळते. (४९) वेदान्ता पासून उत्पन्न होणारें जें ज्ञान त्याला विद्या ह्मणतात. अशा विद्येमध्यें ज्याच्या योगानें (ज्या धर्माच्या योगानें) मनुष्य रममाण होतो त्याला वीर ह्मणतात. (५०) या तिन्ही लोकांमध्यें हा एकच देव-(शिव) काय तो मुख्य असें ज्यांत जाहीर केलें जातें, त्याला वीर ह्मणतात. वीरशैवांचें लक्षण (५१) मुक्त जो हस्तपीठावर आपलें इष्टलिंग ठेवून मनाची गति त्या लिंगामध्यें लीन करून, बाहेरील अनेक क्रियांपासून अलग राहून चांगली पूजा करितो, तोच वीरशैव होय." येथें आपलें इष्टलिंग ह्मणजे '(५२) तत्वांचा बोध करणारी जी अत्यंत सूक्ष्म अशी परा कला, ती काढून यथायोग्य रीतीनें लिंगांत शिरवावी;' असें आगमांत वाक्य असल्यामुळें आपला नाभिदेश हृदय, कंठ, भ्रूमध्य (दोन्ही भिंवयांमधील जागा) व ब्रह्मरंध्र या दिव्यस्थानीं असलेलें ब्रह्म, शिव, रुद्र वगैरे नांव ज्याला आहे तें परमात्मरूप शिवलिंगच श्रीगुरु शरण आलेल्या व पात्र अशा वीरशैव शिष्याला पूर्वी सांगितलेल्या प्रकारानें विधीनें हस्तपीठावर स्थापून देतात. तें लिंग वीरशैवांचें प्राणलिंग होय. स्थावरलिंग गुरूंनीं दिलेलें नसल्यामुळें अयोग्य होय. ह्मणून गुरूंनीं ज्याची पूजा करण्यास सांगितलें नाहीं त्या स्थावर लिंगाची पूजा येऊं नये ह्मणून स्थावर-

वृत्त्यर्थं निजमिति विशेषणं कृतम् ॥ तस्माद्गुरूपदिष्टप्राणलिंगादन्यलिंगस्य पूजनं वीरशैवैर्नकर्तव्यमित्यर्थः ॥ बाह्यक्रियासंकुलनिस्पृहात्मेति तत्रैव करपीठकथनाध्याये ॥ सिंहासने शुद्धदेशे सुरम्ये रत्नचित्रिते ॥ शिवलिंगस्य पूजा या सा बाह्या भक्तिरुच्यते ॥ ५३ ॥ लिंगे प्राणं समाधाय प्राणलिंगं तु शांभवम् ॥ स शरीरं मनः कृत्वा न किंचिच्चिन्तयेद्धृदि ॥ साऽभ्यन्तरा भक्तिरिति प्रोच्यते शिवयोगिभिः ॥ ५४ ॥ इत्युक्तत्वात् बाह्यभक्तौ सिंहासनपूजायां कारिताः याः क्रियाः आत्मशुद्धिः स्थानशुद्धिः द्रव्यशुध्दिः मंत्रशुध्दिः लिंगशुध्दिः शोषण–दाहन–प्लावनांगन्यासाव्हानविसर्जननासिकाग्रहणरेचकपूरककुंभकप्राणायामजठराकुंचनप्राचीवीक्षणमौनमुद्राद्दगुन्मेलनादिकाः बाह्यक्रियास्तासां संकुलं तस्मान्निस्पृहात्मा निवृत्तचित्तः सन् संपूजयति सम्यक्पू-

---

लिंगाची पूजा वगळण्याकरितां ( वरील ५१ व्या श्लोकांत इष्टलिंग या शब्दामागें ) 'आपलें' हें विशेषण योजिलें आहे. यावरून गुरूंनीं दिलेल्या प्राणलिंग खेरीज ( इष्टलिंगावांचून ) दुसऱ्या लिंगाची पूजा वीरशैवांनीं करूं नये असा भावार्थ झाला. आतां ( वरील ५१ व्या श्लोकांतील ) 'बाहेरील अनेक क्रियांपासून अलग राहून' म्हणजे ( या वाक्याचा अर्थ ) काय? तर तेथेंच ( ह्या श्लोक ज्या शंकरसंहिता ग्रंथांतून घेतला आहे तेथें ) करपीठ कथन नांवाच्या अध्यायांत ( ५३ ) "पवित्र जागीं रत्नखचित अशा सुंदर सिंहासनावर जी शिवलिंगाची पूजा करण्यांत येते तिला बाह्यभक्ति म्हणतात. ( ५४ ) लिंगामध्यें प्राणाला शिरवून आणि शरीरासुद्धां मनाला शिवाचें प्राणालिंग करून कशाचेंही हृदयांत चिंतन करूं नये. हिला शिवयोगी अंतरंगभक्ति ह्मणतात." असें ह्मटलें आहे. ह्मणून बाह्यभक्तीमध्यें सिंहासनावरील पूजेंत ज्या आत्मशुद्धि स्थानशुद्धि, ( पूजेला घेतलेलें ) द्रव्यशुद्धि, मंत्रशुद्धि, लिंगशुद्धि शोषण, दाहन, प्लावन, अंगन्यास, आव्हान, विसर्जन, नाकधरणें, रेचक, पूरक, कुंभक, प्राणायाम, पोट आंत ओढून घेणें ( जालंदर वगैरे बंध करणें, ) नासिकाग्र पाहणें, मौन धरणें, दृष्टि अर्धी उघडून अर्धी झांकणें इत्यादि–बाह्य क्रिया त्याचा जो समूह ( अनेक क्रिया ) त्यापासून अलग राहून, ह्मणजे त्यांवरील चित्त काढून घेऊन ( त्यांवर मन न जाऊं देतां ) चांगली पूजा करितो ह्मणजे चांगल्या रीतीनें पूजा

जयतीत्यर्थः ॥ पूजायाः समीचीनत्वं कथमितिचेदुच्यते ॥ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥ यथा चालिंगितः पुत्रस्तथा चालिंगितः पतिः ॥ ५५ ॥ इति वचनादन्तराराधनमेवालमिति केचन वदन्ति ॥ गवां सर्पिः शरीरस्थं न करोत्यात्मपोषणम् ॥ निःसृतं कर्मरचितं पुनस्तासां तु भेषजम् ॥ ५६ ॥ एवमन्तः शरीरस्थसर्पिवत्परमेश्वरः ॥ विना चोपासनां देवो न करोति हितं नृणाम् ॥ ५७ ॥ इति वचनाद्बाह्याराधनमेवालमिति केचन वदन्ति ॥ तस्माल्लिंगपूजनं तथैकविधमेव न भवति ॥ किंतु ॥ बाह्ये जागृदवस्थायामनुभूतार्थ एव हि ॥ अन्तः स्वप्नदशायां तु यथेह परिदृश्यते ॥ ५८ ॥ तथान्तर्यजनं नित्यं बहिर्यजनपूर्वकम् ॥ कर्तव्यं स्वेष्टलिंगस्य चार्चनं तन्मनीषिभिः ॥ ५९ ॥ इत्यागमवचनाच्छिवरहस्ये ॥ इष्टलिंगं प्राणलिंगमेकीकृत्य समर्चयेत् ॥ मणिमालां मं-

---

करितो असा अर्थ. आतां ही पूजा चांगली कशी? अशी शंका असेल तर त्याचें उत्तर असें आहे कीं:–" ( ५५ ) मनुष्यांच्या बंधाला किंवा मोक्षाला कारण मन हें होय. स्त्री आपल्या मुलाला जसें आलिंगन देते, तसेंच आपल्या नवऱ्यालाही देते ( परंतु पुत्राला आलिंगन देतांना जो तिचा भाव असतो तोच नवऱ्याला आलिंगन देतांना नसतो. पुत्राला आलिंगन देतांना कोणी गैर माहितीच्या मनुष्यानें तिला पाहिलें व तो तिला दोष देऊं लागला तर ती दोषाला पात्र नाहीं. कारण पुत्राला आलिंगन देतांना तिचा शुद्धभाव असतो." ) या वचनाला अनुसरून अंतरंगभक्ति असली ह्मणजे पुरे असें कित्येक ह्मणतात. " ( ५६ ) तूप हें गाईच्या शरीरांतच ( कांसेंतील दुधांत ) गुप्त असतें, परंतु त्यायोगानें त्या गाईचें पोषण होत नाहीं. तें जेव्हां बाहेर काढून त्याजवर क्रिया ( घुसळणें वगैरे ) करावी तेव्हां त्यांना खायाला हितकर होतें. ( ५७ ) या तुपाप्रमाणेंच परमेश्वर शरीरांत आहे. परंतु उपासने शिवाय तो देव मनुष्याला पावत नाहीं." या वचना प्रमाणें बाह्यभक्ति केली ह्मणजे बस्स आहे, असें कित्येक जण ह्मणतात. म्हणून लिंगपूजाही तशी एकच प्रकारची नाहीं. परंतु " ( ५८ ) बाहेर जागृतावस्थेत ज्याचा अनुभव आपण घेतों, तेंच स्वप्नांत दिसत असतें. ( ५९ ) त्याप्रमाणें इष्टलिंगाच्या भक्तांनीं आपल्या इष्टलिंगाची नित्य पूजा करितांना बाह्यपूजा करून अंतरंगपूजा करावी." या आगमांतील वचनाप्रमाणें शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं,– " ( ६० ) इष्टलिंग व प्राणलिंग या

त्रमालामेकीकृत्य जपेत्सदा ॥ मातृका प्राणलिंगस्य मणिमालेष्ट-रूपिणः ॥ ६० ॥ इत्युक्तत्वाद्बाह्यान्तरयोरिष्टलिंगप्राणलिंगयोरर्चनं वीरशैवैः कर्तव्यम् ॥ तस्मादिष्टलिंगार्चनपुरःसरं प्राणलिंगपूजनं कृते सति तत्पूजनमेव सम्यक्पूजनम् ॥ तथा पूजयितारो वीर-शैवा इत्यर्थः ॥ शंकरसंहितायामुपरिभागे ॥ तदेव हस्तांबुजपीठ-मध्ये निधाय लिंगं परमात्मचिन्हम् ॥ समर्चयेदेकधियोपचारैर्न-रस्तु बाह्यान्तरभेदवर्जितैः ॥ ६१ ॥ इत्युक्तत्वात् तत्रैव करपीठ-कथनाध्याये ॥ शिष्यं प्रति गुरोर्वाक्यम् ॥ वत्स लिंगार्चनं नित्यं त्रिकालं कुरु भक्तितः ॥ पूजाद्रव्याणि संशोध्य शुचिस्तद्गतमा-नसः ॥ ६२ ॥ कुरुष्व वत्सोपचारान् षोडशस्नानपूर्वकान् ॥ बा-ह्यांस्तथाभ्यन्तरांश्च समाहितमनाः सदा ॥ ६३ ॥ वृत्तम् ॥ स्नानं सुचित्तसलिलेन हि पूर्णभावं वस्त्रं त्रिशक्तिगुणसंयुतयज्ञसूत्रं ॥ वि-द्यासुगंधमिव भूतदयाक्षतांश्च शब्दादिपुष्पचयमर्पय नित्यमंग ॥६४॥

---

दोहोंचें ऐक्य करून पूजा करावी. तसेंच जपण्याची रुद्राक्षमाळा आणि मं-त्राक्षरें हीं एक करून नेहमीं जप करावा. मंत्राक्षरें हीं प्राणलिंगाचीं आणि रु-द्राक्षमाळा ही इष्टलिंगाची आहे." असें ह्मटलें आहे, ह्मणून बाह्य जें इष्टलिंग आणि अंतरंग जें प्राणलिंग या दोहोंचीही वीरशैवांनीं पूजा केली पाहिजे. या-वरून इष्टलिंगाची आधीं पूजा करून मग प्राणलिंगाची पूजा केली ह्मणजे जी पूजा होते, ती चांगली पूजा होय. आणि त्याप्रमाणें जे पूजा करितात ते वी-रशैव होत असा ( वरील ५१ व्या श्लोकाचा ) अर्थ होतो. शंकरसंहितेंतील प-हिल्या भागांत ( ६१ ) परमात्मस्वरूप असें तेंच लिंग हस्तपीठावर ( हातावर ) ठेवून एकाग्र मनानें बाह्य व अंतरंग असा भेद ज्यांत नाहीं अशा उपचारांनीं त्याची पूजा करावी." असें ह्मटलें आहे. तेथेंच करपीठ कथन अध्यायांत गुरु शिष्याला उद्देशून सांगतातः—" ( ६२ ) वत्सा, रोज तीनवेळ लिंगाची भक्तीनें पूजा करीत जा. लिंगाचें चिंतन करीत पूजेचें सामान शुद्ध करून, ( ६३ ) वत्सा, स्नानासुद्धां सोळा बाह्य व अंतरंग ( मानसिक ) उपचार निश्चळ मनानें लिंगाला नेहमीं अर्पण करीत जा. ( ६४ ) मानसिक पूजेंतील उपचार सांग-तात ) शुद्धमन हेंच पाणी याचें ( प्राणलिंगाला ) स्नान घाल. पूर्ण भावरूपी वस्त्र अर्पण कर. त्रिशक्तींच्या ( इच्छाशक्ति, क्रियाशक्ति, व ज्ञानशक्ति या ति-हींच्या ) गुणांचा ( पक्षीं दोऱ्यांचा ) शिवदोरा अर्पण कर. विद्यारूपी गंध वहा. भूतदया ह्याच अक्षता वहा, शब्द वगैरे ( शब्द, स्पर्श, रस, गंध हे इंद्रियांचे

प्रज्ञामनोहंकृतिचित्तधूपं श्रोत्रादिपंचेंद्रियदीपजालम् ॥ तद्वासनातैलयुतं च देहि जीवोपहारं सुखदुःखबाह्यम् ॥ ६५ ॥ गुणत्रयाख्यतांबूलं प्राणार्पणनमस्कृतिम् ॥ शान्तिपुष्पांजलिं देहि चैकभावविसर्जनम् ॥ ६६ ॥ एवमभ्यन्तरद्रव्यसंभृतं शिवपूजनम् ॥ कृत्वा निधेहि सततं लिंगं वस्त्रेण वेष्टितम् ॥ ६७ ॥ मस्तके कंधरे कक्षे वक्षस्यथ करस्थले ॥ नाभेरधस्तात्सततं प्रमादान्नैव धारयेत् ॥ ६८ ॥ लिंगं तु त्रिविधं प्रोक्तं स्थूलं सूक्ष्मं परात्परम् ॥ इष्टलिंगमिदं स्थूलं यद्बहिर्धार्यते तनौ ॥ ६९ ॥ प्राणलिंगं तु यत्सूक्ष्मं तदन्तर्भावनामयम् ॥ परात्परं तु यत्प्रोक्तं तृप्तिलिंगं तदुच्यते ॥ ७० ॥ इष्टलिंगमिदं साक्षादरिष्टपरिहारकम् ॥ धारयेद्वधानेन शरीरे सर्वदा बुधः ॥ ७१ ॥ बाह्यपीठार्चनादेतत्करपीठार्चनं वरम् ॥ सर्वेषां वीरशैवानां मुमुक्षूणां निरंतरम् ॥ ७२ ॥ इत्युक्तत्वाच्च वीरशैवेषु ब्राह्मण्यं वैष्णवादिष्विव सामानाधिकरण्येन प्रतिभाति ॥ तथा च स्कांदे ॥ क्रिमिकीटपतंगेभ्यः पशवः

---

विषय ) हींच खरोखर फुलें समजून रोज वहा. ( ६५ ) शहाणपणाचा जो मनांतील अहंकार त्याचा व चित्ताचा धूप घाल. श्रोत्र वगैरे पंचेंद्रियांचा दीप-त्या इंद्रियांच्या ज्या वासना तेंच तेल घालून–अर्पण कर. सुखदुःखरहित जीवरूपी नैवेद्य दाखीव. ( ६६ ) तीन ( सत्व, रज, तम ) गुणांचा विडा अर्पण करून प्राणार्पणरूपी नमस्कार घाल. शांतिरूप पुष्पांजली देऊन एकभावरूपी विसर्जन कर. ( ६७ ) याप्रमाणें मानसिक उपचार अर्पण करून शिवपूजा करून लिंग नेहमीं वस्त्रांत गुंडाळून ठेव. ( ६८ ) मग तें मस्तकावर, गळ्यांत, काखेंत, हृदयावर किंवा हातांत धारण कर. परंतु चुकून नाभीच्या खालीं केव्हांही धारण करूं नये. ( ६९ ) लिंगाचे तीन प्रकार आहेतः १ स्थूल, २ सूक्ष्म, व ३ परात्पर. बाहेर शरीरावर जें लिंग धारण करण्यांत येतें, तें स्थूल लिंग होय. ( ७० ) मनानें भाविलेलें जें भावनामय प्राणलिंग तें सूक्ष्म लिंग होय. ज्याला तृप्तिलिंग ह्मणतात, तें परात्पर लिंग होय. ( ७१ ) सर्व संकटें प्रत्यक्ष दूर करणारें हें इष्टलिंग शहाण्यानें नेहमीं भक्तीनें शरीरावर धारण करावें. ( ७२ ) मोक्ष इच्छिणाऱ्या सर्व वीरशैवांनीं बाह्य सिंहासनावर पूजा करण्यापेक्षां करस्थलावर हें लिंग निरंतर पूजणें अधिक बरें." असें ह्मटलें आहे. यावरून वैष्णवांप्रमाणें वीरशैवही ब्राह्मण्य असल्यामुळें ब्राह्मण आहेत असें होतें. तसेंच स्कंद पुराणांतः–" ( ७३ ) किडे, जंतु, पतंग यांपेक्षां बुद्धीनें पशु अधिक यो-

प्रज्ञयाधिकाः ॥ पशुभ्योऽपि नराःश्रेष्ठास्तेषु श्रेष्ठा द्विजातयः ॥७३॥ द्विजातिष्वधिका विप्रा विप्रेषु ऋतुबुद्धयः ॥ ऋतुबुद्धिषु कर्तारस्तेभ्यः सन्यासिनोऽधिकाः ॥ ७४ ॥ तेभ्यो विज्ञानिनः श्रेष्ठास्तेषु शंकरपूजकाः ॥ तेषु श्रेष्ठा महाभाग मम लिंगांगसंगिनः ॥७५॥ लिंगांगसंगिष्वधिकः षट्स्थलज्ञानवान्भवेत् ॥ स वंद्यः सर्वदा पूज्यः संसारविजिगीषुभिः ॥ बहुनोक्तेन किं वत्स स एवाहं न संशयः ॥ ७६ ॥ "इत्युक्तत्वात्" ॥ अष्टादशानां वर्णानां श्रेष्ठो माहेश्वरो जनः ॥ इत्यादिवचनप्रामाण्याच्च प्राणिवर्गतारतम्येऽपि माहेश्वरादिपदवाच्यानां वीरशैवानामेव वर्णोत्कृष्टत्वं निर्णीतं भवति ॥

॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे वीरशैवाधिक्यशैवभेदादिविवरणनिरूपणं नाम सप्तमप्रकरणं समाप्तम् ॥

---

ग्यतेचे आहेत. पशूंपेक्षां मनुष्यें श्रेष्ठ होत. मनुष्यांमध्यें द्विज ( ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ) श्रेष्ठ होत. ( ७४ ) द्विजांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ, ब्राह्मणांतही यज्ञ करण्याची ज्यांची इच्छा असते ते श्रेष्ठ, यज्ञेच्छूंमध्यें यज्ञ करणारे श्रेष्ठ व त्यांहून सन्यासी अधिक योग्यतेचे होत. ( ७५ ) सन्याशांपेक्षां ज्ञानी श्रेष्ठ ज्ञान्यांपेक्षां शंकराची पूजा करणारे श्रेष्ठ व हे महाभागा, त्या शंकरपूजकांमध्येंही लिंगांगसंयोग करणारे माझे भक्त श्रेष्ठ होत. ( ७६ ) लिंगांग संयोग्यांमध्येंही षट्स्थलांचें ज्याला ज्ञान झालें आहे तो श्रेष्ठ असून संसारांतून तरून जाणाऱ्यांना तो नेहमीं वंद्य व पूज्य होय. वत्सा फार काय सांगूं? ( शंकर म्हणतात ) तोच मी आहे यांत संशय नाहीं." असें म्हटलें आहे. यावरून व अठरापगड जातींमध्यें माहेश्वर श्रेष्ठ आहेत अशा वचनांचें प्रमाण असल्यामुळें प्राणिवर्गांतील कमी अधिक योग्यतेमध्येंही माहेश्वर वगैरे शब्दांनीं दर्शविले जाणारे वीरशैवच सर्व वर्णांमध्यें श्रेष्ठ आहेत असा निर्णय होतो.

याप्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील वीरशैवाधिक्यशैवभेदादिविवरणनिरूपण नांवाचें सातवें प्रकरण संपलें.

---

## ॥ अथ वीरशैवप्रकाशिकोक्तसप्तविधशैवलक्षण चतुर्विधवीरशैवलक्षणतदाचरणकथनन्नाम अष्टमप्रकरणम् ॥

### पार्वत्युवाच

भगवन् श्रोतुमिच्छामि शैवानां भेदमादरात् ॥ तेषां तेषां लक्षणानि तैस्तैःकार्यं च मे वद ॥ इति संप्रार्थितः शंभुस्तत्प्रभेदं प्रचक्रमे ॥ १ ॥

### ईश्वर उवाच

शैवं च वीरशैवं च द्विविधं शैवमीरितम् ॥ शैवं सप्तविधं ज्ञेयं वीरशैवं चतुर्विधम् ॥ २ ॥ अनादिशैवं प्रथमं आदिशैवं द्वितीयकम् ॥ महाशैवं तृतीयं स्यादनुशैवं चतुर्थकम् ॥ ३ ॥ अनंतरं पंचमं च षष्ठं प्रवरशैवकम् ॥ अंत्यशैवमिति प्रोक्तं सप्तमं शृणु मत्प्रिये ॥ ४ ॥ एतेषां सप्तशैवानां वच्मि ते लक्षणानि वै ॥ अहमेव परं ब्रह्म मत्तः सर्वोत्तमो न हि ॥ इति निश्चितवान् योऽसौ सोऽनादिशैवमुच्यते ॥ ५ ॥ पंचाक्षरीदीक्षितो यः स आदिशैवमुच्यते ॥ शिवस्य मुखरूपं यो ध्यात्वा मनसि पूजयेत् ॥ ६ ॥ महाशैवमिति प्रोक्तं परसंज्ञकलिंगकम् ॥ योऽसौ समर्च-

---

(वीरशैव प्रकाशिका) (१) पार्वती ह्मणते–' भगवन्, शैवांचे भेद भक्तीनें ऐकण्याची माझी इच्छा आहे. त्यांचीं त्यांचीं लक्षणें आणि त्यांचें त्यांचें कर्तव्य मला सांगावें. अशी प्रार्थना ऐकून शंकर शैवांचे भेद सांगूं लागले. ईश्वर ह्मणतातः-" (२) शैवांत शैव व वीरशैव असे दोन भेद आहेत. व त्या शैवांचे पुनः सात प्रकार असून वीरशैवांचे चार प्रकार आहेत. (३) १ अनादिशैव, २ आदिशैव, ३ महाशैव, ४ अनुशैव, (४) ५ अनंतरशैव, ६ प्रवरशैव, आणि प्रिये ऐक ७ व्या प्रकाराला अन्त्यशैव ह्मणतात. (५) या सातही शैवांचीं मी तुला लक्षणें सांगतों मीच परब्रह्म वस्तु असून मजहून श्रेष्ठ कोणी नाहीं असा ज्याचा निश्चय आहे, त्याला अनादिशैव ह्मणतात. (६) पंचाक्षरी मंत्राची जो दीक्षा घेतो, त्याला आदि-शैव ह्मणतात. शिवाच्या मुखरूपाचें मनांत ध्यान-करून जो पूजा करितो, (७) तो महाशैव होय. परमात्मस्वरूपी लिंगाची जो

येन्नित्यमनुशैवमिति स्मृतम् ॥ ७ ॥ परेशस्य स्वरूपे यो भेदाभेदविवर्जितः ॥ योऽसौ समर्चयेन्नित्यमनंतरमितीरितम् ॥ ८ ॥ परस्य मूर्तिमावाह्य विसर्जनपरश्च यः ॥ प्रोक्तः प्रवरशैवश्च सर्वतंत्रेषु तत्वतः ॥ ९ ॥ परस्य लांछनं दृष्ट्वा नमस्कृत्य सुनिश्चितः ॥ अंत्यशैवमिति प्रोक्तं सप्तानां लक्षणं त्विदम् ॥ १० ॥ पुनरेव हि शैवं तु चतुर्विधमनंतरम् ॥ वामदक्षिणमिश्रेति सिद्धान्तं तत्ववेदिभिः ॥ ११ ॥ शक्तिः सर्वोत्तमा यत्र तद्वाममिति कथ्यते ॥ यत्रोत्तमो भैरवोऽभूद्दक्षिणः परिकीर्तितः ॥ १२ ॥ सप्तमातृपरो यस्तु मिश्रमित्यभिधीयते ॥ शिवः सर्वोत्तमो यत्र सिद्धान्तो वीरशैवकः ॥ १३ ॥ स एव मुक्तेः सोपानं शैवतंत्रेषु निश्चितम् ॥ शापदग्धदुराचारदुर्बुद्धीनां च दुर्लभम् ॥ १४ ॥ सिद्धान्तो वीरशैवश्च पुनश्चापि चतुर्विधः ॥ धर्मार्थकाममोक्षेति यथा मुक्तेश्चतुर्विधम् ॥ १५ ॥ सामान्यवीरशैवेति वीरशैवमतः परम् ॥ विशेषवीरशैवेति निराभारी तथैव च ॥ १६ ॥ यथा क्षीरे तक्रदधि-

---

रोज पूजा करितो, त्याला अनुशैव ह्मणतात. ( ८ ) परमेश्वराच्या स्वरूपाविषयींचा भेदाभेद टाकून देऊन जो त्याची नित्य पूजा करितो, त्याला अनंतरशैव ह्मणतात. ( ९ ) परमेश्वराच्या मूर्तिच्या आवाहनापासून विसर्जनापर्यंतचे विधी जो करितो, त्याला मुख्यत्वेंकरून सर्व तंत्रांत प्रवरशैव असें नांव दिलें आहे. ( १० ) परमात्म्याची मूर्ति पाहिल्यावरोवर नमस्कार करावा हाच ज्याचा निश्चय असतो, त्याला अंत्यशैव म्हणतात. अशीं हीं सातप्रकारच्या शैवांचीं लक्षणें झालीं. ( ११ ) या खेरीज तत्ववेत्त्यांनीं वाम, दक्षिण, मिश्र, व सिद्धांत असें शैवांचे आणखी चार भेद केले आहेत. ( १२ ) जेथें शक्ति श्रेष्ठ मानिली जाते, त्याला वामशैव ह्मणतात. जेथें भैरव श्रेष्ठ मानिला जातो, त्याला दक्षिणशैव ह्मणतात. ( १३ ) सात मातृकांना जेथें महत्व देण्यांत येतें, तो मिश्रशैव होय आणि शिवच सर्वांत श्रेष्ठ असें जेथें मानण्यांत येतें, तो सिद्धांत वीरशैव होय. ( १४ ) हा सिद्धांत वीरशैवपंथच मुक्तीचा मार्ग होय असें शैवतंत्रांत निश्चयानें सांगितलें आहे. जे शापामुळें भ्रष्ट झाले आहेत व जे वाईट आचरणाचे आणि दुष्ट बुद्धीचे आहेत, त्यांना हा मार्ग दुर्लभ आहे. ( १५ ) ज्याप्रमाणें धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे मुक्तीचे चार प्रकार आहेत, त्याप्रमाणें सिद्धांत वीरशैवांचेही चार प्रकार आहेत. ( १६ ) १ सामान्य वीरशैव २ वीरशैव, ३ विशेष वीरशैव व ४ निराभारी वीरशैव. ( १७ ) ज्याप्रमाणें दुधांतील ताक, दहीं

नवनीतघृतादिकम् ॥ एकैकस्याधिको भूत्वा एकैकस्य गुणः पृथक् ॥ १७ ॥ प्रदर्शयित्वा तृप्यन्ते सर्वे एकीभवंति हि ॥ तथैव वीरशैवोऽसौ व्यावहारिकभेदवान् ॥ १८ ॥ एकस्य कर्म चैकस्य न चेदपि तथैव च ॥ एकस्मिन्नपि चैकस्य मिश्रीभावो न चेदपि ॥ १९ ॥ चतुर्णामपि मुक्तौ तु गतिरेका न संशयः ॥ तस्माच्च वीरशैवोऽसौ सर्वोत्कृष्टो न संशयः ॥ २० ॥ परब्रह्ममुखोद्भूतपंचऋत्विग्भिरेव च ॥ प्राप्य दीक्षां यथाशास्त्रं गुरुजंगमलिंगकान् ॥ २१ ॥ सेवयित्वा यथा शक्तिरयाचनपरो भवेत् ॥ स्वयं दानपरो यस्तु सामान्यो वीरशैवकः ॥ २२ ॥ परब्रह्मस्वरूपेषु सद्योजातादिपंचसु ॥ मुखेषु जनिताचार्यैर्दीक्षितोऽत्याश्रमी च सः ॥ २३ ॥ लिंगं प्राणमिति ज्ञात्वा पाशुपत्यादिकर्मसु ॥ सुनिष्ठितं परं ब्रह्म पूजायां तत्परश्च यः ॥ २४ ॥ स एव वीरशैवेति प्रथितस्तत्र निष्ठितैः ॥ परस्य ब्रह्मणः पंचमुखेषूद्भूतपंचभिः ॥ २५ ॥ आचार्यै-

---

लोणी व तूप हे पदार्थ एकाहून एक वरचढ असून प्रत्येकांत वेगवेगळा गुण आहे, ( १८ ) ते आपापला गुण दाखवून तृप्त करितात व ( दुधांत ) ऐक्य भावानें ( एके ठिकाणीं ) आहेत; त्याप्रमाणेंच वीरशैवांचे हे चार व्यावहारिक भेद ( व्यवहारांत दाखवावयाला मात्र भेद, परंतु वास्तविक एकरूप ) आहेत. ( १९ ) एकाचें जें कर्म, तें दुसऱ्याचें जरी नाहीं, तसेंच एक दुसऱ्यामध्यें मिसळलेला जरी नाहीं, ( २० ) तथापि मुक्तीमध्यें या चोहोंची सारखीच गति आहे ( एकाला मुक्ति अधिक किंवा लवकर मिळत असून दुसऱ्याला ती कमी प्रतीची किंवा उशीरानें मिळते, असा भेद नसून चारही प्रकारच्या वीरशैवांना सारखीच मुक्ति मिळते, ) यांत शंका नाहीं. म्हणून हा वीरशैवधर्म निःसंशय सर्वोत्कृष्ट होय. ( २१ ) परब्रह्माच्या मुखांपासून झालेल्या पंचाचार्यांकडून शास्त्रांत सांगितलेल्या रीतीनें दीक्षा घेऊन, गुरु, लिंग व जंगम यांची ( २२ ) यथाशक्ति जो सेवा करितो, आणि दुसऱ्याजवळ याचना न करितां जो स्वतः दान करणारा होतो, तो सामान्य वीरशैव होय. ( २३ ) परब्रह्म-स्वरूपाच्या सद्योजात वगैरे पांच मुखांपासून उत्पन्न झालेल्या पंचाचार्यांकडून दीक्षा घेऊन जो अत्याश्रमी होतो. ( २४ ) लिंगच आपला प्राण असें समजून पाशुपत्यादि कर्मे जो भक्तीनें करितो, आणि परमात्म्याच्या पूजेंत जो तत्पर असतो, (२५) याला शिवभक्त वीरशैव म्हणतात. परब्रह्माच्या पांच मुखांपासून निघालेल्या पांच

दीक्षितो भूत्वा पंचमुद्रांकितश्च यः ॥ महावैराग्यशाली च संप्राप्तमनुभूय च ॥ २६ ॥ अप्राप्ते निरपेक्षः सन् सोऽहं ब्रह्मेति निश्चितः ॥ त्यक्त्वा च लौकिकाचारान्विशेषो वीरशैवकः ॥ २७ ॥ विराट्स्वरूपभगवद्ब्रह्मणो मुखपंचकान् ॥ समुद्भूतैर्दीक्षितो यो दूरीकृतमलत्रयः ॥ २८ ॥ षट्स्थलान्ते परब्रह्म सोऽहमेवेति निश्चितः ॥ मुक्तिमार्गं समाश्रित्य लौकिकाचारवर्जितः ॥ २९ ॥ स एव च निराभारी वीरशैव इतीरितः ॥ इतस्तत्तत्प्रभेदं च तत्तल्लक्षणमेव च ॥ ३० ॥ तैस्तैः कार्यं प्रवक्ष्यामि सावधानमनाः शृणु ॥ सामान्यवीरशैवानां लक्षणं वक्ष्यते मया ॥ ३१ ॥ पंचाक्षरीमंत्रयुतो भस्मरुद्राक्षचिन्हितः ॥ शुद्धान्तःकरणश्चैव गुरुदत्तेष्टलिंगकः ॥ ३२ ॥ तदन्यलिंगविष्णवादिदेवतास्वप्यनादरः ॥ स्वगोत्रप्रवरे निष्ठो गुरौ तनुसमर्पकः ॥ ३३ ॥ भूरुद्रेषु धनं चैव स्वेष्टलिंगे मन-

---

( २६ ) महाचार्यांकडून दीक्षा घेऊन, पांच मुद्रा धारण करून, कडक वैराग्य धरून, जितकें मिळेल तितक्यावर संतुष्ट राहून, ( २७ ) न मिळालेल्यावर जो मन ठेवीत नाहीं; आणि लौकिकाचार टाकून देऊन मीच ब्रम्ह आहे, असा ज्याचा निश्चय झाला आहे, तो विशेष वीरशैव होय. ( २८ ) विराट्स्वरूपी भगवान् परमेश्वराच्या पांच मुखांपासून उत्पन्न झालेल्या पंचाचार्यांकडून दीक्षा घेऊन, * तीन प्रकारचा मळ दूर करून, ( २९ ) षट्स्थलांचें ज्ञान जाणून त्याशेवटीं परब्रह्म तें मीच अशा निश्चयानें मुक्तिमार्गाचा आश्रय करून लौकिकाचारापलीकडे जो राहतो, ( ३० ) त्यालाच निराभारीवीरशैव असें ह्मणतात. आतां त्यांचा त्यांचा बारीक भेद, त्यांचें त्यांचें लक्षण ( ३१ ) आणि त्य चें त्यांचें कर्तव्य सांगतों, लक्ष्य देऊन ऐक. प्रथम सामान्य वीरशैवाचें लक्षण सांगतों ( ३२ ) त्यानें पंचाक्षरी मंत्राचा जप करावा. भस्म व रुद्राक्ष धारण करून शुद्धमनानें रहावें. गुरूंनीं जें इष्टलिंग दिलें असेल, ( ३३ ) त्यावांचून दुसऱ्या लिंगाची व विष्णु वगैरे देवतांची देखील भक्ति करूं नये. आपल्या गोत्रप्रवरावर निष्ठा ठेवावी. गुरूला देह अर्पण करून ( ३४ ) जंगमांना धन व इष्टलिंगाला मन रीतीप्रमाणें अर्पण करून फसवाफसवी करूं नये. ( जे पदार्थ अर्पण केले आहेत, ते तनु, मन, व धन आपले आहेत, असा अभि-

---

*तीन प्रकारचा मळ हा—आणवमल, मायामल व कार्मिकमल.

स्तथा ॥ यथानुसारतो दत्वा निर्वचनपरो भवेत् ॥ ३४ ॥ सद्भक्तिश्च शिवे वांछा शिवध्यानपरायणः ॥ शिवानुकूलव्यापारी शैवश्रवणतत्परः ॥ ३५ ॥ इत्यष्टविधभक्त्या च संयुतः सात्विकः सदा ॥ शिवः सर्वात्मकः सर्वेऽप्यन्तरात्मान एव च ॥ ३६ ॥ इति बुध्वा पुराणादौ स्वमतानुगुणेषु च ॥ आचार्योदितधर्मेषु रममाणः शिवानुगः ॥ ३७ ॥ इष्टलिंगं पतिश्चैव गुरुरेव पिता मम ॥ भूरुद्रास्तु स्वदेवाश्च इत्थं मनसि निश्चितः ॥ ३८ ॥ स्वगोत्रादन्यगोत्रेषु चतृष्वेव विवाहवान् ॥ प्रमादादिष्टलिंगं तु चोरादपहृतं भवेत् ॥ ३९ ॥ तदात्वघोरमंत्रं तु लक्षं जप्त्वा ततः शुचिः ॥ ततश्चतुर्भिराचार्यैर्युक्तेन गुरुणा ततः ॥ ४० ॥ दत्तं लिंगं गले

---

मान धरू नये. शरीर आपण वागवितों, तें गुरूला अर्पण केल्यावर तें आपलें नसून गुरूचें आहें असें समजून चालावें. असें न चालल्यास गुरूला फसविल्या सारखें होतें. मन इष्टलिंगाला अर्पण केल्यावर तें आपलें नसून आपण त्याहून वेगळे आहों असें समजावें असें न करितां मन आपलें अस समजून त्याच्या सारखें वागलें असतां इष्टलिंगाला फसविल्या प्रमाणें होतें. धन जंगमाला अर्पण केल्यावर, तें आपलें नसून जंगमांचें आहे. असा निश्चय करून त्या वरील आसक्ति सोडून द्यावी. ) तसें न करितां धनावर आसक्ति ठेविली तर जंगमांना फसविल्याचा दोष येतो. ( ३५ ) दृढभक्ति, धरावी शिवावर निष्ठा ठेवावी, शिवाचें नेहमीं ध्यान करावें, शिवाला अनुकूल अशाच क्रिया कराव्या. शिवाचेच गुण नेहमीं ऐकावें. ( ३६ ) याप्रमाणें अष्टविधभक्तीनें चालून नेहमीं सात्विक रीतीनें वागावें. शिव सगळ्यांत भरलेला असून सगळे शिवच आहेत, ( ३७ ) अशी बुद्धि ठेऊन आपल्या मताला अनुकूळ अशीं पुराणें वगैरे आनंदानें ऐकावीं, गुरूनीं सांगितलेले धर्म आनंदानें पाळावें, व शिवाला अनुसरावें. ( ३८ ) इष्टलिंग हा आपला पति, गुरु हा आपला पिता व जंगम हे आपले देव असा मनांत निश्चय वाळगावा. ( ३९ ) आपलें गोत्र सोडून वाकी राहिलेल्या चार गोत्रांतच सोयरिक करावी. चोरांनीं आपलें इष्टलिंग चोरिलें किंवा दुसऱ्या कांहीं चुकीमुळें तें आपल्या जवळून नाहींसें झालें, ( ४० ) तर अघोर मंत्राचा एकलक्ष जप करावा ह्मणजे तो मनुष्य शुद्ध होतो. नंतर चार आचार्यांसह गुरूनीं पुनः ( ४१ ) दिलेलें लिंग गळ्यांत वांधून शिवगायत्रीचा पुनः एकशे-

धृत्वा पुनरष्टोत्तरं शतम् ॥ जप्त्वा तु शैवगायत्रीं शुचिर्भूत्वा ततः परम् ॥ ४१ ॥ वृत्तम् ॥ आचार्यपादोदकतत्प्रसादौ स्वीकार्य निर्माल्यधरः स्वशीर्षे ॥ तुर्याश्रमाणामयमेव धर्मस्तथापरेषां न हि नास्तिकानाम् ॥ ४२ ॥ पापात्मपाषण्डकवेदबाह्याः संस्कारहीना अपि शापदग्धाः ॥ तेषामिदं कर्म न चोदितं मुदा सदाशिवेनोदितमत्र मानम् ॥ ४३ ॥ इति बुध्वा पूर्वरीत्या शुद्धान्तःकरणो भवेत् ॥ हस्तमस्तकसंयोगाद्गुरुणा भस्मधारिणा ॥४४॥ शिवमंत्रोपदेशेन लिंगांगी चाभवत्तदा ॥ भविस्त्रीसंगरहितः कंठवक्षःस्थलादिषु ॥ लिंगं बध्वा त्रिकालेषु जपस्नानपरायणः ॥ ४५ ॥ वृत्तम् ॥ प्रसूतिदीक्षासु तथा विवाहे श्राद्धे महापर्वणि पुण्यकाले ॥ शवादिसंस्थापनमुख्यकार्ये हित्वा स पंचार्यसमुद्भवांश्च ॥ न कर्मकर्ता गुरुलिंगजंगमे तथाष्टवर्णेष्वपि भक्तियुक्तः ॥ ४६ ॥ स्वगृहे गर्भिणी जाता भार्या पुत्री तथा स्नुषा ॥ तासामाचार्यमुख्यैश्च मंत्रोक्तविधिना ततः ॥ ४७ ॥ कुक्षं भस्मांचितं कृत्वा रेखात्रयसमन्वितम् ॥ त्रिमासेऽपि च षण्मासे नवमासे तथैव च ॥४८॥

---

आठ जप करून शुद्ध व्हावें. त्यानंतर ( ४२ ) आचार्यांचें पादोदक व प्रसाद यांचा स्वीकार करून मस्तकावर निर्माल्य धारण करावें. हाच अत्याश्रम्यांचा धर्म आहे. दुसऱ्या नास्तिकलोकांचा हा धर्म नाहीं. ( ४३ ) जे पापबुद्धीचे, पाखंडी, वेदविरुद्ध आचरणारे, संस्कारहीन व शापानें भ्रष्ट झालेले आहेत, त्यां करितां हें कर्म सांगितलेलें नाहीं. याला प्रमाण सदाशिवाचें आनंदानें सांगणें हें होय. ( ४४ ) असें समजून सर्व प्रकारानें शुद्धअंतःकरणानें रहावें. भस्म धारण करणाऱ्या गुरूंच्या हस्ताचा शिष्याच्या मस्ताकाशीं संबंध झाल्यावर, ( ४५ ) व शिवमंत्राचा उपदेश झाल्यावर, तो लिंगांगी होतो. अलिंगी स्त्रिशीं संग न करितां गळा, हृदय वगैरे ठिकाणीं लिंग बांधून त्रिकाळ जपरूपी स्नान करावें ( जप करावा. ) ( ४६ ) प्रसूतिकाळीं, दीक्षेच्या वेळीं तसेंच लग्नकार्यांत, श्राद्धांत, मोठ्या पर्वकाळीं, पुण्यकाळीं, व प्रेतविधि वगैरे मुख्य कार्यांमध्यें पंचाचार्यांच्या वंशजांना सोडून कर्में करूं नयेत. गुरु, लिंग व जंगम यांच्या ठिकाणीं आणि अष्टावरणामध्यें भक्ति ठेवून कर्में करावीं. ( ४७ ) आपल्या घरीं बायको, मुलगी किंवा सून गर्भिणी झाली ह्मणजे आपल्या मुख्य आचार्यांकडून मंत्रोक्त विधीनें तिच्या (४८) पोटावर भस्माच्या तीन रेघा लाववाव्या. तसेंच ति-

शीर्षोदये तथा लिंगं बध्वा नालं समाच्छिदेत् ॥ पंचवर्षे तथा दीक्षां कुर्याच्छास्त्रोक्तमार्गतः ॥ ४९ ॥ दंपत्योरेकनिष्ठात्वमेकदेवार्चनं तथा ॥ उभयोरेककर्मत्वमेकमेव व्रतादिकम् ॥ ५० ॥ उभयोरेकवर्णत्वमेकमंत्रे च निष्ठता ॥ भविभक्तेषु भिन्नत्वं तेष्वसंपर्कमाचरेत् ॥ ५१ ॥ भूरुद्रसेवासंकल्पयुक्तो भवति निष्ठितः ॥ पंचसूत्यादिरहितो गुरौ जंगमलिंगके ॥ ५२ ॥ गुणं कुलं शिलाभावं तीर्थे संदेहमेव च ॥ प्रसादेऽपि च संकल्पं रुद्राक्षेऽपि च नूत्नताम् ॥ ५३ ॥ मंत्रेष्वशुचिताभावमकल्प्य च समाहितः ॥ अत्याश्रमी कर्मकाण्डी सामान्यो वीरशैवकः ॥ ५४ ॥ इति सामान्यवीरशैवलक्षणम् ॥

अथ वक्ष्ये वीरशैवलक्षणं मोक्षदायकम् ॥ ललाटे भस्मरेखा-

---

सऱ्या, सहाव्या व नवव्या महिन्यांतही असेंच करावें. ( ४९ ) तसेंच ती बाळंत झाल्यावर मुलाचें मस्तक बाहेर आल्यावरोबर लिंग बांधून बेंबीची नाळ कापावी. पांचव्या वर्षी शास्त्रांत सांगितलेल्या रीतीनें त्या मुलाची दीक्षा करावी. ( ५० ) दंपतीनें ( नवरा व बायको या दोघांनीं ) एक निष्ठेनें वागावें, व एका देवाची पूजा करावी. उभयतांचें एक कर्म असावें ( सारखें कर्म असावें, किंवा कर्म करण्यांत एकमत असावें ) व उभयतांनीं एकच व्रत करावें, ( तात्पर्य नवरा व बायको या दोघांचें कोणत्याही कामांत ऐक्य असावें. ) ( ५१ ) दोघेंही एकाच जातीचे असून, एकाच मंत्रावर दोघांचा भाव असावा. अलिंगी भक्तांपासून त्यांनीं वेगळें रहावें. त्यांचा संपर्क होऊं देऊं नये. ( ५२ ) भक्तीनें जंगमांची सेवा करण्याचा संकल्प असावा. जननादि पांच दोष मानूं नयेत. गुरु, जंगम व लिंग या तिघांच्या ठिकाणीं ( ५३ ) अनुक्रमें गुण, कुल, पाषाण भाव, तसेंच तीर्थाविषयीं संशय, प्रसादाविषयीं विकल्प, रुद्राक्ष्यांच्या ठिकाणीं नवीनपणा, ( ५४ ) व मंत्राविषयीं अपवित्रता हे दोष मनांत न आणतां शांत मनानें रहावें. ( गुरूंचे गुण मोजूं नयेत, जंगमांचें कुळ पाहूं नये, लिंग ह्मणजे दगड आहे असें समजूं नये, तीर्थाविषयीं कोणताच संशय घेऊं नये, प्रसादाविषयीं विकल्प मनांत आणूं नये, रुद्राक्ष नवीन आहेत ह्मणून दोष देऊं नये व मंत्र अपवित्र आहे असें मनांत आणूं नये. हे अमंगळ विचार मनांतून काढून टाकावें. ) अत्याश्रमी व कर्मकांडी अशा सामान्य वीरशैवाचीं हीं कर्तव्यें झालीं. ( ५५ ) आतां मोक्ष देणारें वीरशैवाचें लक्षण सांगतों. तो कपाळावर भस्मा-

भिस्तिसृभिः संविराजितः ॥ ५५ ॥ पंचाक्षरीमंत्रजपः षड्विधस्नानतत्परः ॥ पीठाचार्यैः संधृतेष्टलिंगब्रह्मसमायुतः ॥ ५६ ॥ शिखासूत्रजटाभस्मशिवलांछनलांछितः ॥ *गोत्रसूत्रप्रवरवर्णशाखाविनिर्णयी ॥ ५७ ॥ अन्यगोत्रपरित्यागी स्वगोत्रे चैव तत्परः ॥ खेटखट्वादिसहितः स्वदारादिव्रतान्वितः ॥ ५८ ॥ पाशुपत्यागमे चैव सर्वदा मुख्यजीवनः ॥ ये शिवाचारसंपन्नास्तेष्वेवाभिरतस्सदा ॥५९॥ शिवाचारविहीना ये हित्वा तेष्वप्रवर्तकः ॥ दुष्टान्निगृह्य शिष्टानां परिपालनतत्परः ॥ ६० ॥ गुरुरेव शरीरं मे लिंगं मे मन एव च ॥ धनं मे जंगमा एव प्राणस्त्वाचार एव सः ॥ ६१ ॥ एवं मनसि निश्चित्य वर्तमानश्च नित्यशः ॥ निषिद्धार्थान्परित्यागी अन्यदेवालयानि च ॥ ६२ ॥ भविसंबंधयुक्ता ये हित्वा तांश्च प्रवर्तकः ॥ ब्रह्मण्येव सदाकामी क्रोधवान्करणादिषु ॥ ६३ ॥ लोभी प्रसाद-

---

चें त्रिपुंड्र लावतो, ( ५६ ) पंचाक्षरी मंत्राचा जप करीत असतो, सहा प्रकारचें स्नान करण्यांत तत्पर असतो, व सिंहासनाधिपति जे महाचार्य त्यांजकडून मिळालेलें ब्रह्मस्वरूप इष्टलिंग धारण करितो. ( ५७ ) शिखा, सूत्र, जटा, भस्म व लिंग हीं तो धारण करितो. आपलें गोत्र, सूत्र, प्रवर, वर्ण व शाखा यांचा त्यानें निर्णय करावा, ( ह्या गोष्टी समजून घेऊन लक्ष्यांत ठेवाव्या. ) ( ५८ ) दुसऱ्याचें गोत्र सोडून त्यानें आपल्या गोत्रांतच रहावें. खेट खट्वा इत्यादिकांनीं युक्त होऊन एकपत्न्यादि व्रतानें त्यानें चालावें. ( ५९ ) पाशुपत्य आगमावर त्याचा मोठा जीव असावा (पाशुपत्य आगमावर जीवापेक्षां अधिक प्रेम असावें.) शैव आचारानें चालणाऱ्याशींच नेहमीं गोडीनें वागावें. ( ६० ) जे शिवाचारानें वागत नाहींत त्यांच्याशीं व्यवहार ठेवूं नये, दुष्टांचा निग्रह करून सज्जनांचें संरक्षण करण्यांत कुशल असावें. ( ६१ ) गुरु हाच माझा देह, लिंग हेंच माझें मन, जंगम हाच माझा पैसा, व आचार हाच माझा प्राण, ( ६२ ) असा मनांत निश्चय करून त्याप्रमाणें रोज वागावें, निषिद्ध ( ज्यांच्याविषयीं शास्त्रांत प्रतिबंध सांगितला आहे अशा ) पदार्थांचा आणि ( शिवालयावांचून ) दुसऱ्या देवळांचा त्याग करावा. ( ६३ ) अलिंगी माणसांशीं जे संबंध ठेवतात, त्यांचा संबंध तोडून चालावें, परमात्म्याविषयींच नेहमीं इच्छा बाळगावी. इंद्रियांविषयीं क्रोध असावा. इंद्रियें ताब्यांत ठेवण्याच्या कामीं रागाचा उपयोग करावा. ( ६४ ) प्रसाद वगैरे महत्वाच्या गोष्टीविषयीं लोभ बाळगावा. जंग-

---

*गोत्रसूत्रप्रवरक–पाठांतर

मुख्येषु भूरुद्रेषु च मोहवान् ॥ अन्यव्रतेषु मदवान्मात्सर्यं च शिवद्विषि ॥ ६४ ॥ अष्टाविंशतिसंख्याकपाशुपत्यागमादिषु ॥ स्वमतानुगुणेष्वेव सत्कर्मसु सदा रतः ॥ ६५ ॥ स्वगोत्रादन्यगोत्रेषु चतृष्वेव विवाहवान् ॥ हित्वा स्नानजपादीनि न गृहीतान्नपानवान् ॥ ६६ ॥ मलमूत्रोत्सर्जनान्ते शुचिर्भूतः सदा व्रती ॥ दीक्षिताभिर्दंपतीभिः कृतनैवेद्यभोजनः ॥ ६७ ॥ सामान्यवीरशैवेषु दीक्षाश्राद्धादिकर्मसु ॥ विरागकृतवाणिज्यव्यवहारेषु सर्वदा ॥ शवस्थापनकर्मादावधिष्ठाता न संशयः ॥ ६८ ॥ द्रव्याशया हीनजातौ जातिभ्रष्टकुलेषु च ॥ अगृहीतान्नपानादिदीक्षाकर्मसु निष्ठितः ॥ ६९ ॥ सत्यवाग्मी सदाचारी स्वधर्मनिरतस्सदा ॥ जितेंद्रियपरो भूत्वा जगद्धरितकीर्तिमान् ॥ ७० ॥ अतिथींश्च निराभारान्दृष्ट्वा संरक्षणापरः ॥ लुप्तव्रतशिवाचारे दंडशिक्षादितत्परः ॥ ७१ ॥ इष्टलिंगयु-

---

मांविषयीं मोह असावा ( जंगमांवर प्रेम करावें. ) शिवव्रतावांचून दुसऱ्या व्रतांविषयीं मद बाळगावा, ( शिवव्रतांवांचून दुसरी व्रतें मी करणार नाहीं असा मनांत गर्व बाळगावा. ) शिवाचा द्वेष करणाराशीं मत्सर बुद्धीनें वागावें. ( ६५ ) पाशुपत्य वगैरे अठ्ठावीस आगमांचा नेहमीं परिपाठ असावा, व आपल्या मताला अनुकूल अशीं सत्कर्मेंच नेहमीं करावीं. ( ६६ ) आपलें गोत्र सोडून बाकीच्या चार गोत्रांशींच त्यानें अंगसंबंध ( सोयरीक ) करावी. स्नान, जप वगैरे केल्याशिवाय अन्नपाणी घेऊं नये. ( ६७ ) मलमूत्राचा त्याग केल्यावरोवर पवित्र व्हावें. नेहमीं नियमानें वागावें, ज्यांनीं दीक्षा घेतली आहे अशा दंपतीकडून तयार झालेलें अन्न जेवावें. ( ६८ ) सामान्य वीरशैवांमध्यें दीक्षा, श्राद्ध वगैरे कर्मांच्यावेळीं, वैराग्य धरून जे वाणीपणाचे व्यापार होतात, त्यांमध्यें व प्रेत संस्कार करतांना वीरशैवच मुख्य अधिकारी होय; यांत संशय नाहीं. ( ६९ ) पैशाच्या आशेनें नीच जातींत व भ्रष्ट झालेल्या जातींत त्यानें अन्नपाणी घेऊं नये, वीरशैवानें दीक्षेच्या कामांत तत्पर असावें. ( ७० ) त्यानें खरें बोलावें, सदाचारानें वागावें, आपल्या धर्मावर नेहमीं श्रद्धा ठेवावी, व इंद्रियें ताब्यांत ठेवून जगांत आपली कीर्ति वाढवावी. ( ७१ ) निराभार अशा अतिथींना पाहिल्यावरोवर त्यांचें संरक्षण करण्याला त्यानें तत्पर व्हावें. कोणत्याही व्रताचा किंवा शिवाचाराचा लोप झाला असतां दंड भोगण्याला किंवा प्रायश्चित्त घेण्याला त्यानें तयार असावें. ( ७२ ) इष्टलिंग धारण करणाऱ्यांचें त्यानें बापाप्रमाणें र-

तानां तु पितृवत्परिपालकः ॥ बहुलक्रियया नाल्पफलभोगी भवेच्च सः ॥ अत्यल्पक्रिययानल्पफलभोगी न संशयः ॥ ७२ ॥ सदा लिंगांगसंबंधी लिंगभोगोपभोगवान् ॥ इष्टलिंगेन चाव्हानविसर्जनपरो भवेत् ॥ ७३ ॥ लिंगव्रतादिलोपेषु प्राणत्यागी न संशयः ॥ एतस्मिन्विषये चान्यप्रायश्चित्तविवर्जितः ॥ ७४ ॥ शिवस्य जंगमस्यापि प्रसादस्य तथैव च ॥ पादोदकस्य मंत्रस्य तथा वै भस्मधारणे ॥ ७५ ॥ शिवागमशिवक्षेत्रशिवाचारे तथैव च ॥ यो निंदां कुरुते तस्मिन्नसहिष्णुर्भवेच्च सः ॥ ७६ ॥ विष्ण्वादिदेवतास्सर्वा अगणय्य प्रवर्तकः ॥ लिंगलांछनहीनैश्च न शय्यासहभोजनम् ॥ ७७ ॥ अनृतास्थिरवाक्येषु विप्रलंभे च निर्दये ॥ पंक्तिभेदेऽप्युदासीने न मनोधारकस्सदा ॥ ७८ ॥ दृष्ट्वा च शिवयोगींस्तान्प्रत्युत्थानपरायणः ॥ तैः साकं प्रियवाक्यादीनुक्त्वा दत्तासनः शुचिः ॥ ७९ ॥ अन्न

---

क्षण करावें. वीरशैव पुष्कळ क्रिया करून थोडें फळ न मिळवितां थोड्या क्रियांनीं पुष्कळ फळ मिळवितो, यांत संशय नाहीं. ( ७३ ) त्यानें लिंगांगसंबंध ठेवून लिंगभुक्त भोगांचाच उपभोग घ्यावा, ( कोणत्याही पदार्थाचा उपभोग घ्यावयाचा असल्यास तो प्रथम लिंगाला अर्पण करून लिंगाकडून त्याचा उपभोग झाल्यावर मग आपण त्याचा उपभोग घ्यावा. लिंगाला अर्पण न करितां उपभोग घेऊं नये. ) इष्टलिंगाचीच आव्हान विसर्जन वगैरे पूजा त्यानें करावी. ( ७४ ) लिंगाचा किंवा व्रताचा लोप झाला तर त्यानें निःसंशय प्राणाचा त्याग करावा. यावावर्तीत त्यानें दुसरे प्रायश्चित्तच घेऊं नये. ( ७५ ) शिवाची, जंगमाची तसेंच प्रसादाची, पादोदकाची, मंत्राची, त्याचप्रमाणें भस्मधारणाची, ( ७६ ) शिवागमाची, शिवक्षेत्रांची, आणि शिवाचारांची जो निंदा करितो, त्याची त्यानें क्षमा करूं नये. ( ७७ ) विष्णु वगैरे सगळ्या देवांकडे लक्ष्य न देतां वागावें. ज्यांनीं लिंगधारण केलें नसेल, त्यांच्या जोडीला निजूं नये, किंवा भोजन करूं नये. ( ७८ ) खोटें बोलणारा, अस्थिर वाक्याचा ( ज्याचा बोलण्यांत बोल नसतो किंवा जो एकदां एक बोलून दुसऱ्यांदा दुसरेंच बोलतो असा ) फसविणारा ( लुच्चा, ) निर्दय, पंक्तिभेद करणारा, व ( शिवभक्ती विषयीं ) उदासीन असणारा इतक्या माणसांशीं त्यानें कधींही मनानें मिसळून वागूं नये. ( ७९ ) शिवयोग्यांना पाहिल्यावरोवर त्यांचें स्वागत करण्याकरितां त्यानें उभें रहावें, गोड शब्द बोलून त्यांना आसन द्यावें, व पवित्रपणानें ( ८० ) त्यांना अन्न-

पानादिकं दत्वा मुक्तेः सोपानसंमतैः ॥ संयुक्तः पंचसूत्यादिवर्जितश्च शिवव्रती ॥ ८० ॥ लिंगार्चनाख्ययजनं कर्ता कारयिता च सः ॥ शैवशास्त्रोक्तपूजाया उपदेष्टा तथैव च ॥ ८१ ॥ शिवप्रसाददानी च पादोदकग्रही तथा ॥ लिंगाचारे सदाचारे शिवाचारे तथैव च ॥ ८२ ॥ भृत्याचारे गणाचारे पंचाचारेषु निष्ठितः ॥ निष्ठावान्वीरदासत्वे दासत्वादौ च षड्विधे ॥ ८३ ॥ निष्ठितः परया भक्त्या वर्तमानः सुनिष्ठितः ॥ सुतीर्त्वा सकलाचारान् स्वतंत्रः शिवधर्मवित् ॥ ८४ ॥ व्यावहारिकभेदस्तु संसारे चेति निष्ठितः ॥ मुक्तौ त्वभेद एवेति सुनिश्चितमुदान्वितः ॥ ८५ ॥ अत्याश्रमी जगत्पूज्यो श्रेष्ठः सत्कर्मकाण्डवान् ॥ एतादृशैर्वीरशैवलक्षणैर्लक्षितः पुमान् ॥ ८६ ॥ इति वीरशैवलक्षणम् ॥

विशेषवीरशैवस्य लक्षणं प्रोच्यते मया ॥ फाले भूतित्रिपुंड्रं च मुखे षड्वर्णसंस्मृतिः ॥ ८७ ॥ तत्तत्स्थानेषु रुद्राक्षधारको ज्ञानकर्मवित् ॥ स्त्र्यादिके विषये चैव मनोनिग्रहवान्भवेत् ॥ ८८ ॥ दण्ड-

---

पाणी वगैरे देऊन मुक्तीचा मार्ग ज्यांना माहीत आहे अशा त्या शिवयोग्यांच्या संगतींत त्यानें रहावें. पांच प्रकारचें सूतक वर्ज करून त्यानें शिवव्रतानें चालावें. ( ८१ ) लिंगपूजा हाच यज्ञ त्यानें करावा व करवावा. तसेंच शैवशास्त्रांत जी पूजा सांगितली आहे ती त्यानें लोकांना सांगावी. ( ८२ ) त्यानें शिवप्रसादाचें दान करावें व पादोदकाचें ग्रहण करावें. लिंगाचार, सदाचार, शिवाचार ( ८३ ) भृत्याचार, व गणाचार, अशा पंचाचारानें वागावें. वीरदासत्वामध्यें व सहाप्रकारच्या दासत्वामध्यें त्यानें भक्ति ठेवावी. ( ८४ ) पराभक्तीनें वागणारा, दृढ निष्ठेनें सर्व आचरणें आचरणारा, स्वतंत्र, शिवधर्म जाणणारा, ( ८५ ) प्रपंचांतील व्यवहारांत काय तो भेद असून मुक्तीच्या ठिकाणीं भेद मुळींच नाहीं अशा दृढनिश्चयानें आनंदानें राहणारा, ( ८६ ) अत्याश्रमी, जगाला पूज्य, व सत्कर्में आचरणारा–इतकीं लक्षणें वीरशैवाला असतात. येथें वीरशैवाचें लक्षण संपलें.

( ८७ ) ( आतां ) विशेष वीरशैवाचें मी लक्षण सांगतों. त्याच्या कपाळाला भस्माचें त्रिपुंड्र, तोडांत षडक्षर मंत्राचा जप, ( ८८ ) आणि शरीरावरील त्या त्या स्थानीं रुद्राक्षांच्या माळा असाव्या. ज्ञान व कर्म हीं दोन्हीं त्यानें जाणावीं. वायको वगैरे विषयाच्या बाबतींत त्यानें मनोनिग्रह करावा. ( ८९ ) 'हिंसा

खण्डनशिक्षासु दूरीकरणमाचरेत् ॥ अहिंसापरमो धर्म इत्यंगी कृतमानसः ॥ ८९ ॥ स्थूले सूक्ष्मे कारणे च शरीरेषु च सर्वदा ॥ विदित्वा चेष्टलिंगं च प्राणभावं तथैव च ॥ ९० ॥ आधारचक्रे स्वाधिष्ठे मणिपूरक एव वा ॥ अनाहते विशुद्धे च आज्ञेयाख्ये तथैव च ॥ ९१ ॥ एवं षट्चक्रमध्ये तु षड्विधां शक्तिमेव च ॥ भक्तिं च षड्विधां लिंगवर्णषाड्विध्यमेव च ॥ ९२ ॥ तथा दलस्य षाड्विध्यं विदित्वा स्थलषाड्विधम् ॥ सगुणं निर्गुणं चैव तदेवेष्टं च लिंगकम् ॥ ९३ ॥ ममेत्यन्योन्यभावेन चाखण्डज्ञानवान्भवेत् ॥ पत्त(ट्ट)ने पंचरात्रं वा त्रिरात्रं पुटभेदने ॥ ९४ ॥ अयाचनपरो भूत्वा दैवादागतजीवनः ॥ विमुक्ताशाद्वेषरागो भवेद्भूतदयायुतः ॥ ९५ ॥ यादृच्छिकपदार्थान्वै गृहीत्वा वृत्तिमाचरेत् ॥ भक्तिभावादागतस्य वैराग्यफलकस्य च ॥ ९६ ॥ ज्ञानोपदेशं कृत्वा तु संचरेद्भगवत्परः ॥ अतिक्रान्तस्य मर्त्यस्य न शिक्षाकरणो भवेत् ॥ ९७ ॥ येन

---

न करणें हाच श्रेष्ठ धर्म होय' या तत्वाचा मनानें अंगिकार करून कोणाला दंड करणें, मारणें, शिक्षा देणें या गोष्टी त्यानें वर्जाव्या. ( ९० ) स्थूल, सूक्ष्म व कारण या या शरीरांत नेहमीं राहणाऱ्या इष्टलिंग व प्राणलिंग यांना जाणावें. ( ९१ ) आधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध आणि आज्ञेय ( ९२ ) अशा सहाचक्रांतील सहा प्रकारची शक्ति तिची सहा प्रकारची भक्ति, सहा प्रकारचें लिंग, सहा प्रकारचा वर्ण, ( ९३ ) तसेंच ( त्या त्या चक्रांतील कमळांच्या ) सहा प्रकारच्या पाकळ्या आणि त्यांचीं स्थानें यांचें त्याला ज्ञान असावें सगुण इष्टलिंग व निर्गुण प्राणलिंग ( ९४ ) हीं दोन्हीं अन्योन्यभावानें माझींच आहेत ( हीं मीच आहे ) असें अखंड ज्ञान त्याला असावें. मोठ्या शहरांत पांच किंवा तीन रात्र ( ९५ ) अयाचितवृत्तीनें ( भिक्षा न मागतां ) दैवयोगानें जें मिळेल त्याजवर निर्वाह करीत त्यानें रहावें. आशा, द्वेष आणि विषयांवरील आसक्ति सोडून देऊन त्यानें भूतमात्राविषयीं दया बाळगावी. ( ९६ ) यदृच्छेनें ( आपोआप— न मागतां ) जे पदार्थ मिळतील ते घेऊन निर्वाह चालवावा. वैराग्य धरून भक्तीनें कोणी आपल्याकडे आल्यास ( ९७ ) त्याला ज्ञानाचा उपदेश करावा. परमात्म्याकडे चित्त ठेवून संचार करावा. कोणी मनुष्य मर्यादा सोडून वागूं लागला तर त्याला त्यानें शिक्षा करीत बसूं नये. ( ९८ ) त्यानें

केन च मंत्रेण कंथादण्डकमण्डलून् ॥ भैक्ष्यपात्रं तथा भस्मघुटिकां पंचमुद्रिकाम् ॥ ९८ ॥ शिखापंचकधारी स्यात्परमानन्दतत्परः ॥ प्रमादादिष्टलिंगं तु यत्र कुत्र गतं भवेत् ॥ ९९ ॥ न पुनर्धारयेल्लिंगं प्राणत्यागी च नो भवेत् ॥ ध्यानवानिष्टलिंगे तु भुक्त्वा भक्तालये सदा ॥ १०० ॥ अन्यजातिष्वन्नहीनो जातिष्वेवान्नपानवान् ॥ भावयेत्प्राणलिंगं तु अंतरे पद्मसंस्थितम् ॥ १०१ ॥ सुज्ञानं तस्य नालं स्याद्दलं स्यादष्टमं पदम् ॥ किंजल्कभूता रुद्रेशा वैराग्यं तस्य कर्णिका ॥ १०२ ॥ चंद्रप्रभेव हृदये सोमसूर्याग्निमण्डले ॥ चित्स्वरूपं दिव्यमूर्तिं पूजयेन्मनसा ततः ॥ १०३ ॥ चिदेव दिव्यमूर्तिः स्याच्चित्प्राणश्च तथैव च ॥ आनंद एव लावण्यं प्राणलिंगस्य चोदितम् ॥ १०४ ॥ षट्त्रिंशत्तत्वजातेषु भासमानं मुदान्वितम् ॥ स्फटिकान्तर्दीपमिव बाह्ये चाभ्यन्तरे तथा ॥ १०५ ॥ एवं विधे प्राणलिंगे चेष्टलिंगं विभावयेत् ॥ सर्वव्यापीश्वरश्चेति मतिराव्हानमेव च ॥ १०६ ॥ जगच्छिवपदव्याप्तमिति प्रज्ञैव पा-

कोणता तरी मंत्र जपावा व कंथा, दंड, कमंडलु, भिक्षापात्र, भस्माचा गोळा ह्या पंचमुद्रा ( ९९ ) व शिखापंचक धारण करून ब्रह्मानंदांत निमग्न असावें. चुकून इष्टलिंग कोठेंतरी पडलें, ( १०० ) तर त्यानें पुनः लिंगधारण करूं नये व प्राणत्यागही करूं नये. भक्ताच्या घरांत जेवून त्यानें नेहमीं इष्टलिंगाचें ध्यान करीत असावें. ( १०१ ) दुसऱ्या जातीमध्यें अन्न न घेतां, आपल्याच जातीमध्यें त्यानें अन्नपाणी घ्यावें. हृदयांतलि पोकळीमध्यें अशी भावना करावी कीं, प्राणलिंग हें कमळावर आहे, ( १०२ ) ज्ञान हें त्या कमळाचें देंठ, अष्टम पद ( समाधि ) हीं त्या कमळाची पाकळी, जंगम हेच त्यांतील केसर आणि वैराग्य हीच त्या कमळाची कर्णिका ( १०३ ) चंद्रप्रभेसारखी आहे. मग चंद्र, सूर्य व अग्नि यांचें मंडल जें हृदय त्या हृदयांत त्या दिव्य चिद्रूप प्राणलिंगाची मनानें पूजा करावी. ( १०४ ) चित् हींच त्या प्राणलिंगाची दिव्य मूर्ति, चित हाच त्याचा प्राण आणि आनंद हेंच त्याचें लावण्य होय. ( १०५ ) स्फटिकांतील दिव्याप्रमाणें ( स्फटिकाच्या आंत दिवा लाविला असतां जसा त्याचा आंत बाहेर प्रकाश पडतो त्याप्रमाणें ) छत्तीस तत्वाच्या आंतबाहेर आनंदासहित तें प्राणलिंग भासमान होतें. ( १०६ ) अशा प्रकारच्या प्राणलिंगाच्या ठिकाणीं इष्टलिंगाची भावना करावी. ईश्वर सर्वत्र व्यापिला आहे अशी बुद्धीच त्या लिंगाचें आव्हान होय. ( १०७ ) जगांत शिव भरलेला आहे असें ज्ञानच

द्यकम् ॥ ईशः सुखाब्धिरेवेति मतिरर्घ्यं प्रकीर्तितम् ॥ १०७ ॥ पवित्रदानमेवाभूदाचमनं प्रकीर्तितम् ॥ नित्यनिर्मलरूपं तत्स्नानमाहुर्मनीषिणः ॥ १०८ ॥ अतिक्रम्य जगत्सर्वमिति विद्यैव वाससी ॥ त्रिगुणातीतं विज्ञानं यज्ञसूत्रं विदुर्बुधाः ॥ १०९ ॥ आकल्पकं तु चैतन्यमलंकारप्रभा मता ॥ शृंगारः प्रतिभा तस्य चिच्छक्तिरनुलेपनम् ॥ ११० ॥ कारुण्यमक्षता तस्य पुष्पं तत्प्रणवात्मकम् ॥ विषयेषु च वैराग्यं धूपमित्यभिधीयते ॥ १११ ॥ परंज्योतिः स्वरूपं तद्दीपमित्यभिधीयते ॥ नित्यतृप्तस्य संविद्यत्तन्नैवेद्यमुदीरितम् ॥ ११२ ॥ षट्त्रिंशत्तत्वविज्ञानं नमस्कारक्रियोच्यते ॥ सोऽहं ब्रह्मेति विज्ञानं प्रदक्षिणमुदाहृतम् ॥ ११३ ॥ अन्तरात्मज्ञप्तिरेव तांबूलमिति कथ्यते ॥ इति मानसपूजाद्यैः पूजितं चेष्टलिंगकम् ॥ ११४ ॥ हृत्कर्णिकामध्यदेशे शून्यसिंहासने तथा ॥ पूर्वाचार्यैर्दत्तमिष्टलिंगं प्राणे विभावयेत् ॥ ११५ ॥ नदीतीरेऽथवा

---

त्याचें पाद्य होय. ईश्वर आनंदाचा समुद्र आहे असें जाणणें हेंच त्याचें अर्घ्य होय. ( १०८ ) शुद्ध ( प्रतिफळाची इच्छा न बाळगतां केलेलें ) दान हेंच त्या लिंगाचें आचमन होय. अविनाशी व निष्कलंक रूप हेंच त्याचें स्नान होय असें ज्ञाते ह्मणतात. ( १०९ ) संसारांतून पार पडून जाण्याची विद्या हीच त्या लिंगाचीं वस्त्रें व त्रिगुणापलीकडील केवळ ज्ञान हाच त्याचा शिवदोरा ( यज्ञसूत्र ) होय, असें शहाणे समजतात, ( ११० ) कल्पापर्यंतचें चैतन्य हीच त्याची अलंकारांची शोभा, प्रकाश हाच त्याचा शृंगार, चिच्छक्ति हेंच त्याला गंध लावणें, ( १११ ) कारुण्य ह्याच त्या लिंगाला वाहण्याच्या अक्षता, प्रणव हेंच त्याचें पुष्प, व विषयांविषयीं वैराग्य हाच त्याला घालणेचा धूप होय. ( ११२ ) परंज्योतिःस्वरूप हाच त्याचा दीप सांगितला आहे. नित्यतृप्ताचें ज्ञान हाच त्याचा नैवेद्य होय. ( ११३ ) छत्तीस तत्वांचें ज्ञान हाच त्या लिंगापुढें घालणेचा नमस्कार होय. मीच ब्रह्म आहें अशा प्रकारचें आत्मज्ञान हीच त्याला घालण्याची प्रदक्षिणा होय. ( ११४ ) अंतरात्म्याची ओळख हाच तांबूल सांगितला आहे. अशा मानस पूजादिकांनीं त्या ( प्राणलिंगरूप ) इष्टलिंगाची पूजा करावी. ( ११५ ) याप्रमाणें हृदयरूपी कर्णिकेच्या मध्यभागीं शून्य सिंहासनावर पूर्वाचार्योनीं दिलेल्या इष्टलिंगाची प्राणाच्या ठिकाणीं भावना करावी. ( ११६ ) नदीच्याकांठीं किंवा जेथें गांव अगर क्षेत्र असेल तेथें शिवालयांत लौकिक

ग्रामे क्षेत्रे शैवालये तथा ॥ आचरेन्मानसीं पूजां लौकिकाचारवर्जितः ॥ ११६ ॥ वृषभं भास्करं वीरभद्रं मातृगणं तथा ॥ स्कंदं तथा क्षेत्रपालं ब्रह्मविष्णुमहेश्वरान् ॥ ११७ ॥ स्वयंभुलीलया सम्यगतिक्रम्य मुदान्वितः ॥ प्राणलिंगे स्वमात्मानमैक्यं तत्राभिमानवान् ॥ ११८ ॥ प्राणलिंगध्यानपरस्त्वितरध्यानवर्जितः ॥ स्थूले सूक्ष्मे कारणे च त्रिलिंगार्चनतत्परः ॥ ११९ ॥ प्राणलिंगप्रसादेन विना नान्यत्प्रसादभुक् ॥ विषयासक्तिरहितो जगत्पूज्यो भवेच्च सः ॥ १२० ॥ अन्ते मंत्रोक्तमार्गेण समाधौ स्थापयेत्तनुम् ॥ जीवन्मुक्तोऽतिथिः सोऽपि ज्ञानकाण्डी न संशयः ॥ विशेषवीरशैवोऽसावत्याश्रमगणेऽभवत् ॥१२१॥ इति विशेषवीरशैवविधिः समाप्ता॥

अथ निराभारिवीरशैवलक्षणं ॥ सर्वस्रक्चंदनादीनि वनितादिमहासुखम् ॥ तिरस्कृतस्वचित्तः सन् न्यसेत्पराशिवे सदा ॥ १२२ ॥ स्वात्मन्यैक्यं विदित्वाथ सर्वसंगविवर्जितः ॥ दण्डकौपीनकाषायजटायोगकमण्डलून् ॥ १२३ ॥ धृत्वाऽथवा शिरोमुण्डी भूत्वा व-

---

आचार सोडून देऊन मानसपूजा करावी. (११७) नंदीश्वर, सूर्य, वीरभद्र, मातृगण, स्कंद, क्षेत्रपाळ आणि ब्रह्मा, विष्णु, व महेश्वर ( ११८ ) यांना साहजिक लीलेनें क्रमानें ओलांडून आनंदानें प्राणलिंगामध्यें आपल्या आत्म्याचें ऐक्य करावें आणि तेथील अभिमानी व्हावें ( तेथें स्फुरणरूपानें असावें ). ( ११९ ) दुसऱ्या कशाचेंही ध्यान न करितां प्राणलिंगाचें ध्यान [illegible]ित असावें आणि स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन्हीं शरीरांतील तीन लिंगा[illegible] करण्यांत निष्णात असावें. ( १२० ) प्राणलिंगाच्या प्रसादावांचून दुसरा [illegible]द घेऊं नये. विषयावरील आसक्ति सोडून द्यावी. म्हणजे तो विशेषवीरशैव जगाला पूज्य होतो. ( १२१ ) अंतीं मंत्रोक्त मार्गानें समाधीमध्यें शरीर ठेवावें. त्या योगानें ज्ञानकांडी ( ज्ञानानें वागणारा ) व अत्याश्रमी असा हा वि[illegible]षवीरशैव निःसंशय जीवन्मुक्त होतो. येथें विशेषवीरशैवाचें कर्म संपलें.

निराभारिवीरशैवाचीं लक्षणें:– ( १२२ ) फुलांच्या माळा, चंदन वगैरे विषयोपभोगाचे उपचार व स्त्री वगैरे विषय–सुख या सगळ्यांचा मनानें तिरस्कार करून, निराभारि वीरशैवानें परमात्मा शिवाच्या ठिकाणीं आपलें चित्त नेहमीं लावावें. ( १२३ ) सर्व संग टाकून देऊन आपल्या स्वरूपामध्यें लीन व्हावें, दंड, कौपीन ( लंगोटी, ) भगवीं वस्त्रें, जटा, योग, कमंडलु ( १२४ ) हीं धारण करून रहावें, किंवा डोक्याचें मुंडण करवून वस्त्ररहित होऊन फक्त आसनाकरितां

सनवर्जितः ॥ अजिनासनयुक्तस्सन् काषायाच्छादकश्चरेत् ॥१२४॥ कूष्माण्डखर्प्परं धृत्वा भवेच्चैव दिगंबरः ॥ यदृच्छया लब्धशैवप्रसादास्वादने रतः ॥ १२५ ॥ कायेन वाचा मनसा त्यक्तभूवित्तकन्यकः ॥ त्यक्त्वा गृहमठादीनि मनुष्यादिगृहाणि च ॥ प्रवासस्तेन कर्तव्यो वने गिरिगुहादिषु ॥ १२६ ॥ तृणीकृतजगज्जीवो लौकिकाचारवर्जितः ॥ त्यक्तप्रवरगोत्रश्च सूत्रवर्णादिकं तथा ॥१२७॥ पादांगुलीयवलयश्यामदन्तादिभिः सदा ॥ स्त्रीजातिभिः कृतान्नादितिरस्कारी शिवव्रती ॥ १२८ ॥ पूर्वाश्रमगतान्मातृपितॄनपि परित्यजेत् ॥ स्वयंभुलीलया सोऽहं ब्रह्मेति विदितात्मवान् ॥ १२९ ॥ गृहस्थाचारवर्तीनां न कर्ता कार्यमंजसा ॥ निर्नामो निर्ग्रहो भूत्वा वधूसंगविवर्जितः ॥ १३० ॥ निष्कारणो निष्कलंको निर्विकल्पश्च निष्क्रियः ॥ निष्प्रपंचो निरालश्च रागद्वेषादिवर्जितः ॥ १३१ ॥ निषेधविधिरूपे च एकचित्तो भवेच्च सः ॥ कर्मकांडिगृहस्थानां मं-

---

हरिणाचें कातडें आणि पांघरण्याकरितां भगवें वस्त्र घेऊन रहावें. ( १२५ ) भोपळ्याचें खापर ( कमंडलु ) तेवढें जवळ ठेवून दिगंबर व्हावें. आपोआप—न मागतां जो शिवप्रसाद मिळेल तोच स्वीकारावा. ( १२६ ) शरीरानें, वाणीनें व मनानें जमीन, पैसा व स्त्रिया यांचा त्याग करावा. घरें, मठ, मनुष्यांच्या वगैरे राहण्याच्या जागा यांठिकाणीं न राहतां, त्यानें अरण्य, पर्वत, गुहा वगैरे ठिकाणीं फिरावें. ( १२७ ) जगाला काडीसमान मानून ( जगाची पर्वा न बाळगतां-जगाविषयीं निस्पृह राहून ) लौकिक आचार, व प्रवर, गोत्र, सूत्र वर्ण इत्यादि विषयांचा त्याग करावा. ( १२८ ) ज्यांच्या पायांत जोडवीं आहेत व ज्यांचे दांत काळे असतात ( स्वच्छ नसतात ) अशा प्रकारच्या स्त्रियांनीं तयार केलेलें अन्न शिवव्रतानें वागणाऱ्या निराभारिवीरशैवानें ग्रहण करूं नये. (१२९) पूर्वीच्या आश्रमांतील आईबापांचा देखील त्याग करावा. स्वयंभु ( आपोआप उत्पन्न होणाऱ्या ) लीलेनें तो मीच ब्रह्म असें आत्मस्वरूप जाणून ( १३० ) गृहस्थाश्रमांत असणाऱ्यांचीं कामें मुळींच करूं नयेत. नामरहित व उपाधिरहित होऊन स्त्रियांचा संसर्ग वर्जावा. ( १३१ ) कारणापलीकडचा, कलंकरहित, विकल्परहित, निष्क्रिय, प्रपंचांत न सांपडणारा, व निष्कपट असा होऊन राग, द्वेष इत्यादिकांपासून दूर रहावें. ( १३२ ) शास्त्रांत ज्या गोष्टी निषिद्ध ( करूं नये ) म्हणून सांगितल्या आहेत, व ज्या गोष्टी कराव्या म्हणून सांगितल्या आहेत, त्या दोन्ही प्रकारच्या गोष्टींविषयीं त्याचें मन सारखेंच असावें ( दोन्ही गोष्टी त्यानें

दिरेषु शुभाशुभे ॥ १३२ ॥ विवाहादिषु कार्येषु शवसंस्थापनादिषु ॥ आगत्य चैकदिवसं पुरग्रामे वसेच्च सः ॥ १३३ ॥ ग्रहत्रयेष्वन्नपानं याचमानो भवेच्च सः ॥ दत्तं चेदपि भुंजीत नो चेत्क्लेशं न कारयेत् ॥ १३४ ॥ नांदोलिकां समारोहेदश्वारोहणवर्जितः ॥ पादचारी च संभूय चरेद्भूवलये सदा ॥ १३५ ॥ अभक्तानां च भक्तानां शिक्षाशापविवर्जितः ॥ एकभुक्तो भवेत्सोऽपि सदा वैराग्यवान् भवेत् ॥ १३६ ॥ षट्स्थलान्त्यनिरालंबस्थानेषूद्यमवान्भवेत् ॥ सती विद्या सुतस्तोषो वैराग्यं बांधवः स्मृतः ॥ १३७ ॥ क्षमैव परिवारस्तु सखा शांतिरितीरितः ॥ भक्तिर्माता सदाचारः पिता सत्यं सुता मता ॥ १३८ ॥ स्नुषा श्रद्धैव संप्रोक्ता पौत्रा मैत्र्यादिसद्गुणाः ॥ ज्ञानमेव शरीरं स्याद्विचारः क्षेत्रमेव च ॥१३९॥ दासी त्वहिंसा संप्रोक्ता दासस्त्वास्था तथैव च ॥ धर्मो वाहनमित्युक्तं त्वाचारो दम एव च ॥१४०॥ मुक्तिरेव परो देश इति निश्चितधीः सदा ॥ कंथा कमंडलुश्चैव दण्डं वै भैक्ष्यपात्रकम् ॥१४१॥ भस्म-

---

सारख्याच मानाव्या, ह्मणज अभदपणानें वर्तावें. ) चांगल्या वाईट वेळीं कर्मी ( कर्मीनें वागणाऱ्या ) गृहस्थांच्या घरीं ( १३३ ) लग्न वगैरे कार्यांमध्यें किंवा प्रेतविधींच्या वेळीं एक दिवस गांवांत येऊन रहावें. ( १३४ ) तीन घरीं अन्नपाणी मागून घ्यावें. कोणीं दिलें तर घ्यावें, न दिल्यास त्रास देऊं नये. (१३५) पालखी, मेणा यांत बसूं नये व घोड्यावर चढूं नये. नेहमीं पायानेंच पृथ्वीवर चालावें. ( १३६ ) अभक्तांना किंवा भक्तांना शिक्षा, शाप देऊं नये. रोज एकदां जेवावें. नेहमीं विरक्त असावें. ( १३७ ) षट्स्थलांच्या शेवटीं असणारें जें निरालंबस्थान ( स्वरूपाचें स्थान ) त्या ठिकाणीं पोहोंचण्याचा त्यानें उद्योग करीत असावें. विद्या हीच त्याची वायको, संतोष हाच त्याचा मुलगा व वैराग्य हाच त्याचा भक्त होय. ( १३८ ) क्षमा हाच त्याचा परिवार ( नोकर चाकर ) शांति हाच स्नेही, भक्ति हीच आई, सदाचार हाच बाप, सत्य हीच मुलगी ( १३९ ) श्रद्धा हीच सून व मैत्री वगैरे सद्गुण हेच त्याचे नातु होत. ज्ञान हेंच शरीर विचार हेंच क्षेत्र, ( १४० ) अहिंसा हीच दासी, तसेंच ( परमात्म्याविषयींची ) आस्था हाच दास, धर्म हेंच वाहन, दम हाच आधार, (१४१) व मुक्ति हीच आपली श्रेष्ठ जागा असा नेहमीं निश्चय करून कंथा ( छाटी भगवें वस्त्र ) कमंडलु, दंड, भिक्षापात्र, ( १४२ ) व भस्मपात्र ह्या पांच बाह्य

पात्रं च पंचैता बाह्यमुद्राश्च धारयेत् ॥ तत्तन्मंत्रानुसारेण धृत्वा तु तदनंतरम् ॥ १४२ ॥ तदन्यपंचमुद्रास्तु चांतरंगेऽपि धारयेत् ॥ समतैव च कंथा स्याद्दण्डो ज्ञानं तथैव च ॥ १४३ ॥ कमण्डलुर्दयैवासीद्वैराग्यं भैक्ष्यपात्रकम् ॥ क्षमैव भस्मघुटिकामेवं चान्तेऽपि धारयेत् ॥ १४४ ॥ केशग्रंथिजटावांश्च शिरोमुण्डी तथैव च ॥ मृगाजिनी च संभूय भूत्वा चैव दिगंबरः ॥ १४५ ॥ एवं विधाञ्छैववेषानंगीकृत्य सदा चरेत् ॥ शिवार्चनं त्रिपुंड्रस्य धारणं भस्मधूलनम् ॥ १४६ ॥ शिवमंत्रजपश्चैव शिवध्यानपरायणः॥ सदा लिंगांगसंयोगक्रियाज्ञानादिसंयुतः ॥ १४७ ॥ रसायनाद्यकृत्वा तु तथा वै क्रयविक्रयम् ॥ वैद्यं वैश्यं ज्योतिषं च व्यवहारांश्च लौकिकान् ॥ १४८ ॥ विषयादीन्परित्यज्य विरक्तस्तदनंतरम् ॥ भवाख्यारण्यमध्यस्थलोभपंकं परित्यजेत् ॥ १४९ ॥ तिरस्कृत्येंद्रियरिपून् मोहपैशाचिकं भयम् ॥ तथैव क्रोधशार्दूलं ममतासर्पभीतिजम् ॥ १५० ॥ मन्मथाख्यस्तेयिनं च मदाख्यतिमिरं तथा ॥ तापत्रयाख्यगर्ते च न प्रविष्टो भवेच्च सः ॥ १५१ ॥ विषयाख्ये कण्ट-

---

मुद्रा त्या त्या मंत्रानुसारानें धारण कराव्या. तदनंतर ( १४३ ) या मुद्रांहून वेगळ्या अशा पांच मुद्रा अंतरंगांत धारण कराव्या. समता हीच कंथा, तसेंच ज्ञान हाच दंड, ( १४४ ) दया हाच कमंडलु, वैराग्य हेंच भिक्षापात्र व क्षमा हेंच भस्मपात्र याप्रमाणें या पांच मुद्रा अंतःकरणांत वागवाव्या. (१४५) केंसाला गांठ देऊन जटा वळवाव्या. किंवा मुंडन करवावें. हरणाचें कातडें जवळ वाळगावें, व दिगंबर असावें. ( १४६ ) याप्रकारचा शैववेष नेहमीं धारण करून वर्तावें. शिवपूजा करावी. त्रिपुंड्र लावावें. अंगाला भस्म फासावें. ( १४७ ) शिवमंत्राचा जप करावा. शिवाचें नेहमीं ध्यान करावें. लिंगांग संयोगाची जी क्रिया तिचें ज्ञान प्राप्त करून घ्यावें. ( १४८ ) रसायनें करूं नये. खरीदी विक्री, वैद्यक, वाणीपणा, ज्योतिष्याचा धंदा, लौकिक व्यापार ( १४९ ) विषय वगैरे सर्व सोडून देऊन मग प्रपंचरूपी अरण्यांतील लोभरूपी चिखल टाकून द्यावा ( प्रपंचावरील लोभ सोडावा ). ( १५० ) इंद्रियांच्या वैऱ्यांचा ( षड्रिपूंचा ) तिरस्कार करावा. मोहरूपी पिशाचाचें भय तसेंच क्रोधरूपी वाघ, ममतारूपी सर्पिणीचें भय, ( १५१ ) कामरूपी चोर व मदरूपी अंधार या सगळ्यांना हुसकून लावावें. तापत्रयाच्या खड्यांत पडूं नये. ( १५२ ) विषयरूपी कांटेरी

केऽपि पादप्रक्षेपवर्जितः ॥ न प्रविष्टो भवेदेव सोऽहंकारमहाह्रदे ॥ १५२ ॥ सर्वावधानी भूत्वैव विरक्तस्थाननिष्ठितः ॥ षोडशैरुपचारैश्च पूजितस्तोषवर्जितः ॥ १५३ ॥ अपूजितश्चेन्नो दुःखी भवेदेकप्रकारवान् ॥ शीतोष्णयोः सुखेदुःखे शिलाविग्रहवद्भवेत् ॥१५४॥ क्रियादीक्षादिना पूर्वैराचार्यैर्दत्तमंजसा ॥ सत्क्रियासंयुतं चेष्टलिंगं ब्रह्ममयं तथा ॥ १५५ ॥ गुरुवक्त्रेण सूक्ष्मे तु शरीरे च द्वितीयके ॥ इदं प्राणमयं लिंगमिति संभावयेत्तथा ॥ १५६ ॥ तथैव प्राणलिंगं तु शरीरे कारणाव्हये ॥ भावलिंगमिति ज्ञात्वा चेष्टलिंगं त्रिधाकृतम् ॥ १५७ ॥ महालिंगमिति ज्ञात्वा तेषु भेदं न भावयेत् ॥ इष्टलिंगं ततो धृत्वा पंचाचार्यैस्ततः परम् ॥ १५८ ॥ अन्तरंगे पितुर्भावं भावयित्वा न दूषयेत् ॥ शिशुभावैः षट्स्थलान्तर्निरालंबे विलासवान् ॥ १५९ ॥ एतादृशनिराभारवीरशैवस्य कुत्र-

---

झाडावर पाऊल टेवूं नये. अहंकाररूपी पूरांत शिरूं नये. ( १५३ ) सर्वांविषयीं सावधान राहून विरक्तस्थानीं ( विरक्तस्थितींत ) असावें. षोडशोपचारानें कोणीं आपली पूजा केली, तरी त्यानें ( निराभारिवीरशैवानें ) त्याचा संतोष मानूं नये. ( १५४ ) कोणीं पूजा केली नाहीं तरी त्याचें त्याला दुःख वाटूं नये. असें समत्वानें वागावें. थंडी व उष्ण यांच्या सुख दुःखांविषयीं ज्यांचें दगडाचें शरीर असतें अशासारखें रहावें ( दगडाला ज्याप्रमाणें थंडी व उष्ण याचें सुखदुःख सारखें आहे, त्याप्रमाणें त्यानेंही हें सुखदुःख सारखें मानावें. ) ( १५५ ) क्रिया दीक्षा वगैरे विधीनें पूर्वीच्या आचार्यांनीं उत्तम क्रियायुक्त असें जें ब्रह्ममय इष्टलिंग खरोखर दिलें असेल, ( १५६ ) तें इष्टलिंगच दुसरें जें सूक्ष्म शरीर त्या शरीरांतील प्राणमय लिंग होय अशा गुरुमुखानें जाणून भावना करावी. ( १५७ ) त्याचप्रमाणें तें प्राणलिंगच कारण नांवाच्या शरीरांत भावलिंग होय असें भावावें. या रीतीनें तीन प्रकारांनीं भाविलें गेलेलें इष्टलिंगच ( १५८ ) महालिंग होय असें जाणून या तीन्हीं लिंगांत भेद मानूं नये. पंचाचार्यांनीं दिलेल्या अशा प्रकारच्या इष्टलिंगाचें धारण करून, मग ( १५९ ) अंतरंगांत पित्याच्या भावनेनें त्याला भावून ( तें इष्टलिंगच आपला पिता असें भावून ) तो भाव न सोडतां स्वतांच्या ठिकाणीं मुलाचा भाव कल्पून ( आपण इष्टलिंगाचें मूल आहों असें भावून ) षट्स्थलांच्या शेवटीं निरालंबस्थानीं आनंद भोगावा ( १६० ) अशा प्रकारच्या निराभारिवीरशैवाचा कोठल्यातरी अरण्यांत इष्टलिं-

चित् ॥ कान्तारे त्विष्टलिंगस्य वियोगे सति दैवतः ॥ १६० ॥ सामान्यवीरशैवेव मंत्रोक्तविधिना ततः ॥ न पुनर्धारयेल्लिंगं वीरशैव इव स्वकम् ॥ १६१ ॥ न प्राणस्य परित्यागो वीरशैवविशेषवत् ॥ इष्टलिंगं मानसे च प्राणलिंगं न भावयेत् ॥ १६२ ॥ तैलसिक्ता वर्तिका तु ज्योतिःस्पर्शेन ज्योतिवत् ॥ न पुनः पूर्वभावेन वर्तते च यथा तथा ॥ १६३ ॥ पूर्वाचार्यैर्दत्तलिंगं ममांगस्पर्शमात्रतः ॥ सोऽहं भावेनैक्यभूतं मया सार्द्धं न संशयः ॥ १६४ ॥ इति निश्चित्य मनसा न भेदश्चांगलिंगयोः ॥ तस्माल्लिंगं गतं वापि चाहमेवेष्टलिंगकः ॥ १६५ ॥ इति निश्चितधीः सोऽपि चतुष्वत्याश्रमेषु च ॥ अत्युत्कृष्टो भवेत्पूज्यो निराभारी न संशयः ॥ १६६ ॥ इति निराभारिवीरशैवलक्षणम् ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे वीरशैवप्रकाशिकोक्तसप्तविधशैवलक्षणचतुर्विधवीरशैवलक्षणतदाचरणकथनंनामाष्टमप्रकरणं समाप्तम् ॥

---

गांशीं दैवयोगानें वियोग घडला ( इष्टलिंग नाहींसें झालें. ) तर ( १६१ ) त्यानें सामान्य वीरशैवाप्रमाणें किंवा वीरशैवाप्रमाणें मंत्रोक्त विधीनें पुनः आपलें लिंग धारण करूं नये. ( १६२ ) किंवा विशेष वीरशैवाप्रमाणें प्राणाचाही त्याग करूं नये. मनांत इष्टलिंगाची प्राणलिंगाच्या ठिकाणीं भावना करूं नये. ( १६३ ) ‘ ज्याप्रमाणें तेलांत भिजविलेली वात अग्निस्पर्शानें अग्नीसारखीच होते, तिच्या ठिकाणीं पूर्वीचा ( वातीपणाचा ) भाव उरत नाहीं; त्याप्रमाणें ( १६४ ) पूर्वाचार्यांनीं दिलेलें इष्टलिंग माझ्या अंगस्पर्शाबरोबर ( अंगावर धारण केल्याबरोबर ) सोऽहं भावानें ( तो मीं या भावानें ) माझ्या बरोबर ऐक्य पावलें यांत संशय नाहीं ’ ( १६५ ) असा मनांत निश्चय करून ‘ अंग व लिंग यांत भेद नाहीं. तेव्हां लिंग गेलें तरी मीच इष्टलिंग आहें,’ ( १६६ ) अशा निश्चयानें राहिलेला निराभारीवीरशैव चारही प्रकारच्या अत्याश्रम्यांमध्यें अत्युत्कृष्ट व पूज्य होईल यांत शंका नाहीं. येथें निराभारीवीरशैवाचें लक्षण संपलें.

याप्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्राहांतील वीरशैवप्रकाशिकेंत सांगितल्याप्रमाणें सात प्रकारच्या शैवांचें लक्षण व चार प्रकारच्या वीरशैवांचें लक्षण व आचरण यांचें कथन नांवाचें हें आठवें प्रकरण संपलें.

## ॥ अथ कारणागमानुसारेण पुण्याहवाचनं नाम नवमप्रकरणम् ॥

पार्वत्युवाच

मठस्थलं समाख्यातं त्वया भक्तमनोरथम् ॥ इतःपरं महादेव मम पुण्याहमुच्यताम् ॥ १ ॥

ईश्वर उवाच

अथातः संप्रवक्ष्यामि पुण्याहं शृणु पार्वति ॥ यत्कृत्वा कृतकृत्यास्युर्नराः कालुष्यमानसाः ॥ २ ॥ निगमागममंत्राढ्यमैहिकामुष्मिकार्थदम् ॥ गर्भाधाने पुंसवने सीमन्ते जातकर्मणि ॥ ३ ॥ नाम्नि चोन्नयने कर्णवेधने निष्क्रमे शिवे ॥ अन्नस्य प्राशने चौले विद्यारंभे शुभावहे ॥ ४ ॥ दीक्षायां च प्रतिष्ठायां नवगेहप्रवेशने ॥ विवाहदीक्षासमये शिवाग्निजनने शुभे ॥ ५ ॥ वाचनीयमिदं देवि पुण्याहं मंगलप्रदम् ॥ यजुर्मध्यसमुत्पन्नं कारणागमसूत्रजम् ॥ ६ ॥ यः शिवो नामरूपाभ्यां या शिवा सर्वमंगला ॥ तयोः संस्मरणात्पुंसां सर्वतो जयमंगलम् ॥ ७ ॥ उत्तिष्ठन्तु भूतपिशाचा एते

---

सगळ्या शुभ संस्कारांमध्यें पुण्याहवाचन पहिल्यानें येत असल्यामुळें व वीरशैवांना तें अवश्य करावें लागत असल्यामुळें, पहिल्यानें पुण्याहवाचनच लिहितों. ( कारणागम ) पार्वति ह्मणत्ये:–' ( १ ) हे महादेवा, भक्तांचे मनोरथ असें जें मठस्थल तें आपण सांगितलें. या पुढें पुण्याहवाचन सांगावें.' ईश्वर ह्मणतात, ( २ ) पार्वति, आतां पुण्याहवाचन सांगतों ऐक. हें पुण्याहवाचन केलें असतां पातकी माणसेंही कृतार्थ होतात. ( ३ ) यांत वेद व आगम यांतील मंत्र येतात. हें इहपरलोकांतील अर्थ देणारें ( मनोरथ पूर्ण करणारें ) आहे. गर्भाधान, पुंसवन, सीमन्त, जातकर्म, ( ४ ) नामकरण, उन्नयन, कर्णवेधन, निष्क्रमण, व अन्नप्राशन, चौल, मंगलप्रद असा विद्यारंभ, ( ५ ) दीक्षा, प्रतिष्ठा (स्थापना ) नूतनगृहप्रवेश ( नव्या घरांत शिरणें, ) विवाह, दीक्षा ( लग्नकार्य ) व शुभ असा शैवाग्नि उत्पन्न करणें, या या संस्कारांच्या वेळीं, ( ६ ) हे पार्वति यजुर्वेदांत व कारणागमसूत्रांत उत्पन्न झालेलें ( सांगितलेलें ) हें सौख्य देणारें पुण्याहवाचन करावें लागतें. ( ७ ) ' नामरूपांनींयुक्त जो शिव आणि सर्वांना सुख देणारी जी शिवा ( पार्वती ) त्या दोघांचें स्मरण केलें असतां मनुष्याला सर्व ठिकाणीं जय मिळतो. ( ८ ) हे भूमीला भार झालेलें भूतपिशाच उठोत

भूमिभारकाः ॥ एतेषामविरोधेन शिवकर्म समारभेत् ॥ ८ ॥ इति दर्भोदकेन भूशुद्धिं कुर्यात् ॥ पृथिव्यां मेरुपृष्ठऋषिः कूर्मो देवता सुतलं छंदः आसने विनियोगः ॥ अनंतासनाय नमः ॥ इति दर्भेणासनशुद्धिं कुर्यात् ॥ प्रणवस्य ब्रह्मा ऋषिः परमात्मा शंभुर्देवता देवी गायत्री छंदः प्राणायामे विनियोगः ॥ इत्योंकारेण वामनासापुटमनामिकया पिधाय दक्षिणनासापुटेन पूरयित्वा कुंभयित्वा पुनर्दक्षिणनासापुटमंगुष्ठेन पिधाय वामनासापुटेन रेचयेत् ॥ त्रिवारं ॥ अथ संकल्पः ॥ शिव शिव शंभोराज्ञया प्रवर्तमानस्याद्य ब्रह्मणो द्वितीयपरार्द्धे श्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वंतरे कलियुगे प्रथमपादे जंबूद्वीपे भरतखण्डे मेरोर्दक्षिणदिग्भागे अमुके वर्षे अमुके अयने अमुके ऋतौ अमुके मासे अमुके पक्षे अमुष्यां तिथौ अमुके वासरे अमुके नक्षत्रे अमुके योगे अमुके करणे अमुके मठे अमुकशाखाध्ययनस्य अमुकगोत्रस्य अमुकसूत्रस्य अमुकप्रवरस्य

---

( निघून जावोत ). त्यांच्याशीं विरोध न करितां ( त्यांना अनुकूल करून घेऊन ) शिवकर्माचा आरंभ करावा.' असें ( ७ व ८ या दोन श्लोकांत येणारा मंत्र ) ह्मणून दर्भानें पाणी शिंपडून भूमि शुद्ध करावी. पृथिव्यां मेरुपृष्ठऋषिः कूर्मो देवता-सुतलं छंदः आसने विनियोगः । अनंतासनाय नमः । असें ह्मणून दर्भोदकानें आसनशुद्धि करावी " प्रणवस्य ब्रह्मा ऋषिः परमात्मा शंभुर्देवता देवी गायत्री छंदः प्राणायामे विनियोगः" या मंत्रानें ओंकारानें अनामिकेनें ( करंगळी जवळील बोटानें ) डावी नाकपुडी दाबून उजव्या नाकपुडीनें श्वास ओढून घ्यावा व थोडा कुंभक करून ( थोडा वेळ श्वास आंतच दाबून धरून ) पुनः उजवी नाकपुडी अंगठ्यानें दाबून डाव्या नाकपुडीनें तो श्वास सोडावा. असें तीन वेळां करावें. आतां संकल्प करावयाचा तो असाः—( मूळांत शिव शिव शंभोराज्ञया० पासून पुण्याहं करिष्ये येथपर्यंत सांगितलेला मंत्र हाच संकल्प होय. तो ह्मणावा. यांत 'अमुके वर्षे' 'अमुके अयने' वगैरे जेथें जेथें अमुके शब्द आला आहे तेथें तेथें तें वर्ष, अयन ऋतु वगैरे घालून संकल्प ह्मणावा. जसें दक्षिणायन असल्यास 'अमुके अयने' असें न ह्मणतां 'दक्षिणायने,' शरदृतु असल्यास ऋतु या शब्दा मागील अमुक काढून टाकून 'शरदृतौ' असें ह्मणावें याप्रमाणेंच पक्ष, तिथि, वार, नक्षत्र, योग, करण, शाखा, गोत्र, प्रवर, सूत्र जें असेल तें त्या त्या ठिकाणीं घालून संकल्प ह्मणावा. या संकल्पाचा अर्थ असा आहेः—शि-

यजमानस्य नियोगेन अमुकशाखाध्यायी अमुकगोत्री अमुकसूत्री अमुकप्रवरी शिवलिंगोऽहं प्राप्तशोभनसिद्ध्यर्थं धनधान्यसमृद्ध्यर्थं आयुरारोग्यैश्वर्याभिवृद्ध्यर्थं शिवभक्तिसिद्ध्यर्थं पुण्याहं करिष्ये ॥ इति संकल्प्य ॥ तदादौ विघ्नपरिहारार्थं गणाधिपतिपूजां करिष्ये ॥ संमार्जिते द्विपद्मचित्रिते चतुरस्रे मण्डले तण्डुलोपरि उमामहेश्वरकलशौ प्रतिष्ठाप्य तदग्रतो गणेश्वरकलशं प्रतिष्ठाप्य तदग्रतः तांबूलपर्णे हरिद्रया वा क्रमुकेन वा गन्धेन वा विनायकं परिकल्प्य ॥ गणानां त्वा गणपतिꣳ हवामहे कविं कवीनामुपमश्रवस्तमं ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आनः श्रुण्वन्नूतिभिः सीदसादनं ॥ इति प्रतिष्ठापयेत् ॥ ॐ गणाधिपतये नमः अर्चयामि ॥ ॐ सुमुखाय नमः अर्घ्यं समर्पयामि ॥ ॐ एकदन्ताय नमः पाद्यं समर्पयामि ॥ ॐ

---

वशिव शंभूच्या आज्ञेनें चालू असलेल्या आज ब्रम्ह्याच्या दुसऱ्या परार्धांत, श्वेतवाराहकल्पांतील वैवस्वतमन्वंतरांत, कलियुगांतील प्रथमपादांत, जंबूद्वीपांत, भरतखंडांत, मेरुपर्वताच्या दक्षिणदिग्भागीं, अमक्यावर्षी, अमक्याअयनांत, अमुक ऋतूमध्यें, अमुक महिन्यांत, अमुक पक्षांत, अमक्या तिथीला, अमक्या वारीं अमुक नक्षत्रावर, अमुक योगावर, अमुक करणावर, अमक्या मठांत, अमुक शाखेच्या, अमुक गोत्राच्या, अमुक सूत्राच्या, व अमुक प्रवराच्या यजमानाच्या सांगण्यावरून–यजमानाकरितां–अमुक शाखेंत अध्ययन करणारा, अमुक गोत्राचा अमुक सूत्राचा व अमुक प्रवराचा मी शिवलिंग प्राप्त झालेलें मंगळ कार्य सिद्धीला जावें ह्मणून, धनधान्याची समृद्धि व्हावी म्हणून, आयुष्य आरोग्य व ऐश्वर्य वाढावें म्हणून आणि शिवभक्ति सिद्ध व्हावी ह्मणून पुण्याहवाचन करितों.) असा संकल्प करून " तदादौ विघ्नपरिहारार्थं गणपतिपूजां करिष्ये ( पुण्याहवाचन करण्याच्या आधीं विघ्नें दूर व्हावीं ह्मणून गणपतीची पूजा करितों )" असें ह्मणून सारविलेल्या व दोन कमळें ज्यावर काढिलीं आहेत अशा–चतुष्कोण मंडलावर तांदूळ घालून त्यावर उमामहेश्वराचे दोन कलशांची स्थापना करावी आणि त्यांपुढें गणपतीच्या कलशाची स्थापना करून त्या कलशापुढें नागवेलीच्या पानावर एक हळकुंड किंवा सुपारी ठेवून, किंवा गंध लावून त्याला गणपति मानावें. मूळांतील गणानांत्वा० येथ पासून सीदसादनं पर्यंत मंत्र ह्मणून गणपतीची स्थापना करावी. " ॐ गणाधिपतये नमः अर्चयामि " असें ह्मणून गणपतीच्या पूजेला सुरवात करावी. " ॐ सुमुखाय नमः अर्घ्यं समर्पयामि " असें ह्मणून अर्घ्य द्यावें. " ॐ एकदंताय नमः पाद्यं समर्पयामि " असें ह्मणून पाद्य अर्पण

कपिलाय नमः आचमनीयं समर्पयामि ॥ ॐ गजकर्णाय नमः मधुपर्कं समर्पयामि ॥ ॐ लंबोदराय नमः पंचगव्यं समर्पयामि ॥ ॐ विकटाय नमः पंचामृतं समर्पयामि ॥ ॐ विघ्नराजाय नमः पंचोदकं समर्पयामि ॥ ॐ गणाधिपाय नमः षड्डुदकं समर्पयामि ॥ ॐ धूमकेतवे नमः शुद्धोदकं समर्पयामि ॥ ॐ गणाध्यक्षाय नमः महास्नानं समर्पयामि ॥ ॐ फालचंद्राय नमः अष्टविधार्चनं समर्पयामि ॥ ॐ गजाननाय नमः षोडशोपचारान् समर्पयामि ॥ ॐ वक्रदन्ताय नमः सुवर्णपुष्पं समर्पयामि ॥ ॐ हेरंबाय नमः उपचारान् समर्पयामि ॥ ॐ शूर्पकर्णाय नमः मंत्रपुष्पं समर्पयामि ॥ ॐ स्कन्दपूर्वजाय नमः प्रसादं गृण्हामि ॥ उमामहेश्वरकलशौ उमामहेश्वरनाममंत्रेण पूजयेत् ॥ कलशत्रयोदकं पुण्याहकलशे निक्षिप्योध्दृत्य पुण्याहमंत्रानुच्चरन् दशसु दिक्षु आम्रपल्लवैः संमार्जयेत् ॥ ॐ पुण्याहं दीर्घमायुः ॥ शिवा आपः सन्तु ॥ सौमनस्यमस्तु

---

करावें. "ॐ कपिलाय नमः आचमनीयं समर्पयामि" असें ह्मणून आचमन अर्पण करावें. "ॐ गजकर्णाय नमः मधुपर्कं समर्पयामि" असें ह्मणून मधुपर्क अर्पण करावा. "ॐ लंबोदराय नमः पंचगव्यं समर्पयामि" असें ह्मणून पंचगव्य अर्पण करावें. "ॐ विकटाय नमः पंचामृतं समर्पयामि" असें ह्मणून पंचामृत अर्पण करावें. "ॐ विघ्नराजाय नमः पंचोदकं समर्पयामि" असें ह्मणून पंचोदक द्यावें. "ॐ गणाधिपाय नमः षड्डुदकं समर्पयामि" असें म्हणून षड्डुदक अर्पण करावें. "ॐ धूमकेतवे नमः शुद्धोदकं समर्पयामि" असें ह्मणून शुद्धोदक अर्पण करावें. "ॐ गणाध्यक्षाय नमः महास्नानं समर्पयामि" असें ह्मणून महास्नान घालावें. "ॐ फालचंद्राय नमः अष्टविधार्चनं समर्पयामि" असें ह्मणून आठ प्रकारचें पूजाद्रव्य अर्पण करावें. "ॐ गजाननाय नमः षोडशोपचारान् समर्पयामि" असें ह्मणून सोळा उपचार अर्पण करावें. "ॐ वक्रदंताय नमः सुवर्णपुष्पं समर्पयामि" असें ह्मणून सुवर्णपुष्प अर्पण करावें. "ॐ हेरंबाय नमः उपचारान् समर्पयामि" असें ह्मणून उपचार अर्पण करावें. "ॐ शूर्पकर्णाय नमः मंत्रपुष्पं समर्पयामि" असें म्हणून मंत्रपुष्प अर्पण करावें. "ॐ स्कंद पूर्वजाय नमः प्रसादं गृण्हामि" असें ह्मणून प्रसाद घ्यावा. उमामहेश्वरांच्या कलशांची उमामहेश्वरांच्या नाम मंत्रानें पूजा करावी. तीन्ही कलशांतील पाणी पुण्याहकलशांत घालून तें पाणी घेऊन पुण्याहवाचनाचे मंत्र ह्मणत अंब्याच्या पानांनीं दाही दिशांस शिंपडावें. मग "ॐ पुण्याहं दीर्घमायुः

॥ अक्षतं चानरिष्टं चास्तु ॥ हिरण्यगर्भे समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ॥ सदाधार पृथ्वीं द्यां उतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥ १ ॥ गन्धाःपांतु ॥ यः प्राणतो निमिषतो महित्वैक इं-द्राादाजागजतो बभूव ॥ य ईशे अस्यद्विपदश्चतुष्पद कस्मै देवाय हविषा विधेम अक्षताःपांतु ॥ जुष्टं देवानामिदमस्तु हव्यमरिष्टा-त्वमुदिहि यज्ञे अस्मिन् पुष्पाणि पांतु ॥ सौमंगल्यं चास्तु ॥ स्व-श्रेयमस्तु ॥ सदाशिवः प्रीयतां शांतिरस्तु ॥ इदं कृत्वा सर्वांग-मक्रियाकरणारंभाः शुभाः शोभनाः प्रवर्तन्ताम् ॥ तमहमोंकार-मादिं कृत्वा भवद्भिरनुज्ञातः पुण्याहं वाचयिष्ये ॥ वाच्यताम् ॥ भद्रं कर्णेभिः श्रुणुयाम देवाः भद्रं पश्येमाक्षिभिर्यजत्राः स्थिरै-रंगैस्तुष्टुवाꣳ सः सनूभिः ॥ व्यसेम देवहितं यदायुः ॥ कपालीशा-ग्नियाम्यनैऋतवलशीघ्रे जटामुकुटधारिविद्येशानंतशंभुसहितः दि-क्पालपूजितः पृथ्वीशः भद्रकालीशः श्रीवीरभद्रः पुण्याहं करोतु ॥ अमरेशप्रवासनैमिषपुष्कराषाढडिंडिभार भूतिनाकुला अभीश्वराः गुह्याष्टकाः पुण्याहं कुर्वन्तु ॥ हरिश्चंद्रः श्रीशैलकल्पमन्मातकेश्वर महाकाळमध्यमकेदार भैरवा इति तेजोऽधीशा आदिगुह्याष्टकाः

---

येथपासून " सदाशिवः प्रीयतां शांतिरस्तु " येथ पर्यंत मंत्र ह्मणणें झाल्यावर कर्त्यानें " इदंकृत्वा सर्वांगमक्रियाकरणारंभाः शुभाः शोभनाः प्रवर्तन्ताम् । तमहमों-कारमादिं कृत्वा भवद्भिरनुज्ञातः पुण्याहं वाचयिष्ये ( हें-पुण्याहवाचन केल्यानें स-गळ्या आगमांत सांगितलेल्या क्रिया करण्याचा आरंभ शुभ व कल्याणप्रद होवो त्या ओंकाराला पुढें करून आपण आज्ञा दिली ह्मणजे मी आजचा शुभ दिवस वदवितों ) " असें ह्मणावें. त्यावर " वाच्यतां ( वदवावें ) " असें उत्तर आल्यावर " भद्रं कर्णेभिः० पासून ब्रह्माण्डपेषणाद्याः पुण्याहं कुर्वन्तु " येथ प-र्यंत मंत्र ( मूळांत पहा ) ह्मणावे. ( यां पैकीं कपालीशाग्नि० वगैरे मंत्रांचा अर्थ असा आहे:–कपालीश, अग्नि, याम्य, नैऋत, वल, शीघ्र, जटा व मुकुटधारी विद्येश, अनंत व शंभु यां सहित असलेला, दिक्पाल ज्याची पूजा करितात असा, पृथ्वीपति व भद्रकालीश जो वीरभद्र तो आजचा दिवस शुभ करो. अ-मरेश, प्रवास, नैमिष, पुष्कर, आषाढ, डिंडिभार, भूति व नाकुल असे हे अ-भीश्वर पाण्याचे अधिपति–गुह्याष्टक शुभ दिवस करोत. हरिश्चंद्र, श्रीशैल, कल्प, मन्मातकेश्वर, महाकाल, मध्यम, केदार व भैरव असे हे तेजोधीश–तेजाचे अ-धिपति–आदिगुह्याष्टक शुभ दिवस करोत. गया, कुरुक्षेत्र, नाखलंड, खल, वि-

पुण्याहं कुर्वन्तु ॥ गयाकुरुक्षेत्रनाखलंडखलविमलाट्टहासमहेंद्रभीमा इति वाय्वधीशा गुह्याष्टकाः पुण्याहं कुर्वन्तु ॥ वस्त्रापदकरुद्रकोट्यविमुक्तमहाबलगोकर्णभद्रकर्णस्वर्णाक्षस्थाणव इति व्योमेश्वराः पवित्राष्टकाः पुण्याहं कुर्वन्तु ॥ ब्रह्मविष्णुरुद्रमहेश्वरसदाशिवाः पुण्याहं कुर्वन्तु ॥ सरस्वती लक्ष्मीगौर्युन्मनीमनोन्मन्यः पुण्याहं कुर्वन्तु ॥ पृथिव्यप्तेजोवाय्वाकाशसूर्यचंद्रात्मानः पुण्याहं कुर्वन्तु ॥ शर्वभवरुद्रोग्रभीमेशानमहादेवपशुपतयोऽष्टमूर्त्यधीश्वराः पुण्याहं कुर्वन्तु ॥ नंदीभृंगी वीरकमाणिभद्रभद्रकर्णिरेणुकदारुक घंटाकर्णगजकर्णवडवाग्नितिलकसमुद्रापोषणब्रह्माण्डपेषणाद्याः पुण्याहं कुर्वन्तु ॥ अंधकासुरसंग्रामे पुरा क्रुद्धस्य शूलिनः ॥ खिन्नमानाल्ललाटांबुभीषणः स्वेदपा महान् ॥ ९ ॥ अभूत्स्वेदोदकोद्भूतस्त्रैलोक्यग्रसनक्षमः ॥ शिवाज्ञप्तेन भूतेन तेन पीतं च शोणितम् ॥ १० ॥ भूगतं चांधकस्यापि तथा तृप्तिं न चागमत् ॥ तदा शिवस्य पुरतस्तपश्चक्रे सुदारुणम् ॥ ११ ॥ ततः कालेन संतुष्टः शिवस्तस्मै

---

मल, अट्टहास, महेंद्र व भीम असे हे वाय्वधीश--वायूचे अधिपति--गुह्याष्टक शुभ दिवस करोत. वस्त्रापदक, रुद्रकोटि, अविमुक्त, महाबल, गोकर्ण, भद्रकर्ण, स्वर्णाक्ष व स्थाणु असे हे व्योमेश--आकाशाचे अधिपति--पवित्राष्टक शुभदिवस करोत. ब्रह्मा, विष्णु, रुद्र, महेश्वर, सदाशिव पुण्य दिवस करोत. सरस्वती, लक्ष्मी, गौरी, उन्मनी व मनोन्मनी ह्या पुण्य दिवस करोत. पृथिवी, आप, तेज, वायु, आकाश, सूर्य, चंद्र, व आत्मा हे पुण्य दिवस करोत. शर्व, भव, रुद्र, उग्र, भीम, ईशान, महादेव, व पशुपति असें हे अष्टमूर्तींचे अधिपति शुभ दिवस करोत. नंदी, भृंगी, वीरक, माणिभद्र, भद्रकर्णि, रेणुक, दारुक, घंटाकर्ण, गजकर्ण, वडवाग्नितिलक, समुद्रापोषण व ब्रह्मांडपेषण वगैरे आजचा शुभ दिवस करोत. ) ( ९ ) पूर्वी अंधकासुराशीं लढाई करितांना रागावलेल्या शंकराला घाम आला. तेव्हां स्वेदपा नांवाचा भयंकर राक्षस शंकराच्या कपाळावर जें घामाचें पाणी आलें होतें ( १० ) त्या घामापासून उत्पन्न झाला. तो त्रैलोक्याला गिळून टाकण्या इतका शक्तिमान् होता. शिवाच्या आज्ञेनें तो राक्षस जें रक्त ( ११ ) अंधकासुराच्या अंगांतून निघून भुईवर पडलेलें होतें तें प्याला. तरी त्यानें त्याची तृप्ति झाली नाहीं तेव्हां शिवाच्या पुढें त्यानें खडतर तप केलें ( १२ ) मग कांहीं काळानें ( त्याच्या तपाच्या योगानें ) संतुष्ट होऊन शंकरांनीं

वरं ददौ ॥ वरेण सोऽभवत्तेन त्रैलोक्यग्रसनक्षमः ॥ १२ ॥ रुरोध स्वेन देहेन त्रैलोक्यं स महासुरः ॥ ततो भीताः सुरास्सर्वे श्रीकंठं शरणं गताः ॥ १३ ॥ देवानां रक्षणार्थाय श्रीकण्ठः करुणानिधिः ॥ रुद्रं चातिबलं नाम मायापाशात्तथाऽसृजत् ॥ १४ ॥ पाशैरतिबलो रुद्रो बध्वा तं चाष्टभिस्ततः ॥ कृत्वा चाधोमुखं दैत्यं चिक्षेप धरणीतले ॥ १५ ॥ ब्रह्मादीनां च देवानां दैत्यदेहे बलात्प्रभुः ॥ निवासमकरोत्तेन वास्तुं देवाधिवासनात् ॥ १६ ॥ संमार्ज्य रंगवल्या चतुरस्रं कृत्वा ॥ वास्तोष्पते प्रतिजानीह्यस्मास्त्वावेशो अनमीवो भवानः ॥ यत्वे महि प्रतितन्नो जुषस्व ॥ शन्न एधि द्विपदे शं चतुष्पदे ॥ इति वास्तुं पूजयित्वा ॥ तत्राष्टदिशं विरच्य ॥ कपालीशमग्निं याम्यं नैऋतिं बलं शीघ्रं जटामुकुटधारिणम् ॥ विघ्नेशं पाताले अनंतं ऊर्ध्वं शंभुं चावाह्य ॥ तत्तन्नाममंत्रेण समर्च्य तत्तत्प्रसादं पुण्याहकलशे निक्षिप्य दिक्षु संमार्जनं कुर्यात् ॥ कपालीशाद्याः पूर्वदिशं संमार्जयन्ताम् ॥ अग्न्याद्याः अग्निदिशं संमार्जयन्ताम् ॥ याम्याद्याः यमदिशं संमार्जयन्ताम् ॥ नैऋताद्याः नैऋ-

---

त्याला वर दिला. त्या वरानें तो त्रैलोक्य गिळून टाकण्या इतका बलाढ्य झाला. ( १३ ) त्या भयंकर राक्षसानें आपल्या शरीरानें तिन्ही लोक अडविले. मग सगळे देव भिऊन श्रीकंठाला ( शंकराला ) शरण गेले. ( १४ ) दयेचा समुद्र अशा शंकरांनीं देवांचें रक्षण करण्याकरितां आपल्या मायेपासून अतिबल नांवाच्या रुद्राला उत्पन्न केलें. ( १५ ) तेव्हां अतिबलरुद्रानें आठ पाशांनीं त्या दैत्याला बांधून त्याचें तोंड खालीं करून त्याला पृथ्वीवर फेंकून दिलें. ( १६ ) ब्रह्मा वगैरे देवांच्या आग्रहानें प्रभूंनीं त्या दैत्याच्या शरीरावर वास केला. त्याकरितां देवांनीं वास केला म्हणून वास्तूला धुवून सारवून चांकोन रांगोळी घालून " वास्तोष्पते० " पासून " द्विपदे शं चतुष्पदे " पर्यंत ( मूळ पहा ) मंत्र ह्मणून वास्तूची पूजा करावी. तेथें आठ दिशा करून कपालीश, अग्नि, याम्य, नैऋति, बल, शीघ्र, जटामुकुटधारी व विघ्नेश या दिक्पालांचें, पाताळांत शेषाचें व ऊर्ध्व दिशेंत शंभूचें आव्हान करून, त्या त्या देवतेच्या नाममंत्रानें त्याची त्याची पूजा करावी. व त्याचा त्याचा प्रसाद घेऊन पुण्याहकलशांत टाकून दाही दिशांला तें पाणी शिंपडावें, आणि " कपालीशाद्याः " पासून " प्रीयतां " येथपर्यंत ( मूळ पहा ) मंत्र ह्मणावें. ( कपालीश वगैरे पूर्व दिशा पवित्र करोत. अग्नि वगैरे आग्नेय दिशा पवित्र करोत. याम्य वगैरे दक्षिण दिशा पवित्र करोत.

तदिशं संमार्जयन्ताम् ॥ बलाद्याः वरुणदिशं संमार्जयन्ताम् ॥ शीघ्राद्याः वायुदिशं संमार्जयन्ताम् ॥ जटामुकुटधार्याद्याः कुबेरदिशं संमार्जयन्ताम् ॥ विद्येशाद्याः ईशान्यदिशं संमार्जयन्ताम् ॥ अनंताद्याः पातालदिशं संमार्जयन्ताम् ॥ शंभ्वाद्याः ऊर्ध्वदिशं संमार्जयन्ताम् ॥ सर्वदिशामतिबलनाम रुद्रः संमार्जयन्ताम् ॥ शांतिरस्तु पुष्टिरस्तु तुष्टिरस्तु वृद्धिरस्तु अविघ्नमस्तु आयुष्यमस्तु आरोग्यमस्तु स्वस्ति शिवं कर्मास्तु कर्मसमृद्धिरस्तु पुत्रसमृद्धिरस्तु वेदसमृद्धिरस्तु आगमसमृद्धिरस्तु पुराणसमृद्धिरस्तु इतिहाससमृद्धिरस्तु शास्त्रसमृद्धिरस्तु धनधान्यसमृद्धिरस्तु अहरहरभिवृद्धिरस्तु बहिर्देशे अरिष्टनिरसनमस्तु यत्पापंतत्प्रतिहतमस्तु यच्छ्रेयस्तदस्तु भक्तमहेश्वरेभ्यः स्वस्तिरस्तु ॥ श्रीमदुमामहेश्वरौ प्रीयेतां प्रीयतां सदाशिवः ॥ मंत्रदक्षिणां तुभ्यमहं संप्रददे ॥ दत्तं तन्नमम प्रीयताम् ॥ इति कारणागमे षोडशसहस्रके वीरशैवसूत्रे पुण्याहं नाम द्वितीयः पटलः संपूर्णः॥इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे कारणागमानुसारेण पुण्याहवाचनं नाम नवमप्रकरणं समाप्तम् ॥

---

नैऋत वगैरे नैऋत दिशा पवित्र करोत. बल वगैरे पश्चिम दिशा पवित्र करोत. शीघ्र वगैरे वायव्य दिशा पवित्र करोत. जटामुकुटधारी वगैरे उत्तर दिशा पवित्र करोत. विद्येश वगैरे ईशान्य दिशा पवित्र करोत. अनंत वगैरे पाताळ दिशा पवित्र करोत. शंभु वगैरे ऊर्ध्व दिशा पवित्र करोत. अतिबलनांवाचा रुद्र सगळ्या दिशा पवित्र करो. शांति असो, पुष्टि असो. तुष्टि (संतोष) असो, वृद्धि असो निर्विघ्नपणा असो, आयुष्य असो, आरोग्य असो. कल्याण होवो! कर्म कल्याणप्रद होवो. कर्मांची समृद्धि होवो. पुत्रांची समृद्धि होवो. वेदाची समृद्धि असो, आगमाची समृद्धि असो, पुराणांची समृद्धि असो. इतिहासाची समृद्धि असो. शास्त्रांची समृद्धि असो धनधान्याची समृद्धि असो, दिवसेंदिवस अभिवृद्धि ( अधिकाधिकवाढ ) असो बाहेर संकटांचा नाश असो. जें पातक आहे तें नाश पावो. जें कल्याणप्रद असेल तें असो. भक्त महेश्वरांचें कल्याण होवो. भगवान् उमामहेश्वरांना संतोष होवो. सदाशिवाला संतोष होवो. तुह्मांला मी मंत्र दक्षिणा देतों. दिलेली दक्षिणा माझी नव्हे. संतोष होवो. ) याप्रमाणें कारणागमांतील षोडशसहस्रकांतील वीरशैवसूत्रांतील पुण्याहनांवाचें दुसरें पटल संपलें.

येथें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील कारणागमाला अनुसरून पुण्याहवाचननांवाचें नववें प्रकरण संपूर्ण झालें.

## अथ वीरशैवाचारकौस्तुभोक्तप्रकारेण गर्भाधानादिचौलान्तसंस्कारविधिर्नाम दशमप्रकरणम्

वीरशैवस्य गर्भादिसंस्कारविधयः क्रमात् ॥ समाध्यन्ताः प्रवक्ष्यन्ते ज्ञानयोगानुकूलतः ॥ १ ॥ विद्वत्कल्पतरो चेतः श्रोतुमुत्कण्ठते मम ॥ गर्भाधानादिसंस्कारान्वीरशैवोपजीविनाम् ॥ २ ॥ शृणु मंत्रिकुलोत्तंस वीरशैवोचितक्रियाः ॥ प्रथमर्तौ त्र्यहादूर्ध्वमाषोडशदिनावधि ॥ ३ ॥ युग्मे ज्योतिःशास्त्रसिद्धे शोभने दिवसे बुधः ॥ कुर्वीत गर्भाधानाख्यं संस्कारमिति तद्विदुः ॥ ४ ॥ नारदीये ॥ यावन्तो ऋतवस्तस्याः समतीयुः पतिं विना ॥ तावन्त्यो भ्रूणहत्याः स्युस्तस्या यो नाददाद्रतिम् ॥ ५ ॥ भ्रूणहत्येति गर्भहतिः ॥ याज्ञवल्क्यः ॥ षोडशर्तुनिशाः स्त्रीणां तासु युग्मासु संविशेत् ॥ ६ ॥ तत्र मनुः ॥ युग्मासु पुत्रो जायेत स्त्रियोऽयुग्मासु रात्रिषु ॥ तस्माद्युग्मासु पुत्रार्थी संविशेदार्तवे स्त्रियम् ॥ ७ ॥ व्यासः ॥ रात्रौ चतुर्थ्यां पुत्रः स्यादल्पायुर्धनवर्जितः ॥ पंचम्यां पुत्रिणी नारी

---

वीरशैवाचारकौस्तुभांत ह्मटलें आहे कीं:– ( १ ) वीरशैवाचे गर्भाधान वगैरे संस्कारविधि समाधिपर्यंत क्रमानें ज्ञानयोगाला अनुकूल अशा रीतीनें सांगण्यांत येतील. ( २ ) हे विद्वानांमध्यें कल्पतरो, वीरशैवांचें गर्भाधान वगैरे संस्कार ऐकण्याला माझें मन उत्सुक झालें आहे. ( ३ ) हे मंत्रिशिरोमणे, वीरशैवांचे संस्कार सांगतों ऐक. स्त्रीला पहिल्या प्रथम ऋतु आला ह्मणजे पहिले तीन दिवस सोडून पुढें सोळा दिवसपर्यंत ( ४ ) ज्योतिःशास्त्रानें ठरविलेल्या शुभ आणि समदिवशीं शहाण्यानें गर्भाधाननांवाचा संस्कार करावा. असें शास्त्रांत सांगितलें आहे. ( ५ ) नारदीयांत ह्मटलें आहे ' जितके ऋतु पतीवांचून स्त्रीचे जातात. तितक्या भ्रूणहत्या तिला जो पति भोग देत नाहीं, त्याला लागतात.' येथें भ्रूण–हत्या ह्मणजे गर्भाचा वध. याज्ञवल्क्यानें ह्मटलें आहे; ( ६ ) ' (ऋतु आल्या दिवसापासून ) सोळारात्री स्त्रियांचा ऋतुकाळ असतो. त्यांत सम दिवशीं भोग द्यावा. ' याविषयीं मनु ह्मणतो.—( ७ ) ' सम रात्रीं ( भोग दिल्यानें ) मुलगा होतो आणि विषम रात्रीं मुलगी होते. ह्मणून मुलगा होण्याची ज्याची इच्छा असेल त्यानें ऋतुकाळीं सम दिवशीं आपल्या स्त्रीशीं गमन करावें. ' व्यासानें ह्मटलें आहे की,– ( ८ ) चवथ्या रात्रीं ( स्त्रीशीं गमन केलें असतां ) अल्पायुषी व दरिद्री मुलगा होतो. पांचव्या रात्रीं मुलगी होते व सहाव्या रात्रीं

षष्ठ्यां पुत्रस्तु मध्यमः ॥ ८ ॥ सप्तम्यां सुभगा योषिदष्टम्यामीश्वरः सुतः ॥ नवम्यां सुभगा दारा दशम्यां तु वरः पुमान् ॥ ९ ॥ एकादश्यामधर्मा स्त्री द्वादश्यां पुरुषोत्तमः ॥ त्रयोदश्यां सुता चेत्स्याद्वर्णसंकरकारिणी ॥ १० ॥ धर्मज्ञश्च कृतज्ञश्च ह्यात्मवेदी दृढव्रतः ॥ प्रजायते चतुर्दश्यां गुणौघो जगतीपतिः ॥ ११ ॥ राजपत्नी महाभागा राजवंशगताथवा ॥ जायते पंचदश्यां तु बहुपुत्री पतिव्रता ॥ १२ ॥ विद्यालक्षणसंपूर्णः सत्यवादी जितेंद्रियः ॥ आश्रयः सर्वभूतानां षोडश्यां जायते पुमान् ॥ १३ ॥ तत्र निषिद्धदिनान्याहमनुः ॥ अमावास्याष्टमी चैव पूर्णमासी चतुर्दशी ॥ ब्रह्मचारी भवेन्नित्यमप्यर्तौ स्नातको भवेत् ॥ १४ ॥ तासामाद्याश्चतस्रस्तु निंदिता द्वादशी तथा ॥ त्रयोदशी च शेषाः स्युः प्रशस्ता दशरात्रयः ॥ १५ ॥ एवं गच्छन् स्त्रियं ज्ञात्वा मघामूलं च वर्जयेत् ॥ स्त्रियो रक्ताधिके स्त्री स्यात्पुंसः शुक्लाधिके पुमान् ॥ १६ ॥

---

मध्यम प्रतीचा मुलगा उत्पन्न होतो. ( ९ ) सातव्या रात्रीं सुंदर मुलगी होते, आठव्या रात्रीं धनाढ्य मुलगा होतो. नवव्या रात्रीं सुरेख मुलगी आणि दहाव्या रात्रीं चांगला मुलगा होतो. ( १० ) अकराव्या रात्रीं अधर्मी मुलगी व बाराव्या रात्रीं श्रेष्ठ मुलगा होतो. तेराव्या रात्रीं ( स्त्रीस भोग दिल्यानें ) जी मुलगी होईल ती वर्ण–संकर करणारी होईल. ( ११ ) चवदाव्या रात्रीं धार्मिक, कृतज्ञ, आत्मरूप जाणणारा, व्रतानें वागणारा, सर्व गुणांनीं युक्त आणि जगाचा अधिपति ( राजा ) असा मुलगा उत्पन्न होतो. ( १२ ) पंधराव्या रात्रीं भाग्यशाली राजाची बायको किंवा राजवंशांत उत्पन्न होणारी, पुत्रवती आणि पतिव्रता अशी मुलगी पोटीं येते. ( १३ ) आणि सोळाव्या रात्रीं विद्यालक्षणांचा, सत्यवादी, जितेंद्रिय व सर्व प्राण्यांना आधारभूत असा मुलगा पोटीं उत्पन्न होतो.' यांत ( सोळा दिवसांत ) वर्ज्य दिवस कोणते ते मनूनें सांगितले आहेत:-'(१४) अमावास्या, अष्टमी, पूर्णिमा व चतुर्दशी या चार तिथींत ऋतुकाळ असला तरी ब्रह्मचर्यानें रहावें ह्मणजे स्नातकाचें श्रेय मिळतें. ( १५ ) सोळा रात्रींपैकीं पहिल्या चार निंद्य आहेत. तशीच बारावी आणि तेरावी रात्रही निंद्य होय. बाकी राहिलेल्या दहा रात्री ( स्त्रीचेठायीं गमन करण्याला ) योग्य होत. ( १६ ) याप्रमाणें जाणून मघा व मूळ हीं नक्षत्रें वर्ज्य करून स्त्रीला भोग द्यावा. स्त्रीचें रक्त अधिक झाल्यास मुलगी होते आणि पुरुषाचें वीर्य अधिक झाल्यास मुल-

तस्माच्छुक्रविवृद्ध्यर्थं भक्ष्यं स्निग्धं च भक्षयेत् ॥ गर्भाधानादिक्रियाणां कर्तृनिर्णयः ॥ शुद्धं मिश्रं च मलिनं पिंडं त्रेधागमोदितम् ॥ १७ ॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ विशुद्धाः प्राकृताश्चेति द्विविधा मानुषाः स्मृताः ॥ शिवसंस्कारिणः शुद्धाः प्राकृता इतरे जनाः ॥१८॥ एतेन मलिनानां वेदविरुद्धतंत्रोदितपांचरात्रादिमलिनधर्मः ॥ मिश्राणां वर्णाश्रमधर्मवतां पैतामहपुराणाद्युदीरित व्रतनियमोपवासकाम्यकर्माणि ॥ नित्यकर्माणि च ॥ शिवाश्रमिणां शुद्धानां तु काम्यफलाभिसंधिरहितवेदागमोदितपरमेश्वराराधनरूपाणि कर्माणि ॥ इति सिद्धान्तशिखामणिवचनपर्यालोचनया गर्भाधानादिषु मंत्रलिंगात्फलाभिसंधिमतां कर्मणां त्याग इति ॥ तत्र तावन्नांदीपुण्याहवचनादीनां पितृदेवताप्रीतिकराणां प्राकृतानां त्यागः ॥ वीरशैवपितृणां मुक्तानां तृप्तिकारणायोगेन वैय्यर्थ्यात् ॥ शिवप्रसादेन नित्यपुण्याहवतां कर्मांगपुण्याहवैय्यर्थ्याच्च अप्राकृतवक्ष्यमा-

---

गा होतो. ( १७ ) ह्मणून वीर्य वाढण्याकरितां स्निग्ध पदार्थ खावे.' गर्भाधान वगैरे संस्कार करणाऱ्याचा निर्णय सांगतात. 'पिंडाचे तीन प्रकार आहेत; असें आगमांत सांगितलें आहे. शुद्ध, मिश्र आणि मलिन.' सिद्धांतशिखामणींत ह्मटलें आहेः '( १८ ) शुद्ध व प्राकृत असे मनुष्याचे दोन भेद आहेत. शिवसंस्कार ज्यांना होतो ते शुद्ध, आणि बाकी राहिलेले प्राकृत होत.' यामुळें वेदविरुद्ध तंत्रांत सांगितलेल्या पांचरात्र वगैरे मलिनधर्म मलिनांचे होत. ब्रह्मदेवानें घालून दिलेलीं पुराण वगैरे यांमध्यें सांगितलेलीं व्रतें, नियम, उपवास वगैरे काम्य कर्में व नित्य कर्में हीं वर्णाश्रमधर्मानें चालणाऱ्या मिश्रांचीं होत. आणि काम्यफळांचा ज्यांत हेतु नसतो अशीं, वेद व आगम यांत सांगितलेलीं परमेश्वराराधनरूप कर्में हीं शिवाश्रमानें वागणाऱ्या शुद्धांचीं होत. या सिद्धांतशिखामणींतील वचनाचा विचार केला असतां, गर्भाधान वगैरे विधींमध्यें मंत्ररूपी लिंगापासून फळ प्राप्त करून घेण्याचा ज्यांचा हेतु असतो त्यांनीं कर्मांचा त्याग केला पाहिजे असें होतें. त्यांत पुनः नांदी पुण्याहवाचन वगैरे पितृदेवतांच्या प्रीत्यर्थ जीं प्राकृत कर्में करण्यांत येतात त्याचा त्याग झाला पाहिजे; कारण वीरशैवांचें पितर मुक्त असल्यामुळें त्यांची तृप्ति करण्याचें कारण नाहीं, ह्मणून हीं कर्में व्यर्थ होत, आणि दुसरें शिवाच्या प्रसादाच्या योगानें वीरशैवांचा प्रत्येक दिवस पुण्याह ( पुण्य दिवस ) असल्यामुळें पुनः कर्मांग ( कर्मांचा एक भाग ह्मणून केलें जाणारें ) पुण्याहवाचनाचें कारण उरत नाहीं. अप्राकृतांकरितां

णपुण्याहप्रकाराणां संग्रहः कालनियमादिकर्मानुष्ठेयं नियमस्य नित्यफलनिवर्त्तकत्वात् तन्नित्यफलं शिवप्रसादरूपो मोक्ष इति ॥

## अथ गर्भाधानविधिः

चतुर्थदिवसादूर्ध्वं मघामूलादिवर्जिते ॥ स्वगृहमुपलिप्य रंगवल्लिकया अलंकृत्य ॥ पूर्वेद्युः स्वस्तिवाचनं कृत्वाऽपरेद्युर्यथाशक्ति माहेश्वरान् भोजयेत् ॥ दम्पती गन्धमाल्यादिभिरलंकृत्य रात्रौ शयनकाले आसनप्राणायामौ कृत्वा तिथ्याद्युच्चार्य ॥ आवाभ्यां समस्तविद्यालक्षणसंपूर्णायुष्मत्पुत्रजननार्थं गर्भाधानं करिष्य इति संकल्प्य उभौ लज्जारहितौ रमेताम् ॥ अपरेद्युः स्नात्वा नित्यकृत्यानंतरं शुद्धासने उपविश्य पीडयित्वा सुगंधाया मूलं शुद्धांबरे निक्षिपेत् ॥ उदिर्ष्वान्तरित्यस्य सूर्यासावित्री त्रिष्टुप् अनेन दक्षिणनासापुटे निनयेत् ॥ अनेन गर्भधारणं भवति ॥ शयनादुत्थिता नारी शुचिः स्यादशुचिः पुमान् ॥ १ ॥

---

( असामान्यांकरितां वीरशैवांकरितां ) जें पुण्याहवाचन सांगण्यांत येतें तें केलें पाहिजे. काळ, नियम वगैरे यांना अनुसरून कर्म करावें लागतें. कारण नियम हा नित्य-फळ ( शाश्वत टिकणारें फळ ) देणारा आहे आणि नित्यफळ शिवप्रसादरूप मोक्ष हेंच होय.

गर्भाधानविधिः–(१)चवथ्यादिवसानंतर मघा, मूळ वगैरे नक्षत्रें वर्ज्य करून (शुभ दिवशीं ) आपलें घर सारवून रांगोळ्या घालून सुशोभित करावें. आदल्या दिवशीं स्वस्तिवाचन उरकून घेऊन दुसऱ्या दिवशीं माहेश्वरांना यथाशक्ति जेवूं घालावें. दंपतीनें गंध फुलें इत्यादिकांनीं शृंगार करावा. रात्रीं निजतांना आसन घालून प्राणायाम करून तिथि वगैरे उच्चारून ' सर्व विद्यांनीं युक्त असा उत्तम लक्षणाचा व पूर्ण आयुष्याचा मुलगा आमच्या दोघांच्या योगानें उत्पन्न व्हावा ह्मणून गर्भाधान करितों' असा संकल्प करून नवरा व वायको या उभयतांनीं लज्जा सोडून क्रीडा करावी. दुसऱ्या दिवशीं स्नान करून नित्यकृत्य आटोपल्यावर शुद्धासनावर वसून सुगंधा नांवाच्या वेलीची मुळी चोळून पांढऱ्या कापडांत घालून ' उदिर्ष्वान्तारित्यस्य सूर्या सावित्री त्रिष्टुप् ' हा मंत्र ह्मणून वधूच्या उजव्या नाकपुडींत रस घालावा. या योगानें गर्भ राहील. शयनावरून उठलेली स्त्री पवित्र असून पुरुष अपवित्र होय.

## अथ पुंसवनमुच्यते

गर्भात्तृतीये मासे पुंसवनं कार्यम् ॥ तृतीये गर्भेऽविज्ञाते चतुर्थे मासि कार्यम् ॥ पूर्वेद्युः स्वस्तिवाचनं नांदीं च कुर्यात् ॥ गर्भिण्या एकभुक्तं कार्यम् ॥ अपरेद्युः शुभदिने पुन्नक्षत्रे नित्यकर्मानंतरमुपलेपनादि कृत्वा आत्मनो दक्षिणपार्श्वे वधूमुपवेश्य च ॥ संस्कारतस्तु सर्वत्र विशेदुत्तरतः सदा ॥ संस्कार्यपुरुषो वापि स्त्री वा दक्षिणतस्तथा ॥ १ ॥ अथ तिथ्यादीनुच्चार्य गार्भिकबैजिकदोषपरिहारार्थं आधारसंस्कारद्वारा आधेयसंस्कारार्थं पुंसवनाख्यं कर्म करिष्ये ॥ अनवलोभनं तंत्रेण कुर्यात् ॥ तस्यायं क्रमः ॥ सरूपवत्साया गोदधिप्रसृतौ निक्षिपेत् ॥ तादृशगवोऽलाभे अन्यस्या गवो दधिप्रसृतौ निक्षिपेत् ॥ तत्राण्डस्थाने माषद्वयं निक्षिप्य शिश्नस्थाने यवं गोधूमं वा एकं निक्षिप्य भर्ता पत्नीं पृच्छेत् ॥ किं ब्रवीषीति त्रिः ॥ सापि पुंसवनमिति त्रिर्ब्रूयात् ॥ अथ प्राशयेत् ॥ एवं प्रसृति

---

पुंसवन—गर्भ राहिल्यापासून तिसऱ्या महिन्यांत पुंसवन करावें. तिसऱ्या महिन्यांत गर्भ समजण्यांत आला नाहीं तर चवथ्या महिन्यांत पुंसवन करावें. पहिल्या दिवशीं स्वस्तिवाचन व नांदी हे विधि करावें. गर्भिणीनें एक वेळां जेवावें. शुभ अशा दुसऱ्या दिवशीं पुरुषनक्षत्रावर नित्यकर्म आटोपल्यानंतर उटी वगैरे लावून गर्भिणीला आपल्या उजव्या बाजूला बसवून घ्यावी. '( १ ) संस्कार करणाऱ्यानें सर्वत्र उत्तरेकडे बसावें; आणि ज्यावर संस्कार करावयाचा आहे तो पुरुष असो किंवा स्त्री असो, त्यानें किंवा तिनें उजवीकडे बसावें.' मग तिथि वगैरेचा उच्चार करून ' गर्भसंबंधीं व बीजसंबंधीं दोष जाण्याकरितां आधारसंस्काराच्या द्वारानें ( बीजाला आधार असलेला गर्भाशय किंवा गर्भिणीचें पोट त्यावर संस्कार करून त्या मार्गानें ) आधेयसंस्कार ( बीजावर संस्कार ) करण्याकरितां पुंसवन नांवाचें कर्म करितों' असा ( मूळांतील 'गार्भिक' पासून ' करिष्ये ' पर्यंत वाक्य घालून ) संकल्प करून तांत्रिक अनवलोभन क्रिया करावी. ती या क्रमानें–आईसारखेंच जिचें वांसरूं आहे अशा गाईचें दहीं गर्भिणीच्या ओंजळींत घालावें. अशी गाय न मिळाल्यास दुसऱ्या गायीचें दहीं ओंजळींत घालावें. नवऱ्यानें अंडाच्या जागीं दोन उडदाचे दाणे व शिश्नाचे जागीं एक यवाचा किंवा गव्हांचा दाणा घालून बायकोला ' काय ह्मणतेस? ' असें तीन वेळां विचारावें. तिनें ' पुंसवन ' असें प्रत्येक वेळीं उत्तर देऊन तें दहीं प्यावें. याप्रमाणें तीन ओंजळी दहीं पाजवावें गोलमंडलाच्या छायेंत पां-

त्रयं प्राश्नीयात् ॥ अथास्यै मण्डलागारच्छायायां दक्षिणस्यां नासिकायां श्वेतदूर्वारसं वस्त्रे क्षिप्त्वा ॥ आ ते गर्भो योनिमेतु प्रमान् बाण इवेषुधिं आदितो अत्यजायतां पुत्रस्ते दशमे मासि अग्निरेतु प्रथमो देवतानां सोस्यै प्रजां मुंचतु ॥ मृत्युपाशात्सदयं राजा वरुणोऽनुमन्यताम् ॥ यथेयं स्त्री पुत्रा मेघननादो दादिति ॥ एवमृग्भ्यां सूक्ताभ्यां वा निनयेत् ॥ इदं तु परिमण्डलगेहेति केचिदाहुः ॥ पत्युरसन्निधौ देवरो वा कुर्यात् ॥ देवर इति तस्यानुजः ॥ इदं कर्म प्रतिगर्भं कार्यम् ॥ इति पुंसवनम् ॥

### अथ सीमन्तोन्नयनमुच्यते

चतुर्थे मासि सीमन्तोन्नयनम् ॥ तत्र गर्भेऽविज्ञाते षष्ठे वा कार्यम् ॥ शुक्लपक्षे पुन्नक्षत्रे वा कार्यम् ॥ पुन्नामश्रवणश्चैव तिष्यो हस्तपुनर्वसू ॥ अभिजित्प्रौष्ठपादौ च अनुराधा तथाश्विनी ॥ १ ॥ एषु नक्षत्रेषु मध्यमपादद्वयेषु कर्म कुर्यात् ॥ गृहं पूर्ववदलंकृत्य स्वस्तिवाचनं नांदीं च कुर्यात् ॥ अपरेद्युर्नित्यकृत्यानंतरं शुद्धदेशे गोमयेनोपलिप्य स्वासने उपविश्य एनां गर्भिणीं बैजिकगार्भिक-

---

ढऱ्या दूर्वांचा रस कापडांत घालून ' आ ते गर्भो ' पासून ' मेघननादो दादिति ' पर्यंत ऋग्वेदांतील दोन सूक्तें ( मूळांत दिलेलीं ) ह्मणून तिच्या उजव्या नाकपुडींत घालावा. हें गोल घरांत करावें असें कित्येकजण ह्मणतात. नवरा जवळ नसल्यास दीरानें करावें. दीर ह्मणजे नवऱ्याचा धाकटा भाऊ. हें पुंसवन प्रत्येक गर्भाच्या वेळीं ( जेव्हां जेव्हां गर्भ राहील तेव्हां तेव्हां ) करावें. येथें पुंसवन संपलें.

सीमंतोन्नयनः—चवथ्या महिन्यांत सीमंतोन्नयन करावें. चवथ्या महिन्यांत गर्भ निदर्शनास आला नाहीं तर सहाव्या महिन्यांत करावें. शुद्धपक्षांत पुरुषनक्षत्रावर करावें ' श्रवण, पुष्य, हस्त, पुनर्वसु, अभिजित्, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, अनुराधा व अश्विनी हीं पुरुषनक्षत्रें होत.' या नक्षत्रांवर ( पहिलें व शेवटचें चरण सोडून ) मधील दोन चरणांवर हें समिंतोन्नयन करावें. पूर्वी प्रमाणें घर शृंगारून स्वस्तिवाचन व नांदी हीं कर्मे करावीं. दुसऱ्या दिवशीं नित्यकृत्य झाल्यावर पवित्र जागीं गाईच्या शेणानें सारवून आपल्या आसनावर बसून ' बीजसंबंधीं व गर्भसंबंधीं दोष जाण्याकरितां क्षेत्र संस्काराकरितां या ग-

दोषपरिहारार्थं क्षेत्रसंस्कारार्थं सीमन्तोन्नयनाख्यं कर्म करिष्ये ॥ अथास्यै युग्मेन शलाटुग्लप्सेन त्रीण्या च शलल्या त्रिभिश्च कार्पासपिंजूलैरेकीकृत्य ललाटदेशादारभ्य मूर्धान्तं भूर्भुवः सुवरोमिति त्रिश्चतुर्वा लेखयेत् ॥ तत्रैव निधाय शलाटुमिति तरुणं फलं ग्लप्स इति उदुंबरगुच्छं उदुंबरमालां कण्ठे निधाय वीणागाथिनौ शं शास्ते सोमं राजानं संगतायतमिति सोमेनो राजावतु मानुषः प्रजानिविष्टं चक्रसामिति वीणागाधमेतत् ॥ तत्समीपे या नदी स्थिता तन्नामोक्त्या गंगागोदावरीसरस्वतीति नामान्युच्चारयेत् ॥ वृद्धसुवासिन्यो यद्युपदिशेयुस्तत्तथा कुर्यात् ॥ प्रतिगार्भ्ये न कुर्यात् ॥ माहेश्वरान् कर्मांगं यथाशक्ति भोजयेत् ॥ इति सीमन्तविधिः ॥

एवं मंत्रिकुलोत्तंस गर्भाधानं च पुंसवम् ॥ सीमन्तोन्नयनं कर्म वीरशैवाविरोधतः ॥ कृत्वा जातस्य संस्कारं कुर्याद्बालस्य तत्क्रमात् ॥ १ ॥ वीरशैवाचारप्रदीपिकायाम् ॥ वीरशैवस्थितानां तु मा-

---

भिणिला मी सीमंतोन्नयन नांवाचा संस्कार करितों असा ( मूळांतील वाक्य घालून ) संकल्प करावा. मग दोन शलाटु ( हिरवीं अपक्क ) ग्लप्सें उंबराचीं फळें व तीन साळपिसें तीन कापसाच्या वातींनीं एके ठिकाणीं करून गर्भिणीच्या कपाळापासून मस्तकापर्यंत भांगेंत 'भूर्भवः सुवरोम्' असें तीन किंवा चार वेळां लिहावें, आणि तें सगळें तेथेंच ठेवावें. ( वरील वाक्यांत ) शलाटु ह्मणजे कच्चें ( हिरवें अपक्क ) आणि ग्लप्स ह्मणजे उंबराच्या फळांचा गुच्छ. गर्भिणीच्या गळ्यांत उंबराच्या फळांची माळ घालावी, व 'वीणागाथिनौ' पासून 'वीणागाधिमेतत्' पर्यंत मंत्र ह्मणावा. गांवाजवळ जी नदी असेल तिचें नांव घेऊन गंगा, गोदावरी, सरस्वती वगैरे नांवें उच्चारावीं. वृद्ध सवाष्ण वायका जसें सांगतील तसें करावें हा संस्कार प्रत्येक गर्भाच्या वेळीं करावयाचा नाहीं. या संस्काराचा एक भाग ह्मणून माहेश्वरांना यथाशक्ति जेवूं घालावें येथें सीमंतोन्नयन संस्कार संपला.

'हे मंत्रिश्रेष्ठा, याप्रमाणें गर्भाधान पुंसवन व सीमंतोन्नयन हीं कर्में वीरशैव विधीनें केल्यानंतर त्याच क्रमानें उत्पन्न झालेल्या मुलाचें जातकर्म करावें.' वीरशैवाचारप्रदीपिकेंत ह्मटलें आहेः– '( २ ) वीरशैवांच्या बावतींत गर्भाच्या आ-

सि गर्भाष्टमे गुरुः ॥ पंचसूत्रकृतं लिंगमर्चयेद्विधिवच्छुभम् ॥ २ ॥ नादो लिंगमिति प्रोक्तं बिंदुः पीठमुदाहृतम् ॥ नादबिंदुसमायुक्तं लिंगाकारमिहोच्यते ॥ ३ ॥ आकाशं लिंगमित्याहुः पृथ्वी तस्याधिपीठिका ॥ आलयं सर्वभूतानां लयानां लिंगमुच्यते ॥ ४ ॥ यजुर्वेदे शतरुद्रीये ॥ या ते रुद्र शिवा तनूरघोराऽपापकाशिनी ॥ तया नस्तनुवाशन्तमया गिरिशं ताभिचाकशीः ॥ अस्यार्थः ॥ रुदं रोदनं संसारदुःखजनितं द्रावयतीतिरुद्रः ॥ रुदमज्ञानं द्रावयतीति वा रुद्रः ॥ हे रुद्र अघोरा शांताकारा शिवा मंगलप्रदा या ते तनूः लिंगरूपशरीरं सा अपापकाशिनी अपापेषु पापरहितेषु काशतइत्यपापकाशिनी ॥ लिंगरूपशरीरावच्छिन्नः शिवः शमदमादिसंपन्नभक्तगात्रे धार्य इति पर्यवसितोऽर्थः ॥ तत्र जागरूके-

---

ठव्या महिन्यांत पंचसूत्राचें केलेल्या शुभलिंगाची विधीनें पूजा करावी. ( गर्भांतील शिशूचें तें लिंग असें जाणून पूजा करावी ) ( ३ ) नादच लिंग व बिंदु हें पीठ होय. नाद व बिंदु मिळून लिंगाकार होतो. ( ४ ) आकाश हें लिंग व पृथ्वी त्याची पीठिका होय. लय पावणाऱ्या सर्व भूतांचें लिंग हें आश्रयस्थान होय.' यजुर्वेदांतील शतरुद्रीयांत म्हटलें आहे:—'या ते रुद्र शिवा तनूरघोराऽपापकाशिनी । तया नस्तनुवा शन्तमया गिरिशंताभिचाकशीः ॥ (याचा अन्वय असा:- रुद्र या ते शिवा अघोरा अपापकाशिनी तनूः गिरिशंत तथा शंतमया तनुवा नः अभिचाकशीः ) हे रुद्रा, तुझें जें मंगलप्रद, शांत आणि निष्पाप भक्तांच्याठिकाणीं प्रकाश पावणारें शरीर ( लिंगरूप ) आहे, त्या सुखस्वरूप शरीरानें, कैलासावर सुख देणाऱ्या देवा, आमच्यापुढें प्रकाशमान हो ).' याचा अर्थ ( विस्तारानें ) असा:–( रुद्र शब्दाची व्युत्पत्ति ) ( रुदं द्रावयतीति रुद्रः ) 'रुदं' ह्मणजे रोदन संसारदुःखापासून होणारा शोक–त्याला 'द्रावयति' ह्मणजे नाहींसें करितो तो रुद्र ( संसारदुःखापासून उत्पन्न होणारा शोक जो नाहींसा करितो तो रुद्र ). किंवा 'रुदं' ह्मणजे अज्ञानाला 'द्रावयति' ह्मणजे दूर करितो ( अज्ञान दूर करणारा) तो रुद्र. ( अशा ) हे रुद्रा, 'अघोरा' ह्मणजे शांत आकाराची, 'शिवा' ह्मणजे मंगलप्रद–सौख्य देणारी–जी तुझी 'तनू' ह्मणजे काया--लिंगरूप शरीर–ती 'अपापकाशिनी' ह्मणजे अपाप्यांमध्यें–पापरहित अशा भक्तांमध्यें---'काशिनी' ह्मणजे प्रकाश पावणारी आहे. लिंगरूप शरीरानें मर्यादित झालेला शिव, शम, दम वगैरे गुण ज्यांत आहेत अशा भक्तांच्या शरीरावर धारण केला जावा असा शेवटीं अर्थ निघतो. भक्त–शरीरावर शिवाचें लिंगरूप शरीर जागृत असतें असें

त्यनुसंधेयम् ॥ अथवा हे रुद्र ते तव शिवा निर्दोषत्वेन निरतिशयगुणाकरत्वेन शिवंकरत्वेन च प्रसिद्धा या तनूः " लिंगं तु शिवयोर्देह " इत्यागमवाक्याल्लिंगरूपिणी मूर्तिः अघोरा शिवयोगेनैव हृदयंगमा ॥ किंच ॥ अपापाः शिवदीक्षया विगतकल्मषाः अथवा ॥ अनेकजन्मसिद्धानां श्रौतस्मार्तानुवर्तिनाम् ॥ नराणां क्षीणपापानां शिवभक्तिः प्रजायते ॥ ५ ॥ प्रसादाद्देवताभक्तिः प्रसादो भक्तिसंभवः ॥ यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांकुरः ॥ ६ ॥ इत्यादिवचनप्रामाण्यात् बहुजन्मकृतैः पुण्यैः प्रक्षीणपापपंजराः ॥ ये केचन संति त एव अपापा इत्यर्थः ॥ अपापेषु भक्तेषु काशिनी इष्टप्राणभावलिंगरूपेण सुप्रकाशिनीत्यर्थः ॥ गिरिशंत गिरौ कैलासे शं स्वोपासकानां निरतिशयानंदस्वरूपसुखं तनोतीति गिरिशंतः ॥ हे गिरिशंत शंतमया सुखतमया

---

समजावें. अथवा ( त्याच चरणाचा दुसऱ्या तऱ्हेनें अर्थ ) हे रुद्रा, 'ते' म्हणजे तुझी 'शिवा' ह्मणजे निर्दोषपणानें अनुपम गुणांचें माहेरघर ह्मणून आणि कल्याण करणारी ह्मणून प्रसिद्ध असलेली जी 'तनू' ह्मणजे ' लिंगं तु शिवयोर्देहः ( लिंग हेंच पार्वती परमेश्वराचें शरीर होय )' या आगमवाक्यानें--लिंगरूप मूर्ति. 'अघोरा' ह्मणजे परमात्म्याच्या योगानें ( परमात्म्याचा तिच्यामध्यें वास असतो ह्मणून ) हृदयंगम--मनोरम. पुढें ' अपापाः ' ह्मणजे शिवदीक्षा घेतल्यामुळें ज्यांचें पातक नाहींसें झालें आहे असे; किंवा, ( ५ ) 'अनेक जन्म सिद्ध असलेल्या, व श्रुति व स्मृति यांत सांगितलेल्या धर्मांप्रमाणें वागणाऱ्या निष्पाप मनुष्यांमध्येंच शिवभक्ति उत्पन्न होते; ( ६ ) जसा बीजापासून अंकुर उत्पन्न होतो आणि अंकुरापासून बीज उत्पन्न होतें, त्याप्रमाणें प्रसादापासून देवतांविषयीं भक्ति उत्पन्न होते, आणि भक्तीपासून प्रसाद प्राप्त होतो;' इत्यादि वचनांच्या प्रमाणांवरून अनेक जन्मजन्मांतरीं केलेल्या पुण्यानें ज्यांचें पातक नाहींसें झालें आहे, असे जे कोणी असतील तेच 'अपाप ( निष्पाप )' होत असा अर्थ. (अशा प्रकारच्या) पापरहित भक्तांच्याठिकाणीं ' काशिनी ' म्हणजे इष्टलिंग, प्राणलिंग व भावलिंग या रूपानें प्रकाश पावणारी--असा अर्थ होतो. ( 'तयानस्तनुवा' इत्यादि दुसऱ्या चरणाचा अर्थ ) 'गिरिशंत' ( या शब्दाची व्युत्पत्ति ) यांत ( गिरौ शंतनोतीति गिरिशंतः ) ' गिरौ ' ह्मणजे कैलासावर, 'शं' ह्मणजे आपल्या उपासकांना निरुपम आनंदरूप सुख, 'तनोति' ह्मणजे देतो, तो गिरिशंत ( कैलासावर आपल्या भक्तांना अतिशय सुख देणारा तो गिरिशंत ) होय. हे गिरिशंता, ' शंतमया '

तया लिंगस्वरूपया तनुवा शरीरेण नः अस्माकं अभिचाकशीः संसारनिमित्तं पुण्यपापसंचयं प्रणाद्य साक्षात्प्रकाशस्वेत्यर्थः ॥ अत्रोपबृंहणवचनानि ॥ स्कांदे ॥ लिंगं शिवा तनूः प्रोक्ता मूर्तिर्घोरतनूः स्मृता ॥ अपापेषु च भक्तेषु तयोर्मध्ये शिवा तनूः ॥ ७ ॥ काशते परमेशस्य शिष्टास्ते लिंगधारिणः ॥ अघोराऽपापकाशीति या ते रुद्र शिवा तनूः ॥ ८ ॥ यजुषा गीयते यस्मात्तस्माच्छैवोऽघवर्जितः ॥ नित्यं भाति तदंगेषु या ते रुद्र शिवा तनूः ॥ अघोराऽपापकाशीति श्रुतिराह सनातनी ॥ ९ ॥ किंच हरदत्ताचार्यकृते चतुर्वेदतात्पर्यसंग्रहे ॥ वृत्तम् ॥ अपापकाशीति वपुः श्रुतं ते शिष्टाः प्रसिद्धा भगवन्नपापाः ॥ अतस्त्वदीयानपहाय भक्तानन्यानशिष्टा निति निश्चिनोमि ॥ १० ॥ एवं युंजानः प्रथमं मन इत्यादिश्रुतीनांनीलकण्ठाचार्यमंचणपंडितमायिदेवप्रभृतिभिर्लिंगधारणपरत्वेन व्याख्यातत्वा-

---

म्हणजे अतिशय सुख देणाऱ्या लिंगरूप ‘ तनुवा ’ म्हणजें शरीरानें ‘नः’ म्हणजे आम्हांला, ‘ अभिचाकशीः ’ म्हणजे प्रपंचामुळें उत्पन्न होणारा पुण्यपापांचा संचय नाहींसा करून प्रत्यक्ष प्रकाशमान हो, असा अर्थ. याच अर्थाचें पोषण करणारीं वचनें:—स्कंदपुराणांत म्हटलें आहे:—‘ ( ७ ) लिंग हेंच मंगलप्रद शरीर आणि मूर्ति हें भयंकर ( घोर ) शरीर होय. या दोहों शरीरांपैकीं ( लिंगरूप ) मंगलप्रद शरीरच पापरहित अशा भक्तांजवळ ( ८ ) प्रकाशमान होतें. परमात्म्याचें लिंग जे धारण करतात ते शिष्ट ( ज्ञाते ) होत. ‘हे रुद्रा, मंगलप्रद आणि शांत अशी जी तुझी ( लिंगरूप ) मूर्ति, ती निष्पाप भक्तांच्याठिकाणीं प्रकाशते ( निष्पाप भक्त लिंगरूप मूर्ति धारण करितात )’ असें ( ९ ) यजुर्वेदांत ज्या अर्थी म्हटलें आहे, त्या अर्थी शैव ( शिवभक्त ) हा पापरहित होय. कारण ‘हे रुद्रा, मंगलप्रद व शांत अशी जी तुझी मूर्ति निष्पाप भक्तांच्या ठिकाणीं प्रकाश पावते’ असें सनातन श्रुतीनें म्हटलें आहे ती मूर्ति या शैवाच्या अंगावर रोज दिसते.’ याशिवाय हरदत्ताचार्यांनें केलेल्या चतुर्वेदतात्पर्यसंग्रहांत म्हटलें आहे कीं, ‘(१०) हे भगवन्, तुझी मूर्ति निष्पाप भक्तांमध्यें प्रकाश पावणारी (अपापकाशी) आहे असें श्रुतीनें म्हटलें आहे, तेव्हां ( ती मूर्ति ज्यांच्याठिकाणीं दिसते असे ) निष्पाप भक्तच शिष्ट ( ज्ञाते ) होत असें सिद्ध होतें. म्हणून तुझ्या भक्तांशिवाय जे दुसरे राहिले ते शिष्ट नव्हेत ( ज्ञाते नव्हेत ) असें मी निश्चयानें समजतों.’ ‘एवं युंजानः प्रथमं मनः’ इत्यादि श्रुतींची नीलकंठाचार्य, मंचणपंडित, मायिदेव इत्यादिकांनीं लिंगधारणपर व्याख्या ( टीका ) केली आहे. तेव्हां ‘तुम्ही म्हणतां

त् ॥ ननु भवदुदाहृतश्रुतीनां भाष्यकृद्भिर्लिंगधारणपरतया अव्याख्यातत्वात्कथमुपबृंहणवचनानां प्रामाण्यमितिचेन्न ॥ यश्चतुर्वेदविद्विप्रः पुराणं वेत्ति नार्थतः ॥ तं दृष्ट्वा भयमाप्नोति वेदो मां प्रतरेदिति ॥ ११ ॥ सूतसंहितावचनात् इतिहासपुराणाभ्यां वेदार्थमुपबृंहयेत् ॥ बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रतरेदिति ॥ १२ ॥ इति महाभारते व्यासवचनाच्च पूर्वोदाहृतश्रुतीनां यथोक्तोपबृंहणवचनानुसारेणैवार्थं वक्तुं शक्यत्वात् ॥ उदाहरणानि ॥ हंसोपनिषदि ॥ हृदब्जमध्ये लिंगं धृत्वा ज्योतिषि संविशंति ॥ अत्याश्रमस्थाः परिमुच्यन्ति सर्वे । लिंगांगशोभामोक्षमार्गैकनिष्ठाः ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले । शिवप्रसादात्परिमुच्यन्ति सर्वे ॥ लिंगांगसामरस्याच्च शरीरे लिंगधारणात् । नियमेनैव धृत्वा ते मुक्ताः संसारबंधनात् ॥ १३ ॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ सर्वाननशिरोग्रीवः सर्वभूतगुहाशयः ॥ सर्वव्यापी च भगवांस्तस्मात्सर्वगतः शिवः ॥ १४ ॥ मनु-

---

त्या श्रुतीची भाष्यकारांनीं लिंगधारणपर व्याख्या ( अर्थ व टीका ) केली नसल्यामुळें, त्याच अर्थाचें पोषण करणारीं ह्मणून जीं तुह्मीं वचनें दिलीं तीं प्रमाण कशीं मानावीं?' अशी शंका येईल तर ती व्यर्थ होय. '( ११ ) जो चारही वेद जाणणारा ब्राह्मण आहे, तो जर पुराणाचा अर्थ जाणत नसेल तर त्याला पाहून ' हा मला फसवील ' ह्मणून वेद भितो ' असें सूतसंहितेंत वचन आहे; आणि ( १२ ) इतिहासपुराणांच्यायोगानें वेदाचा अर्थ स्पष्ट करून घ्यावा. वेदाचें ज्यानें थोडें अध्ययन केलें आहे त्याचें 'हा मला फसवील' असें वेदाला भय वाटतें;' असें महाभारतांत व्यासाचें वचन असल्यामुळें पूर्वी सांगितलेल्या श्रुतींचीं तद्वाचक जीं वचनें असतील त्यांना अनुसरूनच अर्थ केला पाहिजे. याला उदाहरणें—हंसोपनिषदांत ह्मटलें आहे, 'हृदयकमळांत लिंगधारण करून जोतीमध्यें मिळतात.' ' लिंगांगशोभेपासून मिळणाऱ्या मोक्षाच्या मार्गाला लागलेले सर्व अत्याश्रमी मुक्त होतात.' 'ब्रह्मलोकांमध्यें ते सगळे प्रळयकालीं शिवाच्या कृपेनें मुक्त होतात.' '( १३ ) शरीरावर लिंग धारण करण्यानें लिंग व अंग यांचा एकभाव झाल्यामुळें संसारबंधनापासून ते अगदीं निश्चयानें मुक्त होतात.' श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितलें आहे कीं,– '( १४ ) भगवान् शिव हा सर्वतोंडांचा, सर्व मस्तकांचा, सर्वमानांचा, सर्व भूतांचा आत्मा व सर्वव्यापी असल्यामुळें सर्वांमध्यें भरलेला आहे.' मनुस्मृतींत—( १५ ) जो सर्व कर्मांपासून मुक्त झाला

स्मृतौ ॥ सर्वकर्मविमुक्तस्य ध्यानयोगरतस्य च ॥ न तस्य दहनं कार्यं न च पिंडोदकक्रिया ॥ १५ ॥ शिवध्यानरतो भूत्वा शिवलिंगांगसंयुतः ॥ शिवेतरपरित्यागी ध्यानयोगी स उच्यते ॥ १६ ॥ बोधायनस्मृतौ ॥ सर्वसंगनिवृत्तस्य ध्यानयोगरतस्य च ॥ न तस्य दहनं कुर्यान्नाशौचं नोदकक्रियाम् ॥ १७ ॥ शातातपस्मृतौ ॥ वानप्रस्थं योगिनं च लिंगैक्यं भिक्षुकं यतिम् ॥ तुर्याश्रमाणां मध्ये च रसायां निक्षिपेन्मृतम् ॥ १८ ॥ पद्मपुराणे ॥ कण्ठेषु हरकण्ठादिमुनयो मनवस्तथा ॥ सर्वदा शिवलिंगं तु धारयंति यजंति च ॥१९॥ शिवगीतायाम् ॥ अज्ञोपहासो भक्तांश्च भूतिरुद्राक्षधारिणः ॥ लिंगिनो यश्च वा द्वेष्टि ते नैवात्राधिकारिणः ॥ २० ॥ शिवधर्मोत्तरे ॥ ये योगिनं द्विषंत्यज्ञाः सर्वपापेष्ववस्थिताः ॥ ये शिवज्ञाननिरतं प्रद्विषन्तीह योगिनम् ॥ २१ ॥ विकल्प्यन्ते महात्मानं ये मूढाः शिवयोगिनम् ॥ ते यान्ति पितृभिः सार्धं नरकेषु न संशयः ॥ २२ ॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ पाणिनिश्च कणादश्च कपिलो गौतमादयः ॥ प्रसाद-

---

आहे व जो ध्यानयोगांत मग्न झाला आहे, त्याचें दहन करूं नये व पिंडप्रदान वगैरे क्रियाही करूं नये; ( १६ ) जो शिवाचेंच नेहमीं ध्यान करितो, शिवलिंगांगाचें ज्याला ज्ञान आहे व शिवावांचून इतराचा जो त्याग करितो, त्यालाच ध्यानयोगी ह्मणावें;' असें सांगितलें आहे. बोधायनस्मृतींत ह्मटलें आहे कीं,— '( १७ ) सर्व संगापासून जो मुक्त झाला आहे व ध्यानयोगांत जो निमग्न झाला आहे, त्याचें दहन करूं नये, त्याचा अशौच (सूतक) वाळगूं नये आणि त्याच्याबद्दल तर्पणही करूं नये.' शातातपस्मृतींत असें ह्मटलें आहे--'( १८ ) वानप्रस्थ, योगी, लिंगांत ऐक्य पावलेला, भिक्षुक, यति आणि सन्यासी यांना मरणोत्तर जमिनींत पुरावें.' पद्मपुराणांत असें सांगितलें आहे--'( १९ ) हरकंठ वगैरे मुनि व मनु शिवलिंगाला नेहमीं कंठांत बाळगतात आणि त्याची पूजा करितात.' शिवगीतेंत ह्मटलें आहे-- '( २० ) मूढ, उपहास करणारे, व विभूति रुद्राक्ष धारण करणाऱ्या लिंगधारी भक्ताचा द्वेष करणारे इतकेजण येथील अधिकारी नव्हेत.' शिवधर्मोत्तरांत--'( २१ ) जे मूढ, योग्याचा द्वेष करितात, सर्व पातकें करणारे जे शिवज्ञानांत तत्पर असलेल्या योग्याचें वाईट चिंतितात, (२२) जे मूर्ख लोक महात्म्या शिवयोग्याविषयीं मनांत विकल्प आणतात, ते आपल्या पितरांसुद्धां नरकांत जातात यांत संशय नाहीं,' ब्रह्मांडपुराणांत--- '( २३ ) पाणिनि, कणाद, कपिल, गौतम वगैरे प्रसादसेवनानें, ध्यानाख्यायोगानें, पूजेनें व

सेवनाद्ध्यानादर्चनाद्धारणादपि ॥ जाता दर्शनकर्तारः श्रावयंति ज-
गत्त्रयम् ॥ २३ ॥ लैंग्ये ॥ अक्षपादादयः सर्वे शक्तयः परया मुदा ॥
धारयन्त्यलिकाग्रेषु शिवलिंगमहर्निशम् ॥ २४ ॥ स्कांदे ॥ लिंगधा-
रणमाख्यातं द्विधा सर्वार्थसाधकैः ॥ बाह्यमाभ्यन्तरं चेति मुनिभिर्मो-
क्षकांक्षिभिः ॥ २५ ॥ आधारे हृदये वापि भ्रूमध्ये वा निरंतरम् ॥
ज्योतिर्लिंगानुसंधानं तदेवान्तरमुच्यते ॥ २६ ॥ अन्तर्धारयितुं
लिंगमशक्तः शक्त एव वा ॥ बाह्यं तु धारयेल्लिंगं तद्रूपमिति नि-
श्चयात् ॥ २७ ॥ ब्रह्मविष्ण्वादयो देवा मुनयो गौतमादयः ॥ धा-
रयन्ति सदा लिंगमुत्तमांगे विशेषतः ॥ २८ ॥ वातुलागमे ॥ लिं-
गांगसंगं कुर्वन्तं दृष्ट्वा द्विजवरं रविः ॥ स्थानाच्चलत्ययं भि-
त्वा मंडलं मे व्रजेच्छिवम् ॥ २९ ॥ तेषां संरक्षणं यस्तु कुरुते
मनुजोत्तमः ॥ स धन्यः स कृतार्थः स्यात्स शिवैक्यपदं व्रजेत्
॥ ३० ॥ तस्मात्सर्वं परित्यज्य सर्वभावेन सर्वदा ॥ पूजयेदाद-
रेणैव द्विजं लिंगांगसंगिनम् ॥ ३१ ॥ यः पूजयति लिंगांगध्या-

---

धारणेच्यायोगानें दर्शनकर्ते ( शास्त्रकर्ते ) झाले. हीं दर्शनें तिन्ही लोकांत माहीत आहेत.' लिंगपुराणांत--'( २४ ) अक्षपाद वगैरे व सगळ्या शक्ति कपाळाच्या अ-ग्रभागीं मोठ्या आनंदानें रात्रंदिवस लिंग धारण करितात.' स्कंदपुराणांत--'(२५) सर्व अर्थ साधणाऱ्या आणि मोक्ष मिळवूं इच्छिणाऱ्या मुनींनीं लिंगधारणाचे दोन प्रकार सांगितले आहेत, बाह्यलिंगधारण व अंतरंगलिंगधारण. ( २६ ) आ-धारचक्रीं, हृदयांत किंवा दोन्ही भिवयांच्या मध्यभागीं जें ज्योतिर्लिंग निरंतर असतें त्याचें ध्यान करणें, याला अंतरंगलिंगधारण ह्मणतात. ( २७ ) अंतरंग लिंगधारण करण्याची शक्ति असो किंवा नसो, परंतु त्या अंतर्लिंगाचेंच स्वरूप असें बाह्यलिंग ( अंगावर ) धारण केलें पाहिजे. ( २८ ) ब्रह्मदेव, विष्णु वगैरे देव, व गौतम वगैरे ऋषि विशेषेंकरून नेहमीं मस्तकावर लिंगधारण करितात.' वातुलागमांत--'( २९ ) लिंग व अंग यांचा संयोग करणाऱ्या ब्राह्मणाला पाहून-हा माझ्या मंडलाचा भेद करून शिवाकडे जाईल ह्मणून--सूर्यही आपली जागा सोडतो. ( ३० ) त्यांचें ( लिंगांगाचा संयोग करणाऱ्यांचें ) संरक्षण जो मनुष्य करतो, तो धन्य होय, त्याचें ( जन्माला येऊन ) सार्थक्य झालें. तो शिवांत ऐक्य पावेल. ( ३१ ) ह्मणून सगळें एकीकडे ठेवून पूर्ण भावानें लिंगांगसंयोगी ब्राह्मणाची नेहमीं आदरानें पूजा करावी. ( ३२ ) लिंगांगाचें ध्यान करण्यांत

नासक्तधियं द्विजम् ॥ पुनर्भवो न तस्यास्ति सत्यं सत्यं मयोदितम् ॥ ३२ ॥ इत्यादिवचनप्रामाण्याल्लिंगधारणरूपधर्मस्य सिद्धत्वं तदनुष्ठानवतां ब्राह्मण्यं च सिद्धम् ॥ क्रियासारे एकोनविंशोपदेशे लिंगलक्षणम् ॥ पंचसूत्रविवरणम् ॥ धारणार्हस्य लिंगस्य लक्षणंत्वथ कथ्यते ॥ स्फाटिकं शैलजं वापि चंद्रकान्तमयं तु वा ॥ ३३ ॥ वाणं वा सूर्यकान्तं वा लिंगमेकं समाहरेत् ॥ नादेयं शैलसंभूतं पुण्यक्षेत्रसमुद्भवम् ॥ ३४ ॥ गंगोद्भवं सागरजं लिंगं तन्मम संमतम् ॥ यद्देवि शिवनाभाख्यं लिंगं तदहमेव हि ॥ ३५ ॥ काम्यान्यन्यानि लिंगानि तत्तदिष्टार्थदानि हि ॥ श्रीशैलजं महादेवि ऐहिकामुष्मिकप्रदम् ॥ ३६ ॥ सर्वोत्तमोत्तमं लिंगं सर्वाभीष्टफलप्रदम् ॥ यद्दत्तं गुरुणा देवि लिंगं तदहमेव हि ॥ ३७ ॥ श्वेतं रक्तं तथा पीतं कृष्णं चेति चतुर्विधम् ॥ विप्रादीनां च वर्णानामिदं धार्यं यथाक्रमम् ॥ ३८ ॥ लिंगवृत्तसमं पीठं दैर्घ्यं विस्तार एव च ॥ तदर्धं गोमुखं चैव प्रोक्तं लिंगस्य लक्षणम् ॥ ३९ ॥ सपीठस्य तु

---

ज्याचें चित्त गढलें आहे अशा ब्राह्मणाची जो पूजा करितो, त्याला पुनर्जन्म नाहीं; हें खरें खरें मी सांगतों.' इत्यादि वचनांच्या प्रमाणांवरून लिंगधारणरूप धर्म सिद्ध होतो ( लिंगधारण करावें असा धर्म सिद्ध होतो ) आणि त्याप्रमाणें वागणारे ब्राह्मण होत असेंही सिद्ध होतें. क्रियासारांत एकोणविसाव्या उपदेशांत लिंगाचें लक्षण असें सांगितलें आहे--' पंचसूत्रविवरण--( ३३ ) धारण करण्याला योग्य अशा लिंगाचें आतां लक्षण सांगतों. स्फटिकाचें, पाषाणाचें, चंद्रकांताचें, ( ३४ ) सूर्यकांताचें किंवा वाणाचें एकलिंग घ्यावें. पर्वतापासून झालेलें, नदींत झालेलें, पुण्यक्षेत्रांत झालेलें, ( ३५ ) गंगेंत झालेलें किंवा समुद्रांत झालेलें लिंग मला मान्य आहे. हे देवि, शिव नांवाचें लिंग ह्मणून ज्याला ह्मणतात, तें मीच. ( ३६ ) हेतुपूर्वक केलेलीं दुसरीं ( काम्य ) लिंगें इच्छिलेले मनोरथ पूर्ण करणारीं आहेत. श्रीशैलपर्वतावर होणारें लिंग इहलोकाचें आणि परलोकाचें सुख देणारें आहे. ( ३७ ) तें सर्वांहून उत्तम आणि सर्व इच्छित फळें देणारें लिंग होय. हे देवि, गुरूंनीं जें लिंग दिलेलें असतें, तें मीच. ( ३८ ) ब्राह्मण वगैरे वर्णस्थांनीं क्रमानें श्वेत ( पांढरें ) रक्त ( तांवडें ) पीत ( पिंवळें ) आणि कृष्ण ( काळें ) असें चार प्रकारचें लिंग धारण करावें. ( ३९ ) लिंगाच्या परिघा एवढें त्याचें पीठ असावें, लांबी रुंदीही तितकीच असावी, आणि गोमुख त्याचें अर्धें असावें; असें लिंगाचें लक्षण सांगितलें आहे. ( ४० ) सपीठ लिंगाचें ल-

लिंगस्य लक्षणं तु तदुच्यते ॥ एकादित्र्यन्तमंगुल्याश्चरलिंगस्य दैर्घ्यकम् ॥ ४० ॥ लिंगस्य सदृशं पीठं पीठार्धं गोमुखं भवेत् ॥ लिंगदैर्घ्ये चतुर्भागं द्विभागं शक्तिसंयुतम् ॥ ४१ ॥ द्विभागं च चतुर्भागमेकभागस्य बंधकम् ॥ अंगुलं तु त्रिधा भज्य तन्मानं वा समाचरेत् ॥ ४२ ॥ लिंगमस्तकविस्तारं लिंगोच्छ्रयसमन्वितम् ॥ वेदभागवशान्मानं विस्तारं मस्तकस्य तु ॥ ४३ ॥ त्रिभागं परिणाहस्य तद्वत्पीठे च विस्तृतिः ॥ एकं नाहं त्रिधा भज्य भागेनैकेन हीनकः ॥ ४४ ॥ नाहमेकं प्रकर्तव्यं द्विनाहं वा समाचरेत् ॥ लिंगाधिक्ये भवेन्मृत्युः शक्त्याधिक्ये धनक्षयः ॥ लिंगशक्त्योः समत्वं हि भोगमोक्षफलप्रदम् ॥ ४५ ॥ इति लिंगलक्षणं पंचसूत्रं च ॥

॥ अथाष्टबंधः ॥

लाक्षासर्जरसः सिक्थं कुरुविंदं च गुग्गुलम् ॥ गैरिकं गुडतैले च त्वष्टबंधमिति स्मृतम् ॥ अनेन च दृढीकुर्याल्लिंगं पीठे सुसंस्थितम् ॥ ४६ ॥ इत्यष्टबन्धः॥

---

क्षण सांगतों: एकापासून तीन अंगुळांपर्यंत चरलिंगाची लांबी असावी. ( ४१ ) लिंगाएवढें पीठ आणि पीठाचें अर्धें गोमुख असावें. लिंगाच्या लांबीचे चार भाग करून दोन भाग शक्तिसंयुत करावें ( पीठांत घालावे ). ( ४२ ) राहिलेल्या दोन भागाचे चार भाग करून एक भागाचें बंधक ( सितबंध ) करावें. किंवा अंगुळीचे तीन भाग करून त्यामानानें सगळें करावें. ( ४३ ) लिंगाची उंची व लिंगमस्तकाचा विस्तार सारखा असावा ( उंची इतकाच मस्तकाचा विस्तार असावा ) सपीठलिंगाचें जें परिमाण असेल त्याच्या चतुर्थांशाचें लिंग असावें. (४४) ( राहिलेल्या ) तीन भागाइतका पीठाचा विस्तार करावा. एका नाहाचे तीन भाग करून एक भाग कमी करावा. ( ४५ ) एक नाह करावा किंवा दोन नाह करावे. लिंग अधिक झाल्यास मृत्यु येतो, शक्ति अधिक झाल्यास धनाचा नाश होतो. लिंग आणि शक्ति ही दोन्हीं सारखीं असलीं ह्मणजे पुष्कळ ऐश्वर्य व मोक्ष हें फळ मिळतें.' येथें लिंगाचें लक्षण व पंचसूत्र संपलें.

आतां अष्टबंध-( ४६ ) लाखेचा रस, राळ, (मधाचें) मेण, मोथ (कुरुविंद), गुग्गुळ, काव, गुळ व तेल या सगळ्यांना अष्टबंध ह्मणतात. या अष्टबंधानें लिंग पीठामध्यें घट्ट बसवावें. अष्टबंध संपला.

॥ शिल्पिदोषनिवारणम् ॥

वीरशैवाचारदीपिकायाम् ॥ शिल्पिदोषनिवृत्त्यर्थं लिंगं स्थाप्य हृदे तथा ॥ प्रसादेन तु गृण्हीयाद्दक्षहस्तेन देशिकः ॥ ४७ ॥ स्वहस्तपीठे तल्लिंगमादाय परमो गुरुः ॥ अनन्तरं शिल्पिदोषनिवृत्त्यर्थं ॥ नमो वःकिरिकेभ्यो देवानाँ हृदयेभ्यो नमो विक्षीणकेभ्यो देवानाँ हृदयेभ्यो नमो विचिन्वत्केभ्यो देवानाँ हृदयेभ्यो नमो आनिर्हतेभ्यो देवानाँ हृदयेभ्यो नमो आमीवत्केभ्यो देवानाँ हृदयेभ्यः ॥ अनेन हृदयमंत्रेण लिंगं शुद्धस्थले संस्थाप्य ॥ ॐ न्हां न्हीं न्हूं न्हैं न्हौं न्हः नमः शिवाय ॥ अनेन पंचाक्षरीमंत्रेण देशिको दक्षिणहस्तेन लिंगं गृहीत्वा स्ववामहस्तपीठे संस्थाप्य ॥ तल्लिंगं क्षालयेत्तोयैरजन्यामलकादिभिः ॥ पंचगव्येन संस्नाप्य विल्वपत्रेण घर्षयेत् ॥ ४८ ॥ पंचामृतेन संस्नाप्य गन्धोदैर्नारिकेलकैः ॥ गंधपुष्पादिभिश्चैव नैवेद्यान्तं समर्चयेत् ॥ ४९ ॥ वातुलतंत्रे ॥ गृहस्येशानदिग्भागे स्थंडिलं तु प्रकल्पयेत् ॥ नवहस्तप्रमाणेन वस्त्रं कुर्याद्विचक्षणः ॥ ५० ॥ तत्रैव नवधान्यानां स्थंडिलं तु समाचरेत् ॥ पंचाढकप्रमाणेन स्थंडिलं तु पृथक् पृथक् ॥५१॥ श्या-

---

शिल्पिदोष निवारण—वीरशैवाचारदीपिकेंत सांगितलें आहे:—'( ४७ ) शिल्पिदोष घालवण्याकरितां देशिकानें तें लिंग हृदयावर ठेवावें, व प्रसादमंत्रानें उजव्या हातांत घ्यावें. त्या श्रेष्ठ गुरूनें आपल्या हस्तपीठावर तें लिंग ठेवून मग शिल्पिदोष घालवण्याकरितां 'नमो वः किरिकेभ्यो' पासून 'नमो आमीवत्केभ्यो देवानाँ हृदयेभ्यः' येथपर्यंत ( मुळांत दिल्याप्रमाणें ) मंत्र ह्मणून या हृदयमंत्रानें तें लिंग पवित्र जागेंत ठेवून 'ॐ न्हां न्हीं न्हूं न्हैं न्हौं न्हः नमः शिवाय' या पंचाक्षरी मंत्रानें गुरूनें उजव्या हातानें तें लिंग घेऊन आपल्या डाव्या हस्तपीठावर ठेवावें. ( ४८ ) हळद, आंवळकाठी इत्यादिकांनीं तें लिंग धुवावें, पंचगव्याचें स्नान घालावें, विल्वपत्रानें घासावें, ( ४९ ) पंचामृताचें, गंधोदकाचें व नारळाच्या पाण्याचें स्नान घालून गंध, पुष्प इत्यादिकांनीं नैवेद्यापर्यंत उपचार करून पूजा करावी.' वातुलतंत्रांत—'( ५० ) शहाण्या मनुष्यानें घराच्या ईशान्य दिशेला एक स्थंडिल तयार करावें. नऊ हात प्रमाणाचें एक वस्त्र घ्यावें. ( ५१ ) त्यावर नऊ प्रकारच्या धान्यांचें स्थंडिल करावें. स्थंडिलाकरितां धान्य घेणें तें प्रत्येक धान्य पांच आढक ( पांच पायली ) प्रमाणानें घ्यावें. ( ५२ ) श्यामाक ( सावे ), राळे,

माकश्च प्रियंगुश्च मुद्गगोधूमव्रीहिकम् ॥ यवैश्च माषचणकै-स्तिलैश्चैव क्रमेण तु ॥ ५२ ॥ उपर्युपरि संस्थाप्य तद्वस्त्रोपरि विन्यसेत् ॥ लिखेदष्टदलं पद्मं मध्यकर्णिकया सह ॥ ५३ ॥ धान्योपरि न्यसेल्लिंगं यामे धान्याधिवासनम् ॥ नववस्त्रेण संवेष्ट्य गंधपुष्पाक्षतादिभिः ॥ ५४ ॥ नैवेद्यं दापयेद्धीमान् तांबूलं दापयेत्ततः ॥ जलाधिवासं यामं वा तदर्धं स्थंडिलं चरेत् ॥ ५५ ॥ व्रीहिपंचाढकं न्यस्य तण्डुलं तु तदर्धकम् ॥ तदर्धन्तु तिलं न्यस्य पद्ममष्टदलं लिखेत् ॥ ५६ ॥ एकं तु कलशं न्यस्य फलपल्लवसंयुतम् ॥ गंधोदकं समापूर्य सुवर्णं तत्र निक्षिपेत् ॥ ५७ ॥ गन्धपुष्पादिभिश्चैव पूजयेत्तद्यथाविधि ॥ मम पंचाक्षरीमंत्रं कुंभं स्पृष्ट्वा जपेद्गुरुः ॥ ५८ ॥ कांस्यपात्रे विनिक्षिप्य जलधाराभिषेचयेत् ॥ यामं वापि तदर्धं वा कारयेद्विधिपूर्वकम् ॥ ५९ ॥ पूजितं कलशं चैकं लिंगमूर्ध्न्यभिषेचयेत् ॥ पंचामृतेन संस्नाप्य ह्युदकेनाभिषेचयेत् ॥ ६० ॥ गंधपुष्पादिनाभ्यर्च्य नैवेद्यं दापयेत्ततः ॥ शयनं

---

मूग, गहूं, साळी, जव, उडीद, हरवरे व तीळ याप्रमाणें नऊ धान्यें क्रमानें (५३) त्या वस्त्रावर एकावर एक अशीं घालावीं. त्यावर मधील कर्णिकेसुद्धां आठ पाकळ्यांचें कमळ लिहावें. (५४) त्या धान्यावर तें लिंग ठेवावें. एक प्रहरभर त्याचा धान्याधिवास करावा ( एक प्रहर लिंग धान्यावर राहूं द्यावें ). मग नव्या कापडानें वेष्टून गंध, पुष्प, अक्षता इत्यादिकांनीं त्या लिंगाची पूजा करावी. (५५) भक्तीनें नैवेद्य दाखवावा. तांबूल अर्पण करावें. मग एक प्रहर किंवा अर्धा प्रहर जलाधिवास करावा. ( तो असा ) ( त्याकरितां ) एक स्थंडिल तयार करावें. (५६) पांच आढकें ( पायली ) साळी घालून त्यावर त्याच्या अर्धे तांदुळ घालावेत. वर तांदुळाच्या अर्धे तील घालून अष्टदळ कमळ लिहावें. (५७) फळें व पालवी यांनीं युक्त व गंधोदकानें भरलेला एक कलश त्यावर ठेवावा. त्या कलशांत सोनें घालावें. (५८) गंध, पुष्प वगैरेंनीं यथाविधि त्याची पूजा करावी. गुरूनें कलशाला स्पर्श करून माझ्या पंचाक्षरमंत्राचा जप करावा. (५९) कांशाच्या पात्रांत लिंग ठेवून पाण्याच्या धारेनें अभिषेक करावा, एक प्रहर किंवा अर्धा प्रहर विध्युक्त रीतीनें अभिषेक करावा. (६०) हा अभिषेक पूजिलेल्या कलशांतील पाण्यानें त्या लिंगाच्या मस्तकावर करावा. मग पंचामृताचें स्नान घालून पाण्यानें स्नान घालावें. (६१) मग गंध, पुष्प इत्यादिकांनीं



रून

कल्पयेत्तस्मिन् तदर्थं गुरुसत्तमः ॥ ६१ ॥ वेद्यधः स्थंडिलं कुर्याद्व्रीहिपंचाढकं ततः ॥ तदर्धं तण्डुलं न्यस्य तदर्धं तु तिलं न्यसेत् ॥ ६२ ॥ तन्मध्ये पद्ममालिख्य साष्टपद्मं सकर्णिकम् ॥ तन्मध्ये विन्यसेत्कुंभं सहिरण्यं सवस्त्रकं ॥ नारिकेलसमायुक्तं पल्लवैरुपशोभितम् ॥ ६३ ॥ तस्यैव पूर्वदिग्भागे लिंगं तु स्थापयेत्सुधीः॥ रक्तवस्त्रेण संवेष्ट्य गन्धपुष्पादिनार्चयेत् ॥ ६४ ॥ आचार्यो मनसा ध्यात्वा शयनं कल्पयेच्छिवे ॥ कुंभे हस्तं निधायाशु पंचाक्षरमनुं स्मरेत् ॥ ६५ ॥ सहस्रं वा तदर्धं वा शतमष्टोत्तरं तु वा ॥ कृतांजलिपुटो भूत्वा नमस्कृत्य महेश्वरम् ॥ ६६ ॥ शयनमंत्रः ॥ नमस्ते परमेशाय नमस्ते पार्वतीपते ॥ नमः कैलासवासाय नमः संसारतारिणे ॥ एवं स्तुत्वा महेशानं शयनं क्रियतां प्रभो ॥ ६७ ॥ अनेन मंत्रेण शयनं कारयेत् ॥ स्वयंभुवागमे ॥ अर्धोदयेऽथवा तस्य पतने चैव देशिकः ॥ पूर्वं संस्कारितं लिंगं शिशोः कण्ठे च

---

पूजा करून नैवेद्य दाखवावा. मग गुरूनें त्या लिंगाकरितां शयन तयार करावें. ( ६२ ) वेदीच्या खालच्या बाजूला स्थंडिल करावें. पांच आढकें साळी घालून वर त्याच्या अर्धे तांदूळ व तांदुळाच्या अर्धे तीळ घालावे. ( ६३ ) त्याच्या मध्यभागीं कर्णिकेसह अष्टदळाचें कमळ लिहावें. कमळाच्या मध्यभागीं सोनें व वस्त्र यांसुद्धां व नारळासुद्धां पल्लवांनीं सुशोभित केलेला कलश ठेवावा. ( ६४ ) उदारबुद्धीच्या गुरूनें त्या कलशाच्या पूर्व दिशेला लिंगाची स्थापना करावी. तांबडें वस्त्र लिंगाभोंवतीं गुंडाळून त्याची गंधपुष्पादिकांनीं पूजा करावी. ( ६५ ) आचार्यानें मनांत ध्यान करून शिवाच्याठिकाणीं शयनाची भावना करावी ( शिव निजला आहे असें भावावें ). मग कलशावर हात ठेवून पंचाक्षरमंत्र स्मरावा. ( ६६ ) त्याचा हजार, पांचशें किंवा एकशेंआठ जप करावा. नंतर दोन्हीं हात जोडून महादेवाला नमस्कार करावा. ( शयनमंत्र ) ( ६७ ) ( मूळांत दिलेला 'नमस्ते परमेशाय' पासून 'नमः संसारतारिणे' पर्यंत मंत्र ह्मणावा ). हे परमेश्वरा तुला नमस्कार असो, हे पार्वतीपते तुला नमस्कार असो. हे कैलासावर वास करणाऱ्या तुला नमस्कार असो. भक्तांना संसारापासून दूर करणाऱ्या देवा, तुला नमस्कार असो. अशी महेश्वराची स्तुति करून 'प्रभो, शयनं क्रियताम्' ( देवा, शयन करावें ) या मंत्रानें शयन करवावें.' स्वयंभुवागमांत झटलें आहे कीं, '( ६८ ) मूल गर्भांतून अर्धे बाहेर आल्यावर किंवा सगळेंच बाहेर पडल्यावर वर सांगितल्या प्रकारचा संस्कार ज्यावर घडला आहे असें लिंग गुरूनें

धारयेत् ॥ ६८ ॥ वीरशैवाचारकौस्तुभे ॥ अत्र मूलसिद्धान्तशेखरे शिवागमे ज्ञेयम् ॥ अधिवासं ततः कुर्यादाचार्यो यजमानकैः ॥ तल्लिंगं च समादाय सर्ववाद्यरवैः सह ॥ ६९ ॥ स्वस्तिसूक्तैर्वेद-मंत्रैर्देशिको गृहकर्तृतः ॥ शुद्धिं कृत्वा तु तल्लिंगं क्षालनाद्यैर्यथा-क्रमम् ॥ ७० ॥ विन्यसेद्वारुणे भागे स्थंडिलोपरि देशिकः ॥ जला-धिवासं कृत्वाथ पूर्वोक्तेन विधानतः ॥ ७१ ॥ तल्लिंगं च समादाय मूलमंत्रैर्गुरूत्तमः ॥ उद्धर्त्यामलकीचूर्णै रुद्रसूक्तैरतः परम् ॥ ७२ ॥ सिंचेत्तन्नवभिः कुंभैर्वारुणस्य च मंत्रकैः ॥ पंचोपचारैरभ्यर्च्य सु-गन्धकुसुमाक्षतैः ॥ लिंगमादाय मूलेन विन्यसेच्छांकरीं दिशम् ॥७३॥ धान्यराशौ निवेश्याथ भूसूक्तेन ततः परम् ॥ संस्पृशेन्मूलमंत्रेण सेचयेत्कलशोदकैः ॥ ७४ ॥ उपचारैः समभ्यर्च्य तण्डुलैश्च ततः परम् ॥ निगूहयेन्मुहूर्तान्तं मूलमंत्रेण संस्पृशेत् ॥ कलशैः स्नापयेद्भ-क्त्या पूजयेच्च शिखिध्वज ॥ ७५ ॥ फलपुष्पैर्निगूह्याथ मुहूर्तान्तं गुरूत्तमः ॥ तन्मूलेनैव संस्पृश्य सेचयेत्कलशोदकैः ॥७६॥ शय्यां

---

त्या बालकाच्या गळ्यांत बांधावें.' वीरशैवाचारकौस्तुभांत ( येथें ' मूलसिद्धांत शेखरांत शिवागमांत' असें समजावें ) असें सांगितलें आहे:— '( ६९ ) नंतर अनेक वाद्यें वाजवीत तें लिंग आणून आचार्यानें यजमानाकडून त्याचा अधिवास करवावा. (७०) स्वस्तिसूक्तांनीं व वेदमंत्रांनीं धुवून वगैरे यथाक्रमानें यजमानाकडून गुरूनें तें लिंग शुद्ध करवून घ्यावें. ( ७१ ) मग तें लिंग देशिकानें स्थंडिलावर पश्चिमभागीं ठेवून पूर्वी सांगितलेल्या विधीनें जलाधिवास करवावा. ( ७२ ) मूल-मंत्रानें तें लिंग घेऊन गुरूनें रुद्रसूक्तांनीं अंवळकाठीच्या चूर्णानें त्याला चोळावें. नंतर ( ७३ ) वारुणमंत्रानें नव्या कलशांतील पाण्यानें अभिषेक करून गंध, पुष्प अक्षता वगैरे पंचोपचारांनीं त्या लिंगाची पूजा करावी. मूलमंत्रानें लिंग घे-ऊन ईशान्य दिशेला ठेवावें. ( ७४ ) त्यानंतर भूसूक्तांनीं लिंग धान्यराशींत ठे-वावें, मूलमंत्रानें स्पर्श करून कलशांतील पाण्यानें अभिषेक करावा. ( ७५ ) उ-पचारांनीं त्याची पूजा करून मग एक मुहूर्तभर तांदुळांत झांकून ठेवावें. मग मूळमंत्रानें त्या लिंगाला स्पर्श करून, हे स्कंदा, कलशांतील पाण्यानें स्नान घा-लून भक्तीनें त्याची पूजा करावी. ( ७६ ) पुनः एक मुहूर्तभर फळें व फुलें यांनीं झांकून ठेवून मूळमंत्रानें स्पर्श करून गुरूनें त्या लिंगाला कलशांतील पा-ण्याचें स्नान घालावें. ( ७७ ) पलंगावर शय्या तयार करून लिंगाला तेथें ठे-

विन्यस्य पर्यंके लिंगं तत्र विनिक्षिपेत् ॥ संस्पृशन्मूलमंत्रेण स्नापयेत्कलशोदकैः ॥ ७७ ॥ पंचोपचारैरभ्यर्च्य विनिद्रं कारयेत्सुत ॥ वेदमंगलनिर्घोषैराचार्यैर्ऋत्विजैः सह ॥ ७८ ॥ अधिवासं क्रमेणैवं कुर्याद्वै लिंगपीठयोः ॥ बंधयेदष्टबंधेन धृत्वा द्यौरितिमंत्रतः ॥ अष्टबंधप्रकारस्तु वक्ष्यतेऽथ यथा तथा ॥ ७९ ॥ वृत्तम् ॥ धाराष्टधा सर्जरसस्तथैव कुंदाष्टधा गैरिकजातयस्तथा ॥ शिलाष्टधा स्फाटिकनिर्मलाद्या हेमादिकारत्नकणादिकाः पुनः ॥ मनोद्भवा मांसि मयूरमूलिकाः समीरिताश्चाष्टविधाश्च बंधाः ॥ ८० ॥ अन्यच्च ॥ भल्लातकीफलं दीपशिखायां संप्रतापयेत् ॥ तत्तैलं समभागं तु तिलतैलं विमिश्रयेत् ॥ ८१ ॥ मृत्पात्रश्लक्ष्णचूर्णैश्च शुक्लवस्त्रसुशोधितैः ॥ द्वित्रिवारमथो पूर्वं तैलद्वयसुसेचितैः ॥ ८२ ॥ या लता चोगनीनाम्नी तस्याः सारेण मिश्रितैः ॥ संपश्य तेन बध्नीयाद्वीरशैवः प्रयत्नतः ॥ षडक्षरेणाभिमंत्र्य पात्रे तद्रसमानयेत् ॥ ८३ ॥ हेमन्तर्तौ हिमान्येव घनीभूतं दृढाश्मनि ॥ पेषयेदतियत्नेन सिक्तां किंचिज्जलेन च ॥ ८४ ॥ तत्पाकं संप्र-

---

वावें. पुनः मूळमंत्रानें स्पर्श करून कलशोदकानें स्नान घालावें. ( ७८ ) वत्सा, पंचोपचारांनीं पूजा करून आचार्य व ऋत्विज यांसह वेदमंत्र म्हणून त्या घोषानें लिंगाला जागें करावें. ( ७९ ) याक्रमानें लिंग व पीठ यांचा अधिवास करवावा. 'द्यौरिति' मंत्रानें धरून अष्टबंधानें बांधावें (लिंग व पीठ एके ठिकाणीं अष्टबंधानें बांधावें ) आतां अष्टबंधाचा प्रकार योग्यरीतीनें सांगतों. ( ८० ) धारा आठ भाग, राळ, कुंद आठ भाग, गेरू शिला आठ भाग, निर्मळ स्फटिक, सोनें, वगैरे रत्नाचे कण वगैरे, मनोद्भव, मांसि व मोरशेंडाची मुळी असे हे अष्टबंध सांगितले आहेत. दुसरें, ( ८१ ) बिबवा दिव्यावर धरून जाळावा. त्याचें जें तेल निघतें तें व तिळाचें तेल समभाग घेऊन मिसळावें. ( ८२ ) मातीच्या भांड्याचें फार बारीक चूर्ण करून तें पांढऱ्या वस्त्रांतून गाळावें व वरील मिसळलेल्या तेलानें दोन तीनदां शिंपडून भिजवावें ( ८३ ) 'चोगनी ( चोदनी-घमासा? )' नांवाची जी वेल असते तिच्या रसानें वरील मिश्रण मिसळावें या मिश्रणानें वीरशैवानें ( लिंग ) बांधावें लागतें. षडक्षरानें मंत्रून भांड्यांत तो रस आणावा. ( ८४ ) हेमंत ऋतूंतील बर्फा प्रमाणें घट्ट झालेलें हें मिश्रण पाणी शिंपडून चांगल्या धोंड्यावर प्रयत्नानें घासावें. ( ८५ ) संप्रदाय जाणणाऱ्यां कडून त्याचा

दायश्चैर्ज्ञात्वा तेनैव वंधयेत् ॥ वज्रबंधसमोऽयन्तु वीरमाहेश्वरादृतः ॥ ८५ ॥ इति बध्वा चेष्टलिंगं प्रतीक्षेत शिशोर्जनीम् ॥ संस्कुर्यात्तनयं जातकर्मणा जननात्परम् ॥ ८६ ॥ जातं कुमारं संप्राप्य गुरुणा कारयेद्बुधः ॥ पूर्वमेव विनिर्दिष्टं लिंगं पंचामृतैः पृथक् ॥ ८७ ॥ संस्नाप्य पंचभिर्गव्यैर्लिंगं प्राणप्रतिष्ठितम् ॥ असुनीते ऋचा कुर्यादष्टत्रिंशत्कलाः पुनः ॥ ८८ ॥ कलाभिर्न्यस्य तल्लिंगं पंचामृतरसैः पृथक् ॥ संस्नाप्य फलपुष्पाद्यैरुपचारैस्तु षोडशैः ॥ ८९ ॥ अभ्यर्च्य विधिवद्भक्त्या जंगमस्य पदांभसा ॥ प्रसादेनेष्टलिंगं च शेषेणाथ कुमारकम् ॥ पादोदकप्रसादाभ्यां संपन्नं कारयेत्पिता ॥ ९० ॥ अत्रायमादिग्रहीता प्राणप्रतिष्ठामंत्रः ॥ असुनीते पुनरस्मासु चक्षुः पुनः प्राणमिह नो धेहि भोगम् ॥ जोक्पश्येम सूर्यमुच्चरन्तमनुते मृळयानः स्वस्ति ॥ अथ वैदिकक्रमस्तु अस्मिन्नेव ग्रंथे विस्तरतो द्रष्टव्यः विस्तरभयादत्र न लिखितः ॥ इति जातकर्मसंस्कारः ॥

---

पाक करवून घेऊन तो पाक लिंगाला बांधावा ( पाकानें होणारें लुकण लिंगा भोंवती बसवावें ). वीरमाहेश्वरांनीं केलेला हा वज्रबंध होतो. ( ८६ ) याप्रमाणें इष्टलिंग बांधून तयार करून ( लिंगाला कांति बसवून ) मुलाचा जन्म होण्याची वाट पाहत बसावें. मूल उपजल्याबरोबर जातकर्माचा त्याजवर संस्कार करावा. ( ८७ ) उपजलेल्या मुलाला आणून शहाण्या माणसानें गुरूकडून संस्कार करवावा. पूर्वींच सांगितलेल्या लिंगाला पंचामृताचें वेगळें (८८) व पंचगव्याचें वेगळें स्नान घालून 'असुनी' इत्यादि ऋचांनीं प्राणप्रतिष्ठा करावी. अडतीस कला स्थापाव्या ( ८९ ) त्या कलांचा लिंगावर न्यास करून पंचामृताचें वेगळें वेगळें स्नान घालावें. फलपुष्प वगैरे सोळा उपचारांनीं ( ९० ) भक्तीनें यथाशास्त्र पूजा करावी. जंगमांच्या पादोदकानें व प्रसादानें मुलाच्या बापानें इष्ट लिंगाला अर्पण करून राहिलेल्या पादोदकप्रसादाचें मुलाला अर्पण करावें. येथें हाच प्राणप्रातिष्ठामंत्र मुख्य आहे:–' असुनीते पुनरस्मासु चक्षुः पुनः प्राणमिह नो धेहि भोगम् ॥ जोक्पश्येम सूर्यमुचरन्तमनुते मृळ्यानः स्वस्ति' आतां वैदिकक्रम याच ग्रंथांत ( स्वयंभुवागमांत ) पहावा. ग्रंथ वाढेल ह्मणून येथें दिला नाहीं. येथें जातकर्म संस्कार संपला.

## अथ नामकर्म

द्वादशेऽहनि पिता नामकर्म कुर्याज्ज्ञातकर्मानंतरं वा कार्यम् ॥ यस्मिन् शुभदिने वा कार्यम् ॥ तत्पूर्वेद्युर्नांदीसमाराधनार्थं विशिष्टान्माहेश्वरान् भोजयेत् ॥ पुण्याहानंतरं संकल्प्य व्यवहारार्थमावां नाम करवावहै ॥ देवतात्रयपित्रादिनाम कुर्यात् ॥ इदमस्मै नाम भवतीति पिता विशिष्टेभ्यः प्रकाशयेत् ॥ तथैवेति ब्रूयुः ॥ मातापितरौ तन्नाम शिशोर्दक्षिणकर्णे दद्यात् ॥ तन्नाम्ना कुलदेवताभ्यो नमस्कुर्यात् ॥ तन्नाम दीक्षापर्यन्तं गोपयेत् ॥ पिता ग्रामादेत्य शिशुशिरः परिगृह्य जपेत् ॥ अंगादंगात्संभवसि हृदयादधिजायसे ॥ *वेदो वै पुत्रनामासि स जीव शरदः शतम् ॥ ९१ ॥ इति त्रिवारं जिघ्रेत् ॥ एतयैवावृत्या कुमारीमयुग्माक्षराणि पुंसां युग्माक्षराणि नाम भवतीति शेषः ॥ इति नामकरणम् ॥

## अथान्नप्राशनमुच्यते

षष्ठे मास्यष्टमे वा दन्ते जाते वा कार्यम् ॥ पूर्वेद्युर्गृहमुपलिप्य अलंकृत्य च स्वस्तिवाचननांदीकर्माणि कुर्यात् ॥ अपरेद्युः शिशुम-

---

नामकर्म—बापानें मुलाचें नामकर्म बाराव्या दिवशीं किंवा जातकर्म झाल्यानंतर करावें. ज्या शुभ दिवशीं हें नामकरण करावयाचें असेल त्याच्या अदल्यादिवशीं नांदी समाराधना करितां प्रसिद्ध माहेश्वरांना जेवूं घालावें. पुण्याहवाचन झाल्यानंतर ‘ व्यवहाराकरितां आह्मीं दोघें नांव ठेवतों ’ असा संकल्प करून तीन देवांचें व पितरांचें नांव ठेवावें. ‘ याचें ( या मुलाचें ) हें नांव ठेवलें ’ असें बापानें सभ्यांना कळवावें. त्यांनीं ‘ बरें आहे ’ असें ह्मणावें. आईबापांनीं तें नांव मुलाच्या कानांत ठेवावें. त्या नांवानें कुलदेवतांना नमस्कार करावा. दीक्षेपर्यंत तें नांव गुप्त ठेवावें. बापानें गांवाहून येऊन शिशूचें मस्तक हातांत घेऊन हा मंत्र ह्मणावा,:–(९१) ‘अंगादंगात्संभवसि हृदयादधिजायसे ॥ *वेदो वै पुत्रनामासि सजीव शरदः शतं’ असें ह्मणून तीनदां (डोक्याचा) वास घ्यावा. इतकें झाल्यावर शेवटीं सांगावयाचें इतकेंच कीं मुलीच्या नांवाचीं अक्षरें विषम असावीं आणि मुलाच्या नांवाचीं अक्षरें सम असावीं. येथें नांव ठेवणें संपलें.

अन्नप्राशन—( मूल उपजल्यावर ) सहाव्या किंवा आठव्या महिन्यांत किंवा दांत आल्यावर अन्न प्राशन ( अन्न जेवूं घालणें ) करावें. पहिल्या दिवशीं घर सारवून शृंगारून स्वस्तिवाचन व नांदी हीं कर्में करावीं. दुसऱ्या दिवशीं

---

* आत्मा वै पुत्रनामासि ॥ पाठांतरम् ॥

भ्युज्यालंकृत्य प्रशास्तहव्यं संस्कृत्य संकल्प्य ॥ सर्वकर्मसमृद्ध्यर्थमस्मत्कुमारस्यान्नप्राशनकर्म करिष्ये इति संकल्प्य प्राङ्मुखं शिशुमुपविश्य दधिघृतमिश्रमन्नं प्राशयेत् ॥ सर्वकर्म भवतीति विज्ञायते ॥ अन्नपतेत्यस्य नलकूवरऋषिः अन्नपतिर्देवता उपरिष्टाद्बृहती छन्दः अन्नपतेन्नस्य नो देह्यन्नमीवस्य शुष्मणः प्रदातारं तारिषमूर्जं नो देहि द्विपदे शं चतुष्पदे ॥ इत्येवं कुमार्यै ॥ ततः शेषस्तूष्णीं प्राशयेत् ॥ इत्यन्नप्राशनविधिः ॥

अथ उपनिष्क्रमणविधिः

तदंगत्वेन माहेश्वरान् भोजयेत् ॥ केचिदुपनिष्क्रमणकर्मान्नप्राशनात्पूर्वमुदाहरंति ॥ तदेवं चतुर्थे मासि शुभदिने वहिरानीय शिवलिंगं शिवोपासकान् शिवयोगिनः शिवाय दर्शयेत् ॥ तदुपगतपुण्याहं नांदीसमाराधनं च कार्यम् ॥ इत्युपनिष्क्रमणम् ॥

अथ चौलविधिः

तृतीये वर्षे चौलं कार्यं तदंगत्वेनोदगयनपूर्वपक्षपुण्याहेषु प्रागावर्तनादन्हः स्वस्तिवाचनं माहेश्वरसमाराधनं कुर्यात् ॥ जातं

---

मुलाला न्हाऊ घालून अलंकार घालून योग्य रीतीनें होमाचा संस्कार करून संकल्प करावा कीं, ‘ ( मूळांतील वाक्य ह्मणावें ) सर्वकर्मांची समृद्धि होण्याकरितां आमच्या मुलाचें अन्नप्राशनकर्म करितों ’ असा संकल्प करून मुलाला पूर्वेकडे तोंड करून वसवून दहीं तूप घातलेलें अन्न जेवूं घालावें. एवढ्यानें सर्व कर्म संपतें असें समजलें जातें. ‘ अन्नपतेत्यस्य ’ पासून ‘ चतुष्पदे ’ पर्यंत ( मुळांत दिल्याप्रमाणें ) मंत्र म्हणावा. मुलीच्या वावतींतही असेंच करावें. मग राहिलेलें अन्न मुकाट्यानें जेवूं घालावें. येथें अन्नप्राशनविधि संपला.

उपनिष्क्रमणविधि ( मुलाला वाहेर आणण्याचा विधि )—या विधी करितां माहेश्वरांना जेवूं घालावें. हा उपनिष्क्रमणाचा विधि कांहीं जण अन्नप्राशनाच्या पूर्वींच करावा असें म्हणतात. तो ( विधि ) असा–( मुलाच्या ) चवथ्या महिन्यांत शुभदिवशीं मुलाला वाहेर आणून शिवलिंगाला, शिवभक्तांना, शिव योग्यांना व शिवाला दाखवावें. याला अनुसरून पुण्याह व नांदीसमाराधन हीं कर्मेंही करावीं. येथें उपनिष्क्रमणविधि संपला.

चौलकर्म—तिसऱ्या वर्षीं चौलकर्म करावें. या कर्माचें अंगभूत असें स्वस्ति वाचन व माहेश्वरसमाराधन उत्तरायणांत शुद्ध पक्षांत शुभ दिवशीं मध्यान्हाच्या

कुमारमायुष्याभिवृद्ध्यर्थं चौलकर्मणा संस्करिष्ये इति संकल्प्य अथ नापितमनुशास्ते ॥ शिवोष्णाभिः सुरभीकृताभिरद्भिरवसिच्य कुशली कुर्विंति ॥ त्रिशिखः पंचशिखः एकशिखः पुरश्चूडो वा यथाचारं भवतीति यथा कुलधर्ममिति विज्ञायते ॥ नापिताय तांबूलफलतण्डुलादीन् दद्यात् ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे वीरशैवाचारकौस्तुभोक्तप्रकारेण गर्भाधानादिचौलान्तसंस्कारविधिर्नाम दशमप्रकरणं समाप्तम् ॥

---

पूर्वी करावें. 'उत्पन्न झालेल्या मुलाच्या आयुष्याची वृद्धि व्हावी म्हणून चौलकर्म नांवाचा संस्कार त्याजवर करितों' असा संकल्प करावा. मग नापिताला सांगावें कीं, 'सुख देणारें, उष्ण, व सुगंधित असें पाणी शिंपडून कुशलपणानें कर्म कर.' तीन झुलपे, पांच झुलपे एक झुलपा किंवा पुढच्या बाजूला झुलपे ठेवून जशी वहिवाट असेल, जसा कुलधर्म असेल त्या प्रमाणें केस राखावे. नापिताला ( न्हाव्याला ) तांबूल फळ तांदुळ वगैरे द्यावें.

याप्रमाणें वीरशैवसदाचारसंग्रहांतील वीरशैवाचारकौस्तुभांत सांगितलेल्या प्रकारानें गर्भाधानापासून चौलकर्मापर्यंत संस्कारकथन नांवाचें हें दहावें प्रकरण संपलें.



## अथ वीरशैवदीक्षावीरमाहेश्वरदीक्षाविधि-र्नामैकादशप्रकरणम्

गर्भाधानादिचौलान्तकर्मभिः संस्कृतं सुतम् ॥ दीक्षयेदुपनीतं तं यथाशास्त्रं गुरूत्तमः ॥ १ ॥ गर्भाष्टमे कृता दीक्षा मुख्या सा षोडशावधि ॥ गौणा तदूर्ध्वमधमा वीरशैवान्वयायिनाम् ॥ २ ॥ इत्यादिशिवागमवाक्याद्बालत्व एव दीक्षा कर्तव्येति सिद्धम् ॥ वीरशैवकौस्तुभे दीक्षाफलमाह ॥ दीक्षया मुच्यते देही त्रिविधा-द्भवबंधनात् ॥ शिवत्वं याति सततं न पुनः पशुतां व्रजेत् ॥ ३ ॥ रसविद्धं यथा ताम्रं ताम्रभावाद्विमुच्यते ॥ सुवर्णेन सहैकत्वं गतं तद्याति हेमताम् ॥ ४ ॥ नवनीतं यथा तप्तं तत्स्वभावं परित्य-जेत् ॥ तत्स्वभावमापन्नं न पुनर्नवनीतताम् ॥ ५ ॥ यथा शुक्तिगतं तोयं मौक्तिकं भवति ध्रुवम् ॥ न पुनस्तोयतां याति मौक्तिकत्वं न मुंचति ॥ ६ ॥ य एव शिवतां प्राप्तो न पुनः पशुतां व्रजेत् ॥ शिवत्वं न च हीयेत विमुक्तो दीक्षया भवेत् ॥ ७ ॥ दीक्षाश-

---

(१)' गर्भाधानापासून चौलकर्मापर्यंत ज्याचें संस्कार झाले आहेत, तो मुलगा आ-पल्याकडे आणिल्यावर गुरूनें त्याला दीक्षा द्यावी. ( २ ) वीरशैवांना गर्भापासून आठव्या वर्षी दिलेली दीक्षा मुख्य होय. सोळावर्षांपर्यंत ती दिली असतां तिला गौणदीक्षा ह्मणतात, आणि त्यानंतर दिली असतां ती अधम ( कनिष्ठ प्रतीची ) समजली जाते.' इत्यादि शिवागमवाक्यावरून बाळपणांतच दीक्षा दिली पाहिजे असें सिद्ध होतें. वीरशैवकौस्तुभांत दीक्षेचें असें फळ सांगितलें आहे–' ( ३ ) दीक्षेच्या योगानें मनुष्य तीन प्रकारच्या संसारबंधनांपासून मुक्त होतो, सतत शिव होऊन राहतो व पुनः पशुत्व पावत नाहीं. ( जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडत नाहीं ) ( ४ ) पाऱ्याशीं एकजीव झालेलें तांबें ज्याप्रमाणें तांबे-पणा टाकून देतें, तेंच सोन्याशीं मिसळलें असतां जसें सोनें होतें; ( ५ ) लोणी तापविलें असतां जसें तें आपला पूर्वीचा स्वभाव टाकून तूप होऊन राहतें व पुनः लोणी बनत नाहीं; ( ६ ) शिंपल्यांत पडलेलें पाणी जसें कायमचें (मोती) बनतें व तें मोतीपणा टाकून पुनः पाणी होत नाहीं; ( ७ ) त्याप्रमाणें जो ए-कदां दीक्षेच्या योगानें शिव होतो, तो पुनः पशुत्व पावत नाहीं व त्याचें शि-वत्व जात नाहीं. तो मुक्तच होतो.' वीरशैवसिद्धांतदीपिकेंत दीक्षाशब्दाची

ब्दनिर्वचनमुच्यते ॥ वीरशैवसिद्धान्तदीपिकायाम् ॥ दा दाने क्षि क्षय इति धातुद्वयेन दीक्षाशब्दस्य निर्वचनमुच्यते ॥ दीयते शिवविज्ञानं क्षीयते पाशबंधनम् ॥ यस्मादतः समाख्याता दीक्षेतीयं विचक्षणैः ॥ ८ ॥ अस्य श्लोकस्य तात्पर्यं किमिति चेत् ॥ ज्ञानक्रियात्मिका शिवभक्तिरेव दीक्षाशब्दवाच्येति भावः ॥ ततो व्युत्क्रमेण दीक्षात्रयं निरूप्यते ॥ दीक्षा सा त्रिविधा प्रोक्ता शिवज्ञानविशारदैः ॥ वेधारूपा क्रियारूपा मंत्ररूपा च तापस ॥ ९ ॥ तस्य दीक्षात्रयस्य लक्षणं निरूप्यते ॥ गुरोरालोकमात्रेण हस्तमस्तकयोगतः ॥ यः शिवत्वसमावेशो वेधादीक्षेति सा मता ॥ १० ॥ मांत्री दीक्षेति सा प्रोक्ता मंत्रमात्रोपदेशिनी ॥ कुण्डमण्डलकोपेता क्रियादीक्षेति कथ्यते ॥ ११ ॥ अस्य तात्पर्यं ॥ श्रीगुरुहस्तकमलजातस्यात्मनः शिवत्वोपदेश एव वेधादीक्षा ॥ सोऽहमिति मंत्ररूपस्यात्मनः पंचाक्षरमंत्रोपदेश एव मांत्री दीक्षा ॥ कलशवंधयुक्तलिंगधारणक्रियैव क्रियादीक्षा इति अस्य श्लोकस्य

---

अशी व्युत्पत्ति सांगितली आहे–' दा ' ह्मणजे ' देणें ' व ' क्षि ' ह्मणजे ' क्षय पावणें या दोन धातूंपासून ' दीक्षा 'हा शब्द निघाला आहे. ( ८ ) ( या दीक्षेच्या योगानें ) शिवज्ञान दिलें जातें ( मिळतें ) व ( संसाराचा ) पाशबंध क्षय पावतो ( नाहींसा होतो, ) ह्मणून तिला ज्ञाते दीक्षा ह्मणतात. ' या श्लोकाचें तात्पर्य काय तर ज्ञान व क्रिया यांनीं युक्त अशी ( ज्ञानमय व क्रियामय ) शिवभक्ति दीक्षा शब्दानें दर्शविली जाते, असा भावार्थ आहे. आतां व्युत्क्रमानें दीक्षेचे तीन प्रकार सांगतों. ' ( ९ ) हे मुने, शिवज्ञान जाणणाऱ्यांनीं ही दीक्षा तीन प्रकारची सांगितली आहे, वेधारूप दीक्षा क्रियारूप दीक्षा व मंत्ररूप दीक्षा.' या तिन्हीं प्रकारच्या दीक्षेचें लक्षण असें:-'( १० ) गुरूंची कृपादृष्टि झाल्याबरोबर त्यांच्या हस्ताचा शिष्याच्या मस्तकाशीं संयोग होतांच जें शिवत्व शिष्याच्या ठिकाणीं येतें, त्याला वेधादीक्षा ह्मणतात. ( ११ ) ज्यामध्यें मंत्राचाच केवळ उपदेश करण्यांत येतो, तिला मंत्ररूप दीक्षा ह्मणतात; आणि कुंड मंडळ वगैरे क्रिया ज्यांत करण्यांत येतात, तिला क्रियादीक्षा ह्मणतात. याचें तात्पर्यः–श्रीगुरूच्या हस्तकमलापासून उत्पन्न होणाऱ्या आत्म्याला शिवत्वाचा उपदेश देणें याचेंच नांव वेधादीक्षा. ' सोऽहं ( तो मी ) या मंत्ररूप आत्म्याला पंचाक्षर मंत्राचा उपदेश देणें हीच मंत्ररूप दीक्षा. कलश मांडून जी लिंगधारणाची क्रिया करण्यांत येते तीच क्रियादीक्षा होय. असा ह्या श्लोकांचा

तात्पर्यम् ॥ अन्यच्चात्रैव ॥ तनुत्रयगतानादिमलत्रयमसौ गुरुः ॥ दीक्षात्रयेण निर्दग्ध्वा लिंगत्रयमुपादिशत् ॥ १२ ॥ यथा पुरत्रयं दग्धं युगपत्पुरवैरिणा ॥ तथा मलत्रयं दग्धं युगपद्देशिकात्मना ॥ १३ ॥ त्रिष्वंगेष्वस्य शिष्यस्य लिंगत्रयमसौ गुरुः ॥ संयुयोज त्रिधाभूतपरदीक्षावलेन तु ॥ १४ ॥ योगांगे भावलिंगं तु वेधादीक्षावलेन तु ॥ मांत्रीदीक्षावलेनैव भोगांगे प्राणलिंगकम् ॥ १५ ॥ क्रियादीक्षावलेनैव देशिकः सत्यचिद्घनः ॥ इष्टलिंगं तथा चैव त्यागांगे समयोजयत् ॥ १६ ॥ योगांगमात्मसंगत्वात्कारणांगमितीरितम् ॥ भोगांगमंतरंगत्वात्सूक्ष्मांगमिति संमतम् ॥ त्यागांगं बहिरंगत्वात्स्थूलांगमिति कीर्तितम् ॥ १७ ॥ विश्वो जाग्रदवस्थायां स्वप्नाख्यायां तु तैजसः ॥ प्राज्ञः सुषुप्त्यवस्थायां लिंगत्रयमुपासते ॥ १८ ॥ उपासनैव संयोगः संयोगो द्वैतसंलयः ॥ द्वैतस्य विल-

---

सारांश आहे. तेथेंच ( त्याच ग्रंथांत ) पुनः असें ह्मटलें आहे कीं, '( १२ ) या तीन प्रकारच्या दीक्षेनें श्रीगुरूंनीं तिन्हीं ( स्थूल, सूक्ष्म व कारण ) देहांतील तीन प्रकारचा अनादि * मल काढून टाकून तीन प्रकारच्या † लिंगाचा उपदेश केला. ( १३ ) पुरवैरी शंकरांनीं ज्याप्रमाणें एकदम त्रिपुरें जाळून टाकिलीं, त्याप्रमाणें गुरूंनीं तिन्हीं मल जाळून टाकिलें, ( १४ ) आणि शिष्याच्या तिन्हीं शरीरांमध्यें तीन प्रकारच्या शिवदीक्षेच्या बळानें तीन लिंगांची स्थापना केली. ( १५ ) वेधादीक्षेच्या बळानें योगांगांत ( कारण शरीरांत ) भावलिंगाची, मांत्रीदीक्षेच्या बळानें भोगांगांत ( सूक्ष्म शरीरांत ) प्राणलिंगाची, ( १६ ) आणि क्रियादीक्षेच्या बळानें सत्यमय व चिन्मय अशा गुरूंनीं त्यागांगांत ( स्थूल शरीरांत ) इष्टलिंगाची योजना केली. ( १७ ) योगांगाचा आत्म्याशीं संबंध असल्यामुळें ( आत्मा त्या योगांगांत रहात असल्यामुळें ) त्याला कारणांग ह्मणतात. भोगांग हें अंतरंग ( आंतील अंग-अंतःकरणाचें बनलेलें अंग ) असल्यामुळें त्याला सूक्ष्मांग ह्मणतात. त्यागांग हें बाहेरील अंग असल्यामुळें त्याला स्थूलांग ह्मणतात. ( १८ ) जाग्रत अवस्थेंत विश्व, स्वप्नावस्थेंत तैजस व सुषुप्ति अवस्थेंत प्राज्ञ अशीं हीं तीन दैवतें ( इष्ट, प्राण व भाव या ) तिन्हीं लिंगाची उपासना करितात. ( १९ ) उपासना करितात ह्मणजे संयोग पावतात ( त्यात्या लिंगाशीं ऐक्य पावतात ). संयोग होणें ह्मणजे द्वैताचा नाश होणें द्वैत

---

* आणवमल, मायामल व कार्मिकमल. † इष्टलिंग, प्राणलिंग व भावलिंग.

यश्चैव निवृत्तिः परिकीर्तिता ॥ १९ ॥ निवृत्तिरेव विश्रान्तिर्विश्रान्तिः परमं सुखम् ॥ एवं लिंगांगसंयोगविधिना स्वात्मनि स्थिता ॥ २० ॥ बीजरूपा पराशक्तिः प्ररोहति समन्ततः ॥ आत्मा क्षेत्रं भवेद्भक्तिर्बीजं बीजी महेश्वरः ॥ २१ ॥ तस्मात्क्षेत्रस्य बीजस्य बीजिनश्च कदाचन ॥ वियोगो नेष्यते क्वापि सदा संयोग एव हि ॥ २२ ॥ इत्यादिना उक्तदीक्षात्रयमध्ये आद्यदीक्षाद्वयस्य कारणसूक्ष्मशरीरगतभावप्राणयोरुपदेशरूपेण कर्तुं योग्यत्वात्तत्तु प्रबुद्धावस्थां विना न संघटते ॥ क्रियादीक्षायास्तु रक्तरेतोत्पन्नत्वादत्यन्ताशुचिभूतस्थूलशरीरस्यैव क्रियासंस्कारेण पवित्रीकर्तव्यकत्वात्केवलाज्ञानबालावस्थायामेव सा गर्भाष्टमे कृता दीक्षा मुख्येत्युपरितनवचनेन कर्तुं योग्या भवति ॥ लिंगं तु त्रिविधं प्रोक्तं स्थूलं सूक्ष्मं परात्परम् ॥ इष्टलिंगमिदं स्थूलं यद्बाह्यं धार्यते तनौ ॥ २३ ॥

---

नाहींसें झालें ह्मणजे तिलाच निवृत्ति ह्मणतात. ( २० ) निवृत्ति ह्मणजे विश्रांति आणि विश्रांति हेंच आत्यंतिक सुख होय. याप्रमाणें लिंग व अंग यांच्या संयोगाच्या विधीनें आपल्या आत्मस्वरूपांत राहिलेली ( २१ ) बीजरूप पराशक्ति चोहोंकडे फांकते. मग आत्मा क्षेत्र होतो, भक्ति बीज होते व परमात्मा बीजी ( बीजाचा अधिपति ) होतो. ( २२ ) ह्मणून क्षेत्र, बीज व बीजी यांचा केव्हां ही कोठेंही वियोग होतां कामा नये, नेहमीं संयोगच असला पाहिजे.' इत्यादि वचनांवरून वर सांगिलेल्या तीन दीक्षांपैकीं पहिल्या दोन दीक्षा ( वेधा दीक्षा व मांत्री दीक्षा ) कारण व सूक्ष्म या शरीरांत असलेल्या भावलिंग व प्राणलिंग यांच्या उपदेशरूपानें करावयाच्या असल्यामुळें ( वेधा व मांत्री यां दोन दीक्षांमध्यें कारण शरिरांतील भावलिंग व सूक्ष्म शरीरांतील प्राणलिंग याचा उपदेश करावयाचा असतो ह्मणून ) प्रबुद्ध अवस्थेखेरीज ( ज्यांत जाणण्याची विशेष शक्ति असते अशा-प्रौढ-अवस्थेखेरीज ) त्या करितां येत नाहींत. परंतु क्रियादीक्षेचें तसें नाहीं. रक्त व रेत यांपासून उत्पन्न झाल्यामुळें अत्यंत अपवित्र असलेलें जें स्थूलशरीर, तेंच क्रियासंस्कार करून पवित्र करावयाचें असल्यामुळें ' गर्भापासून आठव्या वर्षी दिलेली दीक्षा मुख्य होय ' अशा वर सांगितलेल्या वचनावरून केवळ अज्ञान अशा बाल्यावस्थेंतच ती ( क्रियादीक्षा ) देतां येते. ' ( २३ ) लिंग तीन प्रकारचें असतें, स्थूल, सूक्ष्म व परात्पर. शराराच्या बाह्यभागीं जें धारण करण्यांत येतें, तें हें इष्टलिंग स्थूललिंग होय.

प्राणलिंगं तु तत्सूक्ष्मं यदन्तर्भावनामयम् ॥ परात्परं तु यत्प्रोक्तं तृप्तिलिंगं तदुच्यते ॥ २४ ॥ अस्मिन् श्लोके क्रमेण कथितलिंगत्रयस्य ज्ञानं दीक्षात्रयेणैव भवति नान्यथा ॥ अतः क्रियादीक्षा सप्रपंचं निरूप्यते ॥ शुभमासे शुभतिथौ शुभकाले शुभेऽहनि ॥ विभूतिं शिवभक्तेभ्यो दत्वा तांवूलपूर्वकम् ॥ २५ ॥ यथाविधि यथायोगं शिष्यमानीय देशिकः ॥ स्नातं शुक्लांबरधरं दंतधावनपूर्वकम् ॥ २६ ॥ मण्डले स्थापयेच्छिष्यं प्राङ्मुखं गुरुरुदङ्मुखः ॥ शिवस्य नाम संकीर्त्य चिंतनं चापि कारयेत् ॥२७॥ विभूतिपट्टं कृत्वाग्रे यथास्थानं यथाविधि ॥ पंचब्रह्ममयैस्तत्र स्थापितैः कलशोदकैः ॥ आचार्यः सह ऋत्विग्भिस्त्रिवारमभिषिंचयेत् ॥ २८ ॥ ततो भूतशुद्धिपापपुरुषदहनभूतप्रविलापादिभिः संस्कारैर्मांसपिण्डं वारयित्वा मंत्रपिंडं कर्तुं मंत्रोपदेशो निगद्यते ॥ अभिषिच्य गुरुः शिष्यमासीनं पुरतः शुचिम् ॥ ततः पंचाक्षरीं शैवीं संसारभयतारिणीम् ॥ २९ ॥ तस्य दक्षिणकर्णे तु निगूढमपि

---

( २४ ) अंतरंगांतील भावनारूप जें प्राणलिंग तें सूक्ष्मलिंग होय. आणि तृप्तिलिंग ज्याला ह्मणतात तें परात्परलिंग होय.' या श्लोकांत क्रमानें सांगितलेल्या तीन प्रकारच्या लिंगांचें ज्ञान तीन प्रकारच्या दीक्षेनेंच होतें, त्याशिवाय होत नाहीं. ह्मणून क्रियादीक्षा सविस्तर सांगतों:–' ( २५ ) शुभ महिन्यांत शुभ तिथीला शुभ दिवशीं शुभ काळीं शिवभक्तांना तांवूल व विभूति देऊन, ( २६ ) दंतधावन करून ( दांत घांसून ) स्नान करून जो पांढरें वस्त्र नेसला आहे अशा शिष्याला योग्य रीतीनें विधिपूर्वक आणून गुरूनें ( २७ ) मंडलांत त्याला पूर्वेकडे तोंड करून वसवावें व आपण उत्तरेकडे तोंड करून बसावें. शिष्याला शिवाचें नांव घ्यावयास सांगून शिवाचें चिंतनही करवावें. ( २८ ) पुढें योग्य ठिकाणीं विधिपूर्वक विभूति लावून तेथें स्थापिलेल्या पंचब्रह्ममय कलशांतील पाणी ऋत्विजांसह आचार्यांनें तीन वेळां शिष्यावर शिंपडावें, नंतर भूतशुद्धि, पापपुरुषदहन भूतप्रविलाप इत्यादि संस्कारांनीं शिष्याचें मांसपिंड ( मांसमय शरीर ) नाहींसें करून मंत्रपिंड ( मंत्रमय शरीर ) करण्याकरितां असा मंत्रोपदेश करावा ह्मणून सांगितलें आहे:–' ( २९ ) आपल्यापुढें बसलेल्या पवित्र अशा शिष्यावर पाणी शिंपडून नंतर गुरूनें संसारभयापासून तारणारा शिवपंचाक्षरीमंत्र ( ३० ) त्याच्या उजव्या कानांत गुप्त रीतीनें सांगावा. त्या मंत्राचा छंद, त्याचे ऋषि,

कीर्तयेत् ॥ छंदोरूपं ऋषींश्चापि देवतां न्यासपद्धतिम् ॥ ३० ॥ आज्ञाचक्रस्थितं ॐकारबीजरूपं महालिंगं करकमलं प्रतिदातुं आधारादिचक्रस्थनकारादिबीजाक्षराणि आचारादिलिंगानि शिवागमोक्तप्रकारेणोपदेशं कुर्यादिति श्लोकार्थः ॥

अथ लिंगधारणविधानं प्रतिपाद्यते

सुप्तावस्थास्थिते अतएव गुरुणा पुनर्दीक्षासमये स्वकरकमलपूजिते तस्मिन् लिंगे शिवकलाप्रतिष्ठा निरूप्यते ॥ सर्वलक्षणसम्पन्ने तस्मिन् लिंगे विशोधिते ॥ जातकर्मादिसुप्ते च पुनर्गंधादिपूजिते ॥ मंत्रपूते कलां शैवीं योजयेद्विधिना गुरुः ॥ ३१ ॥ शिल्पशास्त्रोक्तसकललक्षणयुक्ते जातकर्माणि सुप्तावस्थास्थिते पुनः पंचामृताभिषिक्ते श्रीरुद्रमध्यगतपंचाक्षरमंत्रपवित्रे करपीठस्थलिंगे शिष्यमस्तकस्थितजीवकलां तत्रत्यचिन्मयशिवकलां च विध्युक्तमार्गेण गुरुर्योजयेदित्यस्य श्लोकस्यार्थः ॥

---

त्याची देवता व त्याचा न्यास करण्याची रीतिही सांगावी.' आज्ञाचक्रांत असलेलें ॐकारबीजरूप महालिंग काढून करकमळावर देण्याकरितां आधार वगैरे चक्रांमध्यें असलेलीं नकार वगैरे बीजाक्षरें आणि तेथील आचारलिंग वगैरे लिंगें यांचा शिवागमांत सांगितल्या प्रकारानें उपदेश करावा, असा या श्लोकाचा भावार्थ आहे.

आतां लिंगधारणविधि सांगतों—तें ( मुलाचा जन्म होतांच धारण करण्याकरितां दिलेलें ) लिंग निद्रावस्थेंत असतें ह्मणून गुरूनें पुनः दीक्षा देतांना त्या लिंगाची आपल्या करकमळावर पूजा करून त्यामध्यें शिवकला घालावी ह्मणून सांगण्यांत येतें:–‘ ( ३१ ) शुद्ध केलेलें सर्वलक्षणसंपन्न असें तें लिंग जातकर्मापासून निद्रित असतें ह्मणून गुरूनें पुनः गंधादिकांनीं त्याची पूजा करून व मंत्रानें तें शुद्ध करून शैवी कलेची ( शिवसंबंधीं कलेची ) त्या लिंगांत योजना करावी.' शिल्पशास्त्रांत सांगितलेलीं सर्व लक्षणें ज्यामध्यें आहेत व जातकर्मांत जें निद्रावस्थेंत असतें, त्या लिंगाला पुनः पंचामृताचा अभिषेक करून व श्रीरुद्रामध्यें असलेल्या पंचाक्षरी मंत्रानें तें पवित्र करून करपीठावर ठेवून गुरूनें शिष्याच्या मस्तकांत असलेली जीवकला आणि तेथील चिन्मय शिवकला शास्त्रोक्त मार्गानें त्या लिंगामध्यें योजावी, असा या श्लोकाचा अर्थ आहे. नंतर

पश्चाल्लिंगप्राणयोः सामरस्यं कृत्वा शिष्यकरकमले शिवलिंगं स्थापयेदिति निरूप्यते ॥ शिष्यस्य प्राणमादाय लिंगे तत्र निधापयेत् ॥ तल्लिंगं तस्य तु प्राणे स्थापयेदेकभावतः ॥ एवं कृत्वा गुरुर्लिंगं शिष्यहस्ते निधापयेत् ॥ ३२ ॥ ततः शिष्यं प्रति आज्ञा प्रतिपाद्यते ॥ प्राणवद्धारणीयं तु प्राणलिंगमिदं तव ॥ कदाचित्कुत्रचिद्वापि न वियोजय देहतः ॥ ३३ ॥ यदि प्रमादात्पतिते लिंगे देहान्महीतले ॥ प्राणान् विमुंच सहसा प्राप्तये मोक्षसंपदः ॥ ३४ ॥ इति संबोधितः शिष्यो गुरुणा शास्त्रवेदिना ॥ धारयेच्छांकरं लिंगं शरीरे प्राणयोगतः ॥ ३५ ॥ ततो दीक्षालिंगधारणेन सर्वपापक्षय इत्युच्यते ॥ ब्रह्मोपनिषदि ॥ यदक्षरं परं ब्रह्म तत्सूत्रमिति धारयेत् ॥ धारणात्तस्य सूत्रस्य नोच्छिष्टो नाशुचिर्भवेत् ॥ ३६ ॥ तथा योगसारे ॥ संस्यूतत्वात्समस्तेषु वस्तुष्वपि तु संततम् ॥ सूचनात्परमेशस्य सूत्रं लिंगमितीरितम् ॥ ३७ ॥ शंकरसंहितायाम्॥ स्वप्नकाले कृतं पापं ब्रह्महत्यादिकं च यत् ॥ यथा प्रबोधसमये

---

लिंग व प्राण यांचें ऐक्य करून तें शिवलिंग शिष्याच्या हातांत द्यावें, असें सांगतातः—'( ३२ ) शिष्याच्या प्राणाची लिंगांत स्थापना करावी, आणि एकभावानें त्या लिंगाची त्याच्या प्राणांत स्थापना करावी. असें केल्यावर गुरूनें तें लिंग शिष्याच्या हातांत द्यावें.' मग शिष्याला जी आज्ञा करावयाची ती अशी:—'( ३३ ) हें तुझें प्राणलिंग प्राणाप्रमाणें धारण कर. केव्हांही किंवा कोठेंही याचा शरीरापासून वियोग होऊं देऊं नको. ( ३४ ) जर चुकून हें लिंग शरीरापासून सुटून भूमीवर पडलें, तर तत्काळ प्राणाचा त्याग कर, ह्मणजे तुला मोक्षरूप लक्ष्मी प्राप्त होईल.' ( ३५ ) शास्त्र जाणणाऱ्या गुरूची ही आज्ञा ऐकून शिष्यानें तें शिवलिंग प्राणाप्रमाणें शरीरावर धारण करावें.' नंतर दीक्षेनें लिंग धारण केल्यानें सर्व पापांचा क्षय होतो असें सांगितलें आहे:—( ब्रह्मोपनिषद ) '( ३६ ) जें अविनाशी परब्रम्ह आहे, तेंच सूत्र ह्मणून त्याचें धारण करावें. त्या सूत्राचें धारण केल्यानें मनुष्य संसारांत राहणारा (सांपडणारा) किंवा अपवित्र होत नाहीं.' ( तसेंच योगसार ) '( ३७ ) सर्व वस्तूंमध्यें अखंड व निरंतर भरलेलें असल्यामुळें आणि परमेश्वराचें सूचक असल्यामुळें ( याप्रमाणेंच परमेश्वर आहे अशी भावना उत्पन्न करणारें असल्यामुळें ) सूत्राला लिंग असें म्हटलें आहे.' ( शंकरसंहिता ) '( ३८ ) स्वप्नांत केलेलें ब्रह्महत्या वगैरे जें पातक, तें जागें झाल्यावर

तन्मिथ्या भवति स्फुटम् ॥ ३८ ॥ तथैव सुकृतं पापं लिंगधारणतः पुरा ॥ यदस्ति तल्लयं याति लिंगधारणतः परम् ॥ ३९ ॥ बृहत्कालोत्तरे ॥ व्रतानि दुश्चराणीह तपांस्युग्राणि यानि च ॥ न्यूनानि तानि सर्वाणि दीक्षालिंगस्य धारणात् ॥ ४० ॥ अतो दीक्षालिंगं धारयेत् ॥ ततोऽग्रे सर्वं यथाचारं कार्यम् ॥ एवं वीरशैवदीक्षाविधिं निरूप्य वीरमाहेश्वरदीक्षाभेदो निरूप्यते ॥ सुप्रभेदागमे ॥

ईश्वर उवाच

पंचगोत्रसमुद्भूताः पंचसूत्रानुसारिणः ॥ गुरुस्थलसमाख्याता गुरवः सर्वलिंगिनाम् ॥ तेषां स्थितिं प्रवक्ष्यामि शृणु देवि समाहिता ॥ ४१ ॥ न ब्रह्मचर्यनियमो न वा गार्हस्थ्यमुत्तमम् ॥ वानप्रस्थाश्रमो नैव नैव सन्यासलक्षणम् ॥ ४२ ॥ अतिवर्णाश्रमी लिंगी ज्ञानकाण्डी भवेद्गुरुः ॥ तत्रापि कर्म कुर्वीत ज्ञानैकफलसाधनम् ॥ ४३ ॥ जपस्तपोऽर्चनं ध्यानं ज्ञानं चेति समासतः ॥ एवं पंचविधान्यज्ञान्कुर्वीत नियतेंद्रियः ॥ ४४ ॥ अतो विशिष्टवीरेति वीरमाहेश्वरेति च ॥ पर्यायो वर्तते देवि जंगमस्य महात्मनः ॥४५॥ नि-

ज्याप्रमाणें अगदीं खोटें होतें, ( ३९ ) त्याचप्रमाणें लिंगधारण करण्याच्यापूर्वी केलेलें पापपुण्य लिंगधारण केल्यानंतर नाश पावतें.' ( बृहत्कालोत्तर ) '(४०) जगांत जीं कठिण व्रतें आणि जीं खडतर तपें असतील, तीं सगळीं दीक्षेनें केलेल्या लिंगधारणापेक्षां फार कमी प्रतीचीं होत.' ह्मणून दीक्षेनें लिंगधारण करावें. मग पुढें आचाराप्रमाणें सर्व करावें. याप्रमाणें वीरशैवदीक्षेचा विधि सांगून वीरमाहेश्वरांच्या दीक्षेचा भेद सांगतातः–( सुप्रभेदागम ) ईश्वर ह्मणतातः– '( ४१ ) पांच ( महाचार्यांच्या ) गोत्रांत उत्पन्न झालेले, पंचसूत्राला अनुसरणारे व गुरुस्थलांत प्रसिद्ध असलेले हेच सर्व लिंगीजनाचे गुरु होत. देवि, त्यांची स्थिति सांगतों, लक्ष्य देऊन ऐक. ( ४२ ) ब्रह्मचर्याच्या नियमानें, उत्तम अशा गृहस्थाश्रमानें, वानप्रस्थाश्रमानें किंवा सन्याशाप्रमाणें न वागतां, ( ४३ ) त्या गुरूनें ( गुरुस्थलांतील वीरमाहेश्वरानें ) अतिवर्णाश्रमानें वागावें, लिंगी असावें व ज्ञानकांडी व्हावें. तथापि ज्ञान हेंच फळ ज्यापासून मिळेल असें कर्मही त्यानें करावें. ( ४४ ) इंद्रियें ताब्यांत ठेवून जप, तप, पूजा, ध्यान व ज्ञान हीं पांच मिळून पांच प्रकारचे यज्ञ त्यानें करावे. ( ४५ ) ह्मणून, हे देवि, विशिष्टवीरशैव व वीरमाहेश्वर असा या महात्म्या जंगमांत पर्याय ( क्रम ) आहे. ( ४६ ) निराभारी

राभारिस्थलप्रोक्तलक्षणैर्युतशिष्यकम् ॥ गुरुरादौ परीक्षेत नख-नेत्रादिलक्षणैः ॥ पश्चात्तं योजयेद्देवि दीक्षया विधिपूर्वकम् ॥ ४६ ॥ दीयते लिंगसंबंधः क्षीयते कर्मसंचयः ॥ दीयते क्षीयते यस्माद्दीक्षेति परिकीर्तिता ॥ ४७ ॥ वीरशैवाभिधा दीक्षा वीरमाहेश्वराभिधा ॥ एवं हि भिद्यते दीक्षा भक्तमाहेश्वरेषु च ॥ ४८ ॥ कलशान्पंच संस्थाप्य सद्योजातादिनामतः ॥ शंखमुद्रान्वितः पूज्यो घनलिंगी च दक्षिणे ॥ ४९ ॥ अग्रतः पट्टबद्धं च चतुरो ऋत्विजानपि ॥ संपूज्य दक्षिणां दत्वा सभाभ्यः शिवयोगिनाम् ॥ ५० ॥ गुरुर्गृहीत्वा तं बालं दीक्षितं सव्यपाणिना ॥ सभां प्रदक्षिणीकृत्य साष्टांगं प्रणिपत्य च ॥ ५१ ॥ गुरुर्विज्ञाप्य सर्वेषामनुमत्याऽऽसने विशेत् ॥ स्वपादसंभवं शिष्यं स्वशाखोक्तविधानतः ॥ ५२ ॥ वीरमाहेश्वरीं दीक्षां कारयेदृत्विजैः सह ॥ भिक्षापात्रं दण्डकाष्ठं कंथां काषायवस्त्रकाम् ॥ ५३ ॥ दद्यात्कमण्डलुं चैव विभूतेर्गुण्टिकामपि ॥ ततो भिक्षां चरेद्भक्त्या स्वशाखोक्तविधानतः ॥ ५४ ॥

---

स्थलाचीं सांगितलेलीं लक्षणें ज्या शिष्यामध्यें असतील त्याची गुरूनें नखें, डोळे वगैरे चिन्हांवरून आधीं परीक्षा करावी. मग, देवि, त्याला विधिपूर्वक दीक्षा द्यावी. ( ४७ ) लिंगसंबंध दिला जातो व कर्मांच्या संचयाचा क्षय होतो ह्मणून तिला ( त्या क्रियेला ) दीक्षा ह्मणतात. ( ४८ ) वीरशैवनांवाची दीक्षा व वीरमाहेश्वरनांवाची दीक्षा असा भक्त व माहेश्वर यांच्या दीक्षेंत भेद आहे. ( भक्तांना देण्यांत येणारी दीक्षा वीरशैव नांवाची दीक्षा होय, व माहेश्वरांना देण्यांत येणारी दीक्षा वीरमाहेश्वर नांवाची दीक्षा होय ). ( ४९ ) सद्योजातादि नामांनीं पांच कलशांची स्थापना करावी. दक्षिणेकडे शंखमुद्रान्वित अशा घनलिंगीची पूजा करावी. ( ५० ) पुढच्या बाजूला पट्टाधिकाऱ्याची व चार ऋत्विजांची पूजा करून दक्षिणा द्यावी. मग शिवयोग्यांच्या सभेकडे ( ५१ ) गुरूनें त्या दीक्षित मुलाला उजव्या हातानें धरून आणावें. सभेला प्रदक्षिणा घालून व साष्टांग नमस्कार करून, ( ५२ ) त्यांना विनंति करून त्यांच्या आज्ञेनें गुरूनें आसनावर बसावें; व आपल्या पायांपासून उत्पन्न झालेल्या ( आपल्याला शरण आलेल्या व आपल्यापासून उपदेश पावलेल्या ) शिष्याला आपल्या शाखेंत सांगितलेल्या रीतीनें ( ५३ ) ऋत्विजांसह वीरमाहेश्वरदीक्षा द्यावी. भिक्षापात्र, दंडकाष्ठ, भगव्या-वस्त्राची कंथा, ( ५४ ) कमण्डलु आणि विभूतीचा गोळा ह्या वस्तु ( पंचमुद्रा ) त्याला द्याव्या. मग शिष्यानें आपल्या शाखेंत सांगितलेल्या रीतीनें भिक्षा मागावी.

दत्वा लिंगांगसंबंधबोधशास्त्रं समादिशेत् ॥ स्वासने सन्निवेश्याथ नमस्कुर्यात्स्वयं गुरुः ॥ ५५ ॥ एवं गुरुपदोद्भूता जंगमाः परिकीर्तिताः ॥ योगिनीसहिताः केचित्केचिद्देशिकसंज्ञकाः ॥ स्वेच्छाश्रमविहारास्ते लिंगभोगोपभोगिनः ॥ ५६ ॥ पंचमुद्राधारणविषये समंत्रकं प्रमाणम् ॥ वीरागमे ॥ जटाधारणसंपन्नो धारयेत्पंचमुद्रिकाम् ॥ अस्त्रेण प्रोक्षयेद्दण्डं कंथां कवचमंत्रतः ॥ ५७ ॥ पात्रं हृदयमंत्रेण वामेन तु कमण्डलुम् ॥ अग्निरित्यादिभिर्मंत्रैः सद्योजातादिमंत्रतः ॥ ५८ ॥ विभूतिघुंटिकां प्रोक्ष्य भूत्या तंत्रोक्तमार्गतः ॥ पंचमुद्राः सुसंपूज्याः स्वस्य दक्षिणभासके ॥ शिष्यमादाय मुद्रास्ता दद्यात्पंचाक्षरेण तु ॥५९॥ एतद्विस्तरस्तु बृहद्दीक्षाप्रयोगे द्रष्टव्यः ॥

इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे वीरशैवदीक्षावीरमाहेश्वरदीक्षाविधिर्नामैकादशप्रकरणं समाप्तम् ॥

---

( ५५ ) गुरूनें त्या शिष्याला लिंगांगसंबंध देऊन ( लिंगाचा अंगाशीं कसा संबंध आहे याचें ज्ञान करवून ) बोधाचा उपदेश सांगावा. मग आपल्या आसनावर बसवून स्वतः गुरूनें त्याला नमस्कार करावा. ( ५६ ) याप्रमाणें जंगम हे गुरूच्या पावलांपासून उत्पन्न झालेले असें ह्मणतात. कित्येक योगिनीसुद्धां ( स्त्रियांसह-गृहस्थ ) असतात, व कित्येक देशिक असतात. ते लिंगभोगाचा उपभोग घेत स्वेच्छाश्रमांत ( मनास वाटेल त्या आश्रमांत ) राहतात.' पंचमुद्रा धारण करण्याबद्दल समंत्रक प्रमाण--( वीरागम ) '( ५७ ) जटा धारण करून पंचमुद्रा धारण कराव्या. अस्त्रमंत्रानें दंडावर प्रोक्षण करावें. कवचमंत्रानें कंथेवर प्रोक्षण करावें. ( ५८ ) हृदयमंत्रानें भिक्षापात्रावर प्रोक्षण करावें, वाममंत्रानें कमंडलूवर आणि 'अग्निरिति' वगैरे मंत्रांनीं व सद्योजातादि मंत्रांनीं ( ५९ ) विभूतीच्या गोळ्यावर प्रोक्षण करावें. तंत्रोक्तमार्गानें विभूतीनें पांचही मुद्रांची आपल्या उजव्याबाजूकडे पूजा करावी. शिष्याला आणून त्या मुद्रा पंचाक्षरमंत्रानें द्याव्या.' हा सगळा विधि बृहद्दीक्षाप्रयोगांत सविस्तर पहावा.

याप्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील वीरशैवदीक्षाविधि व वीरमाहेश्वरदीक्षाविधि नांवाचें हें अकरावें प्रकरण संपलें.

---

## वीरशैवप्रकाशिकानुसारेण लघुदीक्षाप्रयोगो नाम द्वादशप्रकरणम्

देवालये मठे वापि देशिकस्य गृहेऽपि वा ॥ मंडपं कारयित्वा तु चतुरस्रं सुशोभितम् ॥ १ ॥ षोडशस्तंभसंयुक्तमथवा द्वादशैरपि ॥ दर्भमूलसमायुक्तं शुभ्रवस्त्रैश्च शोभितम् ॥ २ ॥ घण्टातोरणसंयुक्तं पुष्पमालाविभूषितम् ॥ चूतपल्लवसंयुक्तं गन्धपुष्पाक्षतैर्युतम् ॥ ३ ॥ पताकाध्वजसंयुक्तं शंखदुंदुभिघोषितम् ॥ वेदघोषसमायुक्तं मंडपं कारयेद्बुधः ॥ ४ ॥ तत्र वेदीं कारयित्वा चतुरस्रां सुशोभनाम् ॥ पद्माकृतिं वा तद्वेदिं वर्तुलाकारमेव वा ॥ दर्पणोदरसंकाशां निम्नोन्नतविवर्जिताम् ॥ ५ ॥ अपसर्पन्तु ये भूता ये भूता भुवि संस्थिताः ॥ ये भूता विघ्नकर्तारस्ते गच्छन्तु शिवाज्ञया ॥ ६ ॥ इति मंत्रेण भूशुद्धिं पंचगव्यैश्च मार्जयेत् ॥ तत्र रंगं समास्थाय पद्मपत्रदलं न्यसेत् ॥ ७ ॥ सुस्नात्वाऽऽचम्य विधिना पुण्याहं वाचयेत्ततः ॥ रुद्रसूक्तेन चांगानि शिरः फालं च कर्णकम् ॥ ८ ॥ जिव्हायां च भुजद्वंद्वे कुक्षौ नाभौ च पृष्ठके ॥

---

आतां लघुदीक्षाप्रयोग लिहितों. ( वीरशैवप्रकाशिका ) ( १ ) देवळांत, मठांत किंवा गुरूच्या घरीं शोभिवंत असा चतुष्कोण मंडप करवावा. ( २ ) त्याला सोळा किंवा बारा खांब असावे. तेथें दर्भमूळ आणून ठेवावें. पांढऱ्यावस्त्रांनीं मंडप शोभिवंत करावा. ( ३ ) घंटा, तोरणें बांधावीं. फुलाच्या माळांनीं तो सुशोभित करावा. अंब्याचीं पानें बांधावीं. गंध, पुष्प, अक्षता ही सामुग्री तयार करून ठेवावी. ( ४ ) ध्वज, पताका उभाराव्या. शंख, दुंदुभि हीं वाद्यें वाजवावीं. तसेंच शहाण्या मनुष्यानें त्या मंडपांत वेदघोष करवावा. ( ५ ) तेथें सुंदर अशी चतुष्कोण, कमळाकार किंवा वर्तुलाकार वेदी करवावी. ती उंचसखल न करितां अरशाच्या पृष्ठभागाप्रमाणें सपाट असावी. ( ६ ) 'अपसर्पन्तु' पासून 'गच्छन्तु शिवाज्ञया' पर्यंत ( जीं भूतें भूमीवर असतील, तीं निघून जावोत, जीं भूतें विघ्न करणारीं असतील तीं शिवाच्या आज्ञेनें जावोत ). ( ७ ) ( मूळांत दिलेला ) मंत्र म्हणून भूशुद्धि करून पंचगव्यांनीं ती जागा सारवावी. त्यावर रांगोळी घालून कमळाची पाकळी काढावी. ( ८ ) मग मंगलस्नान करून आचमन करून विधिपूर्वक पुण्याहवाचन करवावें. रुद्रसूक्तानें सर्वावयवांना, मस्तकाला, कपाळाला, कानाला, ( ९ ) जिभेला, दोन्ही भुजांना, पोटाला, नाभीला, पाठीला आणि

ककुदेकादशस्थाने विभूत्या चिन्हितो गुरुः ॥ रुद्राक्षधारणं कृत्वा कलशान्स्थापयेद्बुधः ॥ ९ ॥ अच्छिद्रान्बहुसंतप्तान्पाषाणस्फोटवर्जितान् ॥ खर्पराकाररहितान् लघुस्थूलविवर्जितान् ॥ १० ॥ रेणुकस्य हरिद्वर्णं दारुकस्य च ताम्रकम् ॥ शंखुकर्णस्य कापोतं धेनुकर्णस्य कांस्यकम् ॥ ११ ॥ विश्वकर्णस्य सौवर्णान्कलशान्स्थापयेद्बुधः ॥ अथवा मृन्मयान्कुर्यात्तत्तद्वर्णैश्च संयुतान् ॥ १२ ॥ पंचमाचार्यमध्ये तु यः पीठमधिरोहति ॥ तदाऽसौ गुरुशब्देन वाच्य इत्यभिधीयते ॥ शेषाश्चत्वार आचार्या उपदेशस्य साक्षिणः ॥१३॥ गुरुस्तस्यां वेदिकायां तण्डुलानर्पयेत्ततः ॥ तस्योपरि स्वकलशं मध्यमे स्थापयेत्ततः ॥ १४ ॥ तच्छेषान् कलशांश्चैव स्थापयेच्च यथाक्रमम् ॥ ईश्वरस्य मुखान्येव कलशानि न संशयः ॥ १५ ॥ एताहशकरीराणां नवसूत्रेण वेष्टयेत् ॥ प्रत्येकं नववस्त्रेण वेष्टयेद्देशिकोत्तमः ॥ १६ ॥ गंगादिसर्वतीर्थानामंभसा परिपूरयेत् ॥ संपूर्य पंचकलशानिमं मे इति मंत्रतः ॥१७॥ तेषु तीर्थांबुपूर्णेषु सन्निधायाम्रपल्लवान् ॥ दूर्वांकुरान्सपूगांश्च नागवल्लिदलान्वितान् ॥१८॥

---

खांद्याच्या खालच्या बाजूला विभूति लावून घेऊन गुरूनें रुद्राक्षांचें धारण करावें. मग गुरूनें कलशांची स्थापना करावी. ( १० ) ते कलश छिद्ररहित ( ज्यांना भोकें नाहींत असे ), चांगलें जाळून तयार केलेले, व विन खड्याचे ( कलशांत खडा नसावा ) असावे. खापराच्या आकाराचे नसावे व लहान मोठे नसावे. ( ११ ) रेणुकशाखेचे, पिंवळ्यावर्णाचे, दारुकशाखेचे, तांब्याचे, शंखुकर्णशाखेचे, कपोतवर्णाचे, धेनुकर्णशाखेचे, कांशाचे, ( १२ ) व विश्वकर्णशाखेचे सोन्याचे कलश गुरूनें स्थापावे. किंवा त्या त्या वर्णाचे मातीचे कलश करवावे. ( १३ ) पंचाचार्यांमध्यें जो पीठावर बसतो तो गुरु समजावा ह्मणून सांगितलें आहे. बाकीचे चौघे आचार्य उपदेशाचे साक्षीदार होत. ( १४ ) मग त्या वेदिकेवर गुरूनें तांदूळ घालून त्यावर आपला कलश मध्यभागीं ठेवावा, ( १५ ) व राहिंलेले कलश जसा क्रम असेल त्याप्रमाणें ठेवावे. ईश्वराचीं मुखेंच हे कलश होत यांत संशय नाहीं. ( १६ ) या प्रकारच्या या कलशांभोंवतीं नवा दोरा गुंडाळावा. गुरूनें प्रत्येक कलशाला एक नवें वस्त्र वेष्टावें. ( १७ ) गंगा वगैरे सर्व तीर्थांच्या पाण्यानें ते कलश भरावे. याप्रमाणें पांचही कलश 'इमं मे' इत्यादि मंत्रानें पाण्यानें भरल्यावर ( १८ ) त्या भरलेल्या कलशांत आंब्याचीं पानें, दूर्वा,

तेषु संस्थाप्य रत्नानि निक्षिप्य परिपूजयेत् ॥ नानाविधैश्च कुसुमैर्गन्धपत्राक्षतादिभिः ॥ १९ ॥ एवं शास्त्रोक्तविधिना पंचमान् कलशानपि ॥ संपूज्य फलनैवेद्यैः सतांबूलैः सदक्षिणैः ॥ दशधा तत्र निक्षिप्तैरर्हणैः परिपूजयेत् ॥ २० ॥

पार्वत्युवाच

पंचैव कलशास्तत्र निक्षिप्ताः परिपूजिताः ॥ किमर्थं दशधा तेषामर्हणानि विनिक्षिपेत् ॥ २१ ॥

ईश्वर उवाच

महाचार्याः पंचविधा वृत्त्याचार्याश्च पंचधा ॥ एवं दशविधानां तु भागाश्च परिकल्पिताः ॥ २२ ॥ तस्माद्दशविधं तत्र फलनैवेद्यकम् न्यसेत् ॥ पंच पूर्णानि निक्षिप्य तदर्धं पंचधा क्षिपेत् ॥२३॥ पूर्णभागान्महाचार्याश्चाहरेयुर्यथाक्रमम् ॥ उपसूत्रैश्च युक्तानां चैवमेव हि निर्णयः ॥ २४ ॥ तदर्धं च गृण्हीयाद्वृत्त्याचार्यास्ततः परम् ॥ एकस्य भागमेकस्तु गृहीतुं नैव चार्हति ॥ २५ ॥ बलादपि च गृण्हीयात्समानस्कंदता भवेत् ॥ तेन दोषफलं भुक्त्वा नरकानेव विंदति ॥ २६ ॥ वृत्त्याचार्यपदार्थं तु महाचार्या यदाहरन् ॥ तदा

---

नागवेलीचीं पानें व सुपारी घालून ( १९ ) त्यांत रत्नें घालावीं. अनेक प्रकारच्या फुलांनीं, गंधपत्राक्षतादिकांनीं त्यांची पूजा करावी. ( २० ) या रीतीनें शास्त्रोक्त विधीनें पांचही कलशांची फळें, नैवेद्य, तांबूल, दक्षिणा यांनीं पूजा करून नंतर तेथें ठेवलेल्या दहा प्रकारच्या अर्हणांनीं ( उपचारांनीं ) पूजा करावी." पार्वती ह्मणतेः– ( २१ ) 'तेथें पांचच कलश ठेवलेले असून त्यांची पूजा करण्यांत येते. मग पुनः दहा प्रकारचीं पूजा-द्रव्यें ( अर्हणें ) तेथें ठेवण्याचें कारण काय' ? ईश्वर म्हणतातः– ( २२ ) 'महाचार्य पांच प्रकारचे व वृत्त्याचार्य पांच प्रकारचे याप्रमाणें दहा प्रकारच्या आचार्यांचे दहा भाग केले आहेत. ( २३ ) ह्मणून तेथें फलनैवेद्याचे दहाभाग ठेवावे. त्यांपैकीं पांच पूर्ण भाग कल्पून दुसरे पांच भाग त्यांच्या अर्धेअर्धे करावे. ( २४ ) पूर्ण भाग वहिवाटीप्रमाणें महाचार्यांनीं घ्यावे. उपसूत्रधाऱ्यांचाही याप्रमाणेंच निर्णय समजावा. ( २५ ) मग अर्धे अर्धे ठेवलेले भाग वृत्त्याचार्यांनीं घ्यावे. एकाचा भाग दुसऱ्याला घेण्याचा मुळींच हक्क नाहीं. ( २६ ) बळानें एकाचा भाग दुसरा घेईल, तर एकानें दुसऱ्याची बरोबरी केल्याप्रमाणें होईल, व त्या दोषाचें फळ भोगण्याकरितां त्याला नरकाला जावें लागेल. ( २७ ) वृत्त्याचार्यांचा भाग महाचार्यांनीं घेतला तर त्यांच्या मो-

तेषां च महतां न्यूनता भवति ध्रुवम् ॥ २७ ॥ एवं शास्त्रोक्त-
विधिना पंचमान्कलशानपि ॥ प्राणप्रतिष्ठां कुर्वीत ब्रह्ममंत्रैर्न्यसे-
द्बुधः ॥ २८ ॥ पूर्णकुंभं प्रतिगृह्य करद्वयसमन्वितम् ॥ उत्तमांगा-
दिसर्वांगे स्नानं तु शिवशासनात् ॥ २९ ॥ विधाय मंगलस्नानं
धौतवस्त्रपरिच्छदः ॥ गृहीत्वा फलपुष्पादीन् विभूत्या च समन्वि-
तान् ॥ ३० ॥ गुरुसन्निधिमासाद्य भक्त्या वित्तानुसारतः ॥ तद-
र्हणं गृहीत्वाथ निधाय गुरुसन्निधौ ॥ ३१ ॥ साष्टांगनमनं कृत्वा
सर्वेषामृत्विजामपि ॥ गुरुं संप्रार्थयेच्छिष्यस्त्वहं पापमयो यतः
॥ ३२ ॥ तस्मादुद्धर पूर्वस्मात्पापादेव मया कृतात् ॥ गुरो कृपां-
बुधे सुप्तं मम लिंगं प्रतिष्ठितम् ॥ ३३ ॥ प्रबुध्य धारयाद्यैव भवा-
ब्धेश्च समुद्धर ॥ इति संप्रार्थिताचार्य उपदेष्टुं समारभेत् ॥ ३४ ॥
शिष्यदत्तफलाद्यैश्च कलशं स्वं प्रपूजयेत् ॥ ततश्चत्वार कलशान्पू-
जयेच्च यथाक्रमम् ॥ ३५ ॥

पार्वत्युवाच

पूर्वोक्तपंचकलशास्ते सर्वे प्रणवान्विताः ॥ भिन्नभिन्नाश्च संत्येते

---

ठेपणाला खरोखर कमीपणा येईल. ( २८ ) याप्रमाणें गुरूनें शास्त्रोक्त विधीनें ब्रह्ममंत्रांनीं पांचही कलशांची प्राणप्रतिष्ठा करून ते कलश ठेवावे. ( २९ ) दोन्हीं हातांनीं भरलेली घागर घेऊन रिवाजाप्रमाणें मस्तकासुद्धां सर्वांग धुवून ( ३० ) मंगलस्नान करून शिष्यानें धुतलेलें वस्त्र नेसावें. विभूतिसुद्धां फलपुष्प वगैरे घेऊन ( ३१ ) गुरूजवळ येऊन आपल्या पैशाच्या मानानें तें अर्हण ( वर सांगितलेला हक्काचा भाग ) घेऊन गुरूजवळ ठेवावें. ( ३२ ) गुरूला व सगळ्या ऋत्विजांना साष्टांग नमस्कार करून शिष्यानें गुरूला विनंति करावी कीं, 'मी पातकी आहें. ( ३३ ) हे कृपासागरा गुरो, मीं केलेल्या पातकांपासून माझा उद्धार करावा. निद्रावस्थेंत असलेलें व ज्यावर संस्कार झाले आहेत असें हें माझें लिंग ( ३४ ) जागें करून आज मला धारण करवून संसारसमुद्रांतून मला पार पाडावें.' अशी शिष्यानें प्रार्थना केल्यावर गुरूनें उपदेश देण्याला आरंभ करावा. ( ३५ ) शिष्यानें दिलेल्या फळादिकानें गुरूनें आपल्या कलशाची पूजा करावी; मग बाकीच्या कलशांची ( ज्या त्या आचार्यांनीं ) यथाक्रम पूजा करावी. पार्वती ह्मणतेः–( ३६ ) 'आपण पूर्वीं सांगितलेले पांच कलश सगळे प्रणवाक्षरांनीं युक्त असतात. प्रत्येक कलशाचीं प्रणवाक्षरें वेगवेगळीं आहेत आणि त्यांचे वेदही वेगवेगळे आहेत.

वेदाश्चैव तथा परे॥ तेषां संस्थापनविधिं वक्तुमर्हसि सांप्रतम् ॥३६॥

ईश्वर उवाच

उपदेशविधिं वक्ष्ये पाशुपत्यागमोदितम् ॥ तत्र पंचविधास्सन्ति प्रणवाः कलशा इमे ॥ ३७ ॥ मुखानि वेदाः पंचानामाचार्याणां पृथक् पृथक् ॥ तेषां संस्थापनविधिं वक्ष्ये शास्त्रानुनिश्चितम् ॥ ३८ ॥ चरंति पंच प्रणवा गुरुराचार्यकास्तथा ॥ वेदाः पाशुपतानां तु उपदेशानुसारतः ॥ ३९ ॥ तेषां पंचविधानां तु दिक्प्रधानं न विद्यते ॥ ग्रंथान्तरेऽपि विद्येत स ग्रंथो मोहको भवेत् ॥ ४० ॥ मयोदितं प्रधानं स्याद्बहुवेदेषु संमतम् ॥ तदेवादरणीयं स्यात्सर्वैरपि न चान्यथा ॥ ४१ ॥ मोहकं तु प्रधानं स्याज्जातिसांकर्यता भवेत् ॥ तस्मात्तदुक्तविधिना दिक्प्रधानं न कारयेत् ॥ ४२ ॥ ज्ञानिनां मोक्षणार्थाय शैवानां तारणाय च ॥ एतन्मयोदितं गुह्यं न वाच्यं यस्य कस्य चित् ॥ ४३ ॥ रेणुकस्य स्वगोत्राणामुपदेशो यदा भवेत् ॥ तदा तत्प्रणवं मध्ये नकारं स्थापये-

---

त्यांची स्थापना कशी करावयाची तें आतां कृपा करून सांगावें.' ईश्वर म्हणतात:- ( ३७ ) 'पाशुपत्यागमांत सांगितलेला उपदेशविधि सांगतों हे पांच कलश असतात त्याप्रमाणें पांच प्रकारचे प्रणवही आहेत. ( ३८ ) पंचाचार्यांचीं मुखें व वेदही निरनिराळे आहेत. शास्त्रांत सांगितलेला त्यांच्या स्थापनेचा विधि सांगतों. ( ३९ ) पाशुपतांचे पंचप्रणव, गुरु, आचार्य व वेद हे त्यांच्या उपदेशाला अनुसरून आहेत ( जसा उपदेश असेल त्याप्रमाणें आहेत ). ( ४० ) या पांच प्रकारांत दिशेला महत्व मुळींच दिलेलें नाहीं ( अमुक दिशेचा प्रणव मुख्य व बाकीचे गौण आहेत असें मानावयाचें नाहीं ). दुसऱ्या ग्रंथांत याप्रमाणें दिशेला महत्व दिलें असेल तर तो ग्रंथ घोंटाळ्यांत घालणारा (चुकीचा) होय. ( ४१ ) माझेंच सांगणें प्रमाण असून सर्व वेदांत मान्य आहे. ह्मणून सर्वांनीं त्याप्रमाणें वागावें. दुसऱ्या रीतीनें वागूं नये. ( ४२ ) मोह घालणाऱ्या ( गोंधळविणाऱ्या ) ग्रंथाला महत्व दिलें असतां वर्णसंकर होईल. ह्मणून त्या ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें दिशेला प्रधानत्व देऊं नये. ( ४३ ) ज्ञान्यांना मोक्ष मिळावा ह्मणून व शैवांनीं तरून जावें ( उद्धरून जावें ) ह्मणून मी हें गुह्य सांगितलें आहे. तें भलत्या कोणाला सांगूं नये. ( ४४ ) आपल्या गोत्र्यांना रेणुकाचा उपदेश असेल त्यावेळीं त्यांच्या पंचप्रणवांपैकीं नकाराची गुरूनें मध्यें स्थापना करावी.

द्बुधः ॥ ४४ ॥ मकारं पूर्वतः कृत्वा शिकारं दक्षिणे न्यसेत् ॥ वाकारं पश्चिमे विन्द्याद्यकारं चोत्तरे न्यसेत् ॥ ४५ ॥ दारुकस्य स्वगोत्राणामुपदेशो यदा भवेत् ॥ तदा मकारं मध्ये तु प्रणवं स्थापयेद्बुधः ॥ ४६ ॥ शिकारं पूर्वदेशे तु वाकारं दक्षिणे न्यसेत् ॥ यकारं पश्चिमे विद्यान्नकारं चोत्तरे न्यसेत् ॥ ४७ ॥ शंखुकर्णस्योपदेशे शिकारं मध्यमे न्यसेत् ॥ वाकारं पूर्वतः कृत्वा यकारं दक्षिणे न्यसेत् ॥ ४८ ॥ नकारं पश्चिमे कृत्वा मकारं चोत्तरे न्यसेत् ॥ धेनुकर्णस्योपदेशे वाकारं मध्यमे न्यसेत् ॥ ४९ ॥ यकारं पूर्वतः कृत्वा नकारं दक्षिणे न्यसेत् ॥ मकारं पश्चिमे न्यस्य शिकारं चोत्तरे न्यसेत् ॥ ५० ॥ विश्वकर्णस्योपदेशे यकारं मध्यमे न्यसेत् ॥ नकारं पूर्वतः कृत्वा मकारं दक्षिणे न्यसेत् ॥ शिकारं पश्चिमे कृत्वा वाकारं चोत्तरे न्यसेत् ॥ ५१ ॥ रेणुकस्य नकारोऽयं दारुकस्य मकारकः ॥ शिकारः शंखुकर्णस्य धेनुकर्णस्य वाऽक्षरः ॥ यकारो विश्वकर्णस्य प्रणवाः परिकीर्तिताः ॥ ५२ ॥ यस्याचार्यस्य प्रणवो यस्यां दिशि च वर्तते ॥ सा दिक् तस्यैव विज्ञेया दिक्प्रधानं न विद्यते ॥ ५३ ॥ दिक् प्रधानं न चैतेषां प्र-

---

(४५) मकाराची पूर्वेकडे, शिकाराची दक्षिणेकडे, वाकाराची पश्चिमेकडे आणि यकाराची उत्तरेकडे स्थापना करावी. (४६) आपल्या गोत्र्यांना दारुकाचार्यांचा उपदेश असेल तेव्हां गुरूनें मकाराची मध्यभागीं स्थापना करावी. (४७) शिकाराची पूर्वेकडे, वाकाराची दक्षिणेकडे, यकाराची पश्चिमेकडे आणि नकाराची उत्तरेकडे स्थापना करावी. (४८) शंखुकर्णाच्या उपदेशाचे प्रसंगीं शिकार मध्यभागीं स्थापावा. वाकार पूर्वेकडे, यकार दक्षिणेकडे, (४९) नकार पश्चिमेकडे आणि मकार उत्तरेकडे स्थापावा. धेनुकर्णाच्या उपदेशाच्यावेळीं वाकाराची मध्यें स्थापना करावी. (५०) यकाराची पूर्वेला, नकाराची दक्षिणेला, मकाराची पश्चिमेला आणि शिकाराची उत्तरेला स्थापना करावी. (५१) विश्वकर्णाच्या उपदेशाच्या वेळीं यकार मध्यभागीं स्थापून नकाराची पूर्वेकडे, मकाराची दक्षिणेकडे, शिकाराची पश्चिमेकडे आणि वाकाराची उत्तरेकडे स्थापना करावी. (५२) रेणुकाचा नकार प्रणव, दारुकाचा मकार, शंखुकर्णाचा शिकार, धेनुकर्णाचा वाकार आणि विश्वकर्णाचा यकार असे प्रणव मानिले आहेत. (५३) ज्या आचार्यांचें प्रणवाक्षर ज्या दिशेला असेल, ती दिशा त्या आचार्यांची समजावी. यांत दिशेचें महत्व नाहीं. (अमुक दिशा मुख्य व अमुक गौण असें समजूं नये) (५४) या

णवेनैव निर्णयः ॥ शिष्यलिंगगुरूणां च कलशानां तथैव च ॥५४॥ एकसूत्रं वेष्टयित्वा शिष्यस्याभिमुखो गुरुः ॥ शुद्धिं कृत्वा पंचगव्यैर्लिंगं शिष्यकरौ तथा ॥ ५५ ॥ लिंगं तथाऽर्चयेद्धीमानेकविंशतिपूजनैः ॥ मस्तके सप्त पूजाश्च कृत्वा हस्तं तथार्चयेत् ॥ ५६ ॥ शास्त्रोक्तविधिना कृत्वा चतुर्भिस्तैश्च संयुतः ॥ पंचाक्षरीमंत्रवरमुपदिश्य स्वशिष्यकम् ॥ ५७ ॥ तल्लिंगं च गले बध्द्वा गुरुस्तीर्थं प्रदापयेत् ॥ तत्सूत्रं दर्भसंयुक्तं कंकणं धारयेत्करे ॥ ५८ ॥ एवं हि वीरशैवस्य व्यवहारपरस्य च ॥ दीक्षां कुर्याद्यथाशास्त्रं भिक्षुको यदि वर्तते ॥ ५९ ॥ दीक्षान्ते पंचमुद्रा वै दत्वा भिक्षां च कारयेत् ॥ उपदेशस्त्वेवमेव कर्तव्यो गुरुसत्तमैः ॥ ६० ॥ पंचमुद्रांकिताः सर्वे भिक्षुकाः परिकीर्तिताः ॥ देहशुद्ध्यर्थमेतेषामुपदेशः कृतो भवेत् ॥ ६१ ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे वीरशैवप्रकाशिकानुसारेण लघुदीक्षाप्रयोगो नाम द्वादशप्रकरणं समाप्तम् ॥

---

आचार्यांमध्यें दिशेचें महत्व नसल्यामुळें प्रणवानेंच त्यांचा निर्णय करावा. शिष्य, लिंग, गुरु आणि कलश या सगळ्यांना ( ५५ ) एक सूत्र वेष्टून शिष्याच्या समोर गुरूनें बसावें. पंचगव्यांनीं लिंगाची शुद्धि करून शिष्याचे हस्तांची शुद्धि करावी. ( ५६ ) नंतर गुरूनें लिंगाची *एकवीस वेळां पूजा करावी. मस्तकाची सात वेळां पूजा करून त्याप्रमाणेंच हातांची सात वेळां पूजा करावी. ( ५७ ) ती शास्त्रोक्तविधीनें करावी. त्या चार आचार्यांसह श्रेष्ठ अशा पंचाक्षरी मंत्राचा शिष्याला उपदेश करून ( ५८ ) तें लिंग गुरूनें त्याच्या गळ्यांत बांधावें, आणि त्याला तीर्थ द्यावें. त्या ( वर सांगितलेल्या कलशाभोंवतीं ) वेष्टिलेल्या सूत्राचें दर्भासुद्धां हातांत कंकण बांधावें. ( ५९ ) व्यापार करणाऱ्या वीरशैवालाही याप्रमाणेंच यथाशास्त्र दीक्षा द्यावी. भिक्षुक असेल तर ( ६० ) दीक्षेच्या शेवटीं पंचमुद्रा देऊन त्याजकडून भिक्षा करवावी. गुरूंनीं त्यांना उपदेश याप्रमाणेंच करावा. ( ६१ ) सर्व भिक्षुकांना पंचमुद्रा असल्या पाहिजेत. देहशुद्धीकरितां त्यांना उपदेश द्यावा लागतो.

याप्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील वीरशैवप्रकाशिकेला अनुसरून लघुदीक्षाप्रयोग नांवाचें हें बारावें प्रकरण संपलें.

---

* लिंगाची सात वेळां, मस्तकाची सात वेळां व हस्ताची सात वेळां मिळून एकवीस पूजा करण्याची रूढी आहे.

## वीरशैवाचारदीपिकायां दीक्षायां कालदेशनिर्णयो नाम त्रयोदशप्रकरणम्

अथ कालं च देशं च प्रवक्ष्यामि यथा तथा ॥ शुभकाले शुभेमासे शुभतिथ्यां शुभेऽहनि ॥ शुभप्रदेशनक्षत्रे दीक्षां कुर्याद्विचक्षणः ॥ १ ॥ शरत्कालश्च वैशाख उत्तमः परिकीर्तितः ॥ फाल्गुनो मार्गशीर्षश्च ज्येष्ठमासस्तु मध्यमः ॥ २ ॥ श्रावणमाघमासौ तु कनिष्ठौ समुदाहृतौ ॥ चैत्रश्चाषाढमासश्च पुष्यो भाद्रपदस्तथा ॥ चत्वारो निंदिता मासा दीक्षायां शिवशासनात् ॥ ३ ॥ मंत्रारंभस्तु चैत्रे चेद्बहुदुःखफलप्रदः ॥ वैशाखे मंत्रलाभः स्याज्ज्येष्ठे च मरणं ध्रुवम् ॥ ४ ॥ आषाढे बंधुनाशः स्यात्पूर्णायुः श्रावणे भवेत् ॥ प्रजानाशो भाद्रपदे सर्वतः शुभमाश्विजे ॥ ५ ॥ कार्तिके मंत्रसिद्धिः स्यान्मार्गशीर्षः शुभावहः ॥ पुष्ये तु मंत्रहानिः स्यान्माघे मेधाविवर्धनम् ॥ फाल्गुने सर्वसिद्धिः स्यादिति मंत्रविदो विदुः ॥ ६ ॥ शुक्लपक्षे शुभा दीक्षा कृष्णे वा पंचमी दिनम् ॥

---

दीक्षा देण्याला काल देश कोणता असावा याचा निर्णय. (वीरशैवाचारदीपिका) (१) आतां (दीक्षेला) योग्य काळ व योग्य देश कोणता तो सांगतों. शुभ वेळीं, शुभ महिन्यांत, शुभ तिथीला, शुभ दिवशीं, शुभ जागीं व शुभ नक्षत्रावर ज्ञात्यानें दीक्षाकर्म करावें. (२) शरदृतु व वैशाख, फाल्गुन आणि मार्गशीर्ष हे महिने उत्तम मानिले आहेत. ज्येष्ठाचा महिना मध्यम होय. (३) श्रावण व माघ हे महिने कनिष्ठ प्रतीचे होत. चैत्र, आषाढ, पौष आणि भाद्रपद हे चार महिने दीक्षेकरितां शिवाज्ञेवरून निंद्य मानिले आहेत. (४) मंत्राचा आरंभ चैत्रांत झाल्यास, दुःख हें त्याचें फळ मिळतें. वैशाखांत केल्यास मंत्रलाभ होतो. ज्येष्ठांत मरण ठरलेलें आहे. (५) आषाढांत बंधूचा नाश होईल. श्रावणांत पूर्णायुषी होईल. भाद्रपदांत प्रजेचा नाश होईल. अश्विनमासांत सर्व प्रकारानें कल्याण होईल. (६) कार्तिकांत मंत्रसिद्धि होईल. मार्गशीर्ष महिना सुख देणारा आहे. पौष्यमासांत मंत्राची हानि होईल. माघमासांत वुद्धि वाढेल, आणि फाल्गुनांत सर्व सिद्धि होईल असें मंत्र जाणणाऱ्यांचें मत आहे. (७) शुक्लपक्षांत दीक्षा घेतलेली चांगली किंवा कृष्णपक्षांत पंचमी चांगली. विषय भोगेच्छूंना शुक्लपक्ष चांगला आणि मुमुक्षूंना (मोक्षाची इच्छा करणाऱ्यांना)

शुक्लपक्षे बुभुक्षूणां मुमुक्षूणां सितेतरे ॥ ७ ॥ चतुर्थीं नवमीं षष्ठीमष्टमीं च चतुर्दशीम् ॥ पौर्णमासीं विना शेषा हितास्तु तिथयो मताः ॥ ८ ॥ चतुर्दशी चतुर्थी च षष्ठी चैवाष्टमी तथा ॥ नवमी द्वादशी चैव पक्षतिथ्यः प्रकीर्तिताः ॥ ९ ॥ रोहिणी मृगशीर्षं च मघापुष्यपुनर्वसू ॥ स्वाती हस्तानुराधा च श्रवणं रेवती तथा ॥ त्रीण्युत्तराणि मूला च नक्षत्राणि चतुर्दश ॥ १० ॥ व्याघातं परिघं वज्रं व्यतीपातं च वैधृतिः ॥ गंडातिगंडौ शूलं च विष्कंभं वर्जयेच्छुभे ॥ ११ ॥ ववादिवणिजांतानि शुभानि करणानि षट् ॥ परितो विपरीतं वा विष्टे नष्टा तु मंगले ॥ १२ ॥ सुतिथेः श्रियमाप्नोति वारादायुष्यवर्धनम् ॥ नक्षत्राद्धरते पापं योगाद्रोगनिवारणम् ॥ करणात्कार्यसिद्धिः स्यात्पंचांगं फलमुत्तमम् ॥ १३ ॥ वृषभो वाथ कुंभो वा वृश्चिकः सिंह एव च ॥ मिथुनं वापि कन्या च धनुर्मीनमथापि वा ॥ १४ ॥ एते हि राशयः प्रोक्ताश्चरराशींश्च वर्जयेत् ॥ चरौ मकरमेषौ च तुला कर्कटकं तथा ॥ दीक्षायां वर्ज-

कृष्णपक्ष चांगला. ( ८ ) चतुर्थी, नवमी, षष्ठी, अष्टमी, चतुर्दशी आणि पौर्णिमा या तिथी खेरीज करून राहिलेल्या तिथी मान्य होत. ( ९ ) चतुर्दशी, चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी व द्वादशी ह्या पक्षाच्या तिथी होत. ( १० ) रोहिणी, मृग, मघा, पुष्य, पुनर्वसु, स्वाती, हस्त, अनुराधा, श्रवण, रेवती, तिन्ही उत्तरा ( उत्तरा फाल्गुनी, उत्तराषाढा व उत्तरा भाद्रपदा ) आणि मूळ हीं चवदा नक्षत्रें योग्य आहेत. ( ११ ) व्याघात, परिघ, वज्र, व्यतीपात, वैधृति, गंड, अतिगंड, शूल, आणि विष्कंभ हे योग वर्ज करावे. ( १२ ) ववापासून वणिजापर्यंत सहा करणें शुभ होत. पुढचे करण विपरीतफल देणारे आहेत. जसे विष्टीवर कार्य केलें असतां नष्ट होतें उलट मंगलावर कार्य केलें असतां मंगल प्राप्त होतें. ( १३ ) तिथि चांगली असली ह्मणजे लक्ष्मी प्राप्त होते. वारामुळें ( वार चांगला असला ह्मणजे ) आयुष्य वाढतें. शुभ नक्षत्राच्या योगानें पाप नाहींसें होतें. शुभ योगानें रोग दूर होतो आणि शुभ करणानें कार्यसिद्धि होते. हीं पांचही अंगें ( तिथि, वार, नक्षत्र, योग व करण ) शुभ असलीं ह्मणजें उत्तम फळ मिळतें. ( १४ ) वृषभ, कुंभ, वृश्चिक, सिंह, मिथुन, कन्या, धनु, किंवा मीन ( १५ ) या राशी दीक्षेला योग्य होत ( या लग्नावर दीक्षा द्यावी. ) चर राशी वर्ज्य कराव्या. मकर, मेष, तूळ व कर्क या चरराशी होत. दीक्षेमध्यें या राशी वर्जाव्या ( या राशींच्या लग्नावर

येदेताः शेषेषु च समाचरेत् ॥ १५ ॥ बुधोदयं तु कुर्वीत शुक्रोदयमथापि वा ॥ गुरूदयं वा कुर्वीत त्यजेत्पापेन संयुतान् ॥ १६ ॥ अष्टमस्था ग्रहास्सर्वे नेष्टा द्वादशमे स्थिताः ॥ शुक्रे लग्नगते चास्ति केंद्रस्थानगते रवौ ॥ नश्यंति सकला दोषाः शंभुनैवमुदाहृतम् ॥ १७ ॥ दीक्षाकालः समाख्यातो देशश्चाप्यधुनोच्यते ॥ गंगायां यमुनायां च सरस्वत्यास्तटेऽथवा ॥ १८ ॥ तथा वृषद्वतीतीरे गोदावर्यामपांनिधौ ॥ कावेरी गौतमीतीरे वाप्यास्तीरे महावटे ॥ १९ ॥ पुण्यायतनतीर्थेषु नदीनां संगमेषु च ॥ भवनेषु च रम्येषु वनेषूपवनेषु च ॥ २० ॥ शिवक्षेत्रशिवारामसमीपे वा शुभे गृहे ॥ शिवालयसमीपे वा देशिकस्य मठेऽपि वा ॥ स्थानेष्वेतेषु हे गौरि शिवदीक्षां तु कारयेत् ॥ २१ ॥ पारमेश्वरतंत्रे ॥ अपूर्वदीक्षाकरणे विधिरेवमुदाहृतः ॥ यद्यवांतरदीक्षा चेत्सर्वकालो न संशयः ॥२२॥

इति दीक्षायां कालदेशनिर्णयो नाम त्रयोदशप्रकरणं समाप्तम् ॥

---

दीक्षा देऊं नये. ) बाकीच्या राशींवर दीक्षा द्यावी. ( १६ ) बुधाचा उदय असतांना, शुक्राचा उदय असतांना किंवा गुरूचा उदय असतांना हा दीक्षा संस्कार करावा. हेच ग्रह पापग्रहाशीं युक्त असतील तर ते वर्ज्य करावे. (१७) ( ज्या लग्नावर दीक्षा द्यावयाची त्या लग्नकुंडलींत ) अष्टमस्थानीं किंवा द्वादशस्थानीं सगळे ग्रह असतील तर अनिष्ट होय. लग्नीं शुक्र असेल आणि केंद्रांत रवि असेल तर सगळे दोष नाहींसे होतात, असें शंकरांनीं सांगितलें आहे. ( १८ ) याप्रमाणें दीक्षेचा काल सांगितला, आतां दीक्षेला योग्य देश ( जागा ) कोणता तो सांगतों. गंगेच्या, यमुनेच्या किंवा सरस्वतीच्या कांठीं, ( १९ ) किंवा वृषद्वतीच्या अगर गोदावरीच्या तीराला, अथवा समुद्राच्या कांठीं कावेरी किंवा गौतमीच्या तीरावर, विहिरीच्या कांठावर, वडाच्या झाडाखालीं, ( २० ) पुण्यस्थलीं, तीर्थांच्या ठिकाणीं, नद्यांच्या संगमांवर, सुंदर घरांत, वनांत, वागेंत, ( २१ ) शिवक्षेत्र किंवा शिवाराम यांच्या जवळ असलेल्या शुभ गृहांत, शिवाच्या देवळाजवळ, किंवा गुरूच्या मठांत, या ठिकाणीं, देवि, शिवदीक्षा द्यावी. ( पारमेश्वरतंत्र ) ( २२ ) अपूर्व अशी शिवदीक्षा द्यावयाची असल्यास हा विधि सांगितला आहे. अवांतर ( दुसरी कोणती ) दीक्षा असेल तर ती निःसंशय सर्वकाळ द्यावी ( कोणत्याही काळीं द्यावी. )

या प्रमाणें दीक्षेकरितां कालदेशनिर्णय नांवाचें हें तेरावें प्रकरण संपलें.

## वीरशैवप्रकाशिकावीरशैवकौस्तुभानुसारेण शिष्य-वर्गपुत्रवर्गसंप्रदायपट्टाभिषेकचरपतिलक्षणकथनं नाम चतुर्दशप्रकरणम्

ब्रह्मवेदस्तदध्येता ब्रह्मचारीति गीयते ॥ गुरुशुश्रूषणादेष शिष्य इत्यभिधीयते ॥ १ ॥ वंश्य आगन्तुकश्चेति द्विविधः शिष्य उच्यते ॥ मुख्यः सामान्य इत्येवं पुनर्वंश्यो द्विधा मतः ॥ २ ॥ ब्रह्मचारी गृही चेति द्विधा मुख्यो विभिद्यते ॥ उक्तलक्षणसंपन्नो ब्रह्मचारी पुनस्त्रिधा ॥ ३ ॥ पट्टाभिषेकवानाद्यः प्रोक्तश्चरपतिस्तथा ॥ निराभारस्तृतीयः स्यात्सर्वलोकेषु विश्रुतः ॥ संपाद्य शिष्यं स गुरुर्द्वितीयो विवहेत्पुनः ॥ ४ ॥ ( वीरशैवसिद्धान्तशिवागमसंग्रहे ) पूर्वोक्तपंचमानां तु नंदिभृंग्यादयो मताः ॥ गुरवस्तु ततस्तेषां द्वौ वर्गौ परिकीर्तितौ ॥ ५ ॥ शैष्यश्च पुत्रवर्गश्च क्रमाद्भेदः प्रकीर्तितः ॥ लिंगिनः पंचमा ज्ञेया इतरे लिंगधारिणः ॥ ६ ॥ अतः पंचमसंजातान्गृहीत्वा शिष्यपुत्रकान् ॥ वीरमाहेश्वरीं दीक्षां कृत्वा ते शिष्यवर्गिणः ॥ ७ ॥ पट्टाभिषेकयुक्तांश्च कुर्वन्ति चरवर्तिनः ॥ त एव

---

शिष्य विवरणः–( वीरशैवाचारकौस्तुभ ) ( १ ) ब्रह्मवेदाचें अध्ययन करणाराला ब्रह्मचारी ह्मणतात. गुरूची सेवा केली ह्मणजे त्यालाच शिष्य ह्मणतात. ( २ ) वंश्य आणि आगंतुक असे शिष्यांत दोन प्रकार आहेत. वंश्यांतही मुख्य आणि सामान्य असे दोन भेद आहेत. ( ३ ) पुनः मुख्याचे ब्रह्मचारी व गृहस्थ असे दोन भेद आहेत. या वर सांगितलेल्या लक्षणांच्या ब्रम्हचाऱ्याचे आणखी तीन भेद आहेतः ( ४ ) पहिल्याला पट्टाभिषेकाचा शिष्य म्हणतात. दुसरा चरपति व तिसरा सर्व लोकांत प्रसिद्ध असा निराभार होय. शिष्य केल्यानंतर त्या गुरूनें दुसऱ्या ( चरपतीनें ) लग्न करावें. ( वीरशैवसिद्धांतशिवागमसंग्रह ) ( ५ ) पूर्वी सांगितलेल्या पंचमांचे नंदी भृंगी वगैरे गुरु होत. ह्मणून त्या गुरूंचे दोन वर्ग झाले आहेत. ( ६ ) शिष्यवर्ग व पुत्रवर्ग असे हे क्रमानें दोन वर्ग होत. हे पंचम लिंगी होत. आणि बाकीचे लिंगधारी होत. ( ७ ) ह्मणून पंचमांपासून उत्पन्न झालेल्या शिष्यांच्या मुलांना आणून वीरमाहेश्वरदीक्षा देऊन त्या शिष्यांना ( ज्यांना अशी दीक्षा देण्यांत येते त्यांना ) ( ८ ) पट्टाभिषेकाचे अधिकारी आणि चरपति करण्यांत येतात. हेच वंद्य व पू-

वंद्याः पूज्याश्च नेतरे लिंगधारिणः ॥ ८ ॥ अतो गुरुपदप्राप्तिः श्रेष्ठान्पंचमसंज्ञकान् ॥ विहाय नास्ति नास्त्येवमन्येषां लिंगधारिणाम् ॥ ९ ॥ इति शिष्यवर्गसंप्रदायकथनम् ॥

## अथ पुत्रवर्गसंप्रदायः

इतःपरं प्रवक्ष्यामि व्यवस्थां पुत्रवर्गिणाम् ॥ गुरुस्थलसमाख्याता वीरमाहेश्वराभिधाः ॥ १० ॥ एते गुरुपदाध्यक्षा नान्ये लांछनधारिणः ॥ अतः स्ववंशजान् बालान् गृहीत्वा तान्वरानने ॥ ११ ॥ वीरमाहेश्वरीं दीक्षां कृत्वा ते पुत्रवर्गिणः ॥ पट्टाभिषेकयुक्तांश्च शंखमुद्रान्वितान्भुवि ॥ षट्स्थलज्ञानसंपन्नाः कुर्वन्ति चरसंज्ञकान् ॥ १२ ॥ व्यवहारपरा ये च ये सेवापरजंगमाः ॥ नास्ति तेषां महादीक्षा वीरमाहेश्वराभिधा ॥ १३ ॥ वीरशैवाभिधा दीक्षा तेषां तु नियता शिवे ॥ दीक्षान्ते पंचमुद्रा वै देयाः स्वासनमंतरा ॥ पंचमुद्रा वहन्तस्ते भिक्षुकाः परिकीर्तिताः ॥ १४ ॥ गुर्वासनवि-

---

जेला पात्र होत. दुसरे लिंगधारी नमस्काराला आणि पूजेला पात्र नाहींत. ( ९ ) ह्मणून गुरूची पदवी श्रेष्ठ अशा पंचमांवांचून दुसऱ्या कोणत्याही लिंगधाऱ्यांना मिळणें नाहीं. याप्रमाणें शिष्यवर्गाचा संप्रदाय सांगितला.

पुत्रवर्गाचा संप्रदाय–( १० ) या उपर पुत्रवर्गाची व्यवस्था सांगतों. गुरुस्थळीं जे असतात ( गुरु असे जे मानिले जातात ) त्यांना वीरमाहेश्वर ह्मणतात. ( ११ ) गुरु या पदवीचे हेच मुख्य अधिकारी होत. लिंगधारण करणारे दुसरे कोणीही या पदाचे अधिकारी होत नाहींत. ह्मणून, हें सुंदरि, आपल्या वंशांतील मुलांना घेऊन, ( १२ ) षट्स्थलांचें ज्ञान जाणणारे हे वीरमाहेश्वर त्यांना वीरमाहेश्वरदीक्षा देऊन शंखमुद्रेनें युक्त असे पट्टाभिषेकाधिकारी व चरपति ( जंगम ) करितात. ( १३ ) जे व्यापार करणारे आणि सेवा करणारे जंगम आहेत, त्यांना वीरमाहेश्वर नांवाची ही महादीक्षा देतां येत नाहीं. ( १४ ) पार्वति अशांना वीरशैव नांवाची दीक्षाच द्यावी ह्मणून ठरली आहे. दीक्षा दिल्यावर आपल्या आसनावांचून पंचमुद्रा द्याव्या. पंचमुद्रा धारण करितात ह्मणून त्यांना भिक्षुक ह्मणतात. ( १५ ) गुरूचें आसन मिळत नस-

हीनत्वान्नास्त्येषां च गुरोः पदम् ॥ कुण्डानां गोलकानां तु नास्ति दीक्षा वरानने ॥ १५ ॥ इति पुत्रवर्गसंप्रदायकथनम् ॥

अथ पट्टाभिषेकविवरणम्

वीरशैवप्रकाशिकायाम् ॥ पट्टाभिषेचनविधिं वक्तुमिच्छामि सांप्रतम् ॥ सिंहासनाधिपतिभिः शिखामुद्रादिसंयुतैः ॥ पंचमुद्रान्वितो भूत्वा गुरुः पट्टाभिषेचयेत् ॥ १६ ॥ पूर्वोक्तविधिना सम्यगुपदिष्टं स्वगोत्रजम् ॥ संविदित्वा यथाशास्त्रं कुर्यात्पट्टाभिषेचनम् ॥ १७ ॥ स्वशाखासूत्रगोत्रेषु कलशप्रवरादिषु ॥ जटाकाषायदण्डेषु चैकहीनो न पूज्यते ॥ १८ ॥ तस्मादेतल्लक्षणानि पूज्यानि च वरानने ॥ बहुभिः संमतो यस्तु गुरुत्वे निहितुं पुमान् ॥ पट्टाभिषिक्तो बहुभिः स पूज्यो भुवि नापरः ॥ १९ ॥ वीरशैवाचारकौस्तुभे ॥ अथ पट्टाभिषेकस्य वक्ष्ये लक्षणमादरात् ॥ उत्तराय-

---

ल्यामुळें यांना गुरूची पदवी मिळत नाहीं. सुंदरि, * कुंड व गोलक यांना कोणतीच दीक्षा नसते या प्रमाणें पुत्रवर्गसांप्रदाय सांगितला.

पट्टाभिषेकाचें विवरणः–( वीरशैव प्रकाशिका ) ( १६ ) आतां पट्टाभिषेकाचा विधि सांगण्याची माझी इच्छा आहे. शिखा मुद्रा वगैरे ज्यांना असतात अशा सिंहासनाधिपतींकडून पंचमुद्रा घेऊन त्या धारण करून गुरूनें पट्टाभिषेक करावा. ( १७ ) पूर्वीं सांगितलेल्या विधीनें ज्याला उत्तम प्रकारचा उपदेश झाला आहे, अशा आपल्या गोत्रजाला जाणून शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें त्याला पट्टाभिषेक करावा. ( १८ ) आपली शाखा, सूत्र, गोत्र, कलश, प्रवर इत्यादिक, जटा, काषाय, व दण्ड यांपैकीं एखादें ही लक्षण ज्याच्यामध्यें उणें असेल, तो पूज्य होत नाहीं. ( १९ ) ह्मणून, हे सुंदरि, हीं लक्षणें पूज्य आहेत ( या लक्षणांकडे मुख्य लक्ष्य दिलें पाहिजे. ) ज्या पुरुषाला गुरुपदावर नेमणें पुष्कळांना मान्य आहे व पुष्कळजण मिळून ज्याला पट्टाभिषेक करितात, तोच पृथ्वीवर पूज्य होय, त्यावांचून दुसरा कोणी पूज्य नाहीं. (वीरशैवाचार कौस्तुभ) ( २० ) आतां पट्टाभिषेकाचें लक्षण आदरानें सांगतों. उत्तरायणांत शुभ दिवशीं

---

* अमृते जारजः कुंडो मृते भर्तरि गोलकः ॥

अर्थः–भर्ता जिवंत असतां जारापासून झालेल्या संततीला कुंड ह्मणतात; आणि भर्ता वारल्यानंतर जारापासून झालेल्या संततीला गोलक ह्मणतात.

णपुण्येऽन्हि चंद्रतारानुकूलतः ॥ शुभलग्ने शुभे वारे कुर्यात्पट्टाभिषेचनम् ॥ २० ॥ प्राग्भागे मंदिरस्याथ गोमयेनोपलेपिते ॥ मण्डलं चतुरस्रं तु वर्णकैः समलंकृतम् ॥ २१ ॥ तत्र भद्रासनं सम्यगर्चयेत्सुमनोहरम् ॥ सभासद्भ्योऽथ सद्भक्त्या भस्म तांबूलमर्पयेत् ॥ २२ ॥ यथाशक्त्या दक्षिणाभिस्तदनुज्ञामुपार्जयेत् ॥ गंगातोयेन संपूर्णस्वर्णकुंभैरनेकशः ॥ २३ ॥ दिग्विदिक्षु स्थितैः शुक्लगंधमाल्यांबरार्चितैः ॥ शतौषधिमूलरत्नहेमसोद्भिज्यपल्लवैः ॥ २४ ॥ मृत्तिकावृषशृंगे तु गजदन्तश्च रोचनम् ॥ उत्पलं पद्मकं गंधं मुरारेणुश्च कुंकुमम् ॥ २५ ॥ राजसर्षपमुस्ते च देवदारुसमन्विते ॥ एतानि मंगलद्रव्याण्युदकुंभेषु निक्षिपेत् ॥ २६ ॥ देवस्यत्वेति मंत्रेण आयुः पुष्टियशःस्करैः ॥ अब्लिंगैर्वेदमंत्रैश्च शुभलग्ने शुभान्विते ॥ भद्रासनस्थयतिना अभिषेकं च कारयेत् ॥ २७ ॥ पंचब्रह्ममयैः पंचकलशैः सम्यगर्चितैः ॥ ऋत्विग्भिर्वेदमंत्रैश्च कुर्यात्तत्राभिषेचनम् ॥ २८ ॥ ततः पंचामृतैर्नानाफलपंचामृतादिभिः ॥ संप्रदायानुरोधेन देशिकं पूजयेत्क्रमात् ॥ २९ ॥ शुक्लमाल्यांबरधरः

---

चंद्र तारा अनुकूल असतील तेव्हां, शुभ लग्नावर व शुभ वारीं पट्टाभिषेक करावा. ( २१ ) मंदिर शेणानें सारवून त्याच्या पूर्वदिशेला रंग देऊन चतुष्कोण मंडल करावें. ( २२ ) तेथें सुंदर असें पट्टासन घालून त्याची पूजा करावी. सभासदांना भक्तीनें भस्म व विडा द्यावा. ( २३ ) आपली शक्ति असेल त्याप्रमाणें त्यांना दक्षिणा देऊन त्यांची संमति घ्यावी. गंगेच्या पाण्यानें भरलेल्या अनेक घागरी ( २४ ) वेगवेगळ्या दिशेला ठेवून शुभ्र गंध, फुलें व वस्त्रें यांनीं त्यांची पूजा करावी. शंभर औषधींच्या मुळ्या, रत्न, सोनें, झाडांचीं पानें, ( २५ ) माती, बैलाचें शिंग, हस्तिदंत, रोचन पांढरें कमळ, तांबडें कमळ, गंध, मुरारेणु, कुंकु, ( २६ ) पांढऱ्या मोहऱ्या मोथे व देवदारु हीं मंगलद्रव्यें या भरलेल्या घागरींत टाकावीं. ( २७ ) ' देवस्य त्वा ' या मंत्रानें आणि ' अब्लिंग० ' या आयुष्य व पुष्टि देणाऱ्या वेदमंत्रांनीं शुभलग्नावर शुभवेळीं पट्टासनावरील यतीकडून अभिषेक करवावा. ( २८ ) पंचब्रह्ममय अशा पूजिलेल्या पंचकलशांनीं ऋत्विजांनीं वेदमंत्र म्हणत हा अभिषेक करावा. ( २९ ) मग क्रमानें पंचामृतांनीं व अनेक फल पंचामृतादिकानें संप्रदायाप्रमाणें देशिकाची पूजा करावी. (३०) नंतर पांढऱ्या फुलांची माळ घालून व पांढरें वस्त्र नेसून त्या शिष्यानें

प्राङ्मुखस्य गुरोस्ततः ॥ पट्टं शिरसि बध्नीयात् सिंहासनगतस्य च ॥ ३० ॥ नीराजनाशीर्वादैश्च मंगलाचारमाचरेत् ॥ माहेश्वरान्यथायोगं भोजयेत् षड्रसैरपि ॥ ३१ ॥ लैंगेऽपि ॥ काहलाशंखभेर्यादिनिःस्वनैरतिशोभनैः ॥ स्त्रीशोभनारवैर्दिव्यैर्वेदघोषैः सुशोभनैः ॥ ३२ ॥ सेचयेत्कूर्चतोयेन प्रोक्षयेद्वा महेश्वरम् ॥ रुद्राध्यायेन विधिना रुद्रभस्मालिके धरेत् ॥ ३३ ॥ शंखचामरभेर्यादीन् छत्रं चंद्रसमप्रभम् ॥ शिविकां वैजयंतीं च किरीटं सिंहविष्टरम् ॥ पट्टाभिषेकयुक्ताय महेशाय समर्पयेत् ॥ ३४ ॥ वीरशैवप्रकाशिकायाम् ॥ पट्टोपदेशयोर्मध्ये प्रबलो दुर्बलश्च कः ॥ एतद्विस्तार्य भगवन्वक्तुमर्हसि सांप्रतम् ॥ ३५ ॥

ईश्वर उवाच

उत्तमः पट्टबद्धः स्यादुपदिष्टस्ततोऽधमः ॥ उपदिष्टः परो नान्यद्भुवि पट्टाभिषेकतः ॥ तस्माद्दीक्षापट्टबद्धो गुरुरेव न संशयः ॥३६॥

---

सिंहासनावर वसलेल्या गुरूच्या समोर तोंड करून आपल्या डोकीला पट्ट बांधावें (३१) मग नीराजन आणि आशीर्वाद झाल्यानंतर मंगलाचार आचरावा. योग्यतेप्रमाणें माहेश्वरांना षड्रस भोजन घालावें. (लिंगपुराण) (३२) काहल, शंख, नगारे इत्यादि वाद्यांच्या आनंददायक ध्वनींमध्यें, स्त्रियांच्या मंजुळ गाण्यांनीं आणि दिव्य वेदघोषानें (३३) (ज्याला पट्टाभिषेक करावयाचा असेल त्या) माहेश्वरावर दर्भकूर्चानें उदक घालावें किंवा शिंपडावें. रुद्राध्यायानें (रुद्र मंत्रानें) विध्युक्तरीतीनें त्यानें रुद्राक्ष व भस्म धारण करावें. (३४) शंख, चामर (चवऱ्या) भेरी (नगारे) इत्यादि चिन्हें चंद्रासारखें तेजस्वी छत्र, पालखी, पताका, मुकुट आणि सिंहासन ह्या वस्तु ज्याचा पट्टाभिषेक करण्यांत येतो त्या माहेश्वराला अर्पण कराव्या (वीरशैव प्रकाशिका) (३५) 'भगवन्, ज्याला पट्टाभिषेक झाला आहे तो, आणि ज्याला उपदेश झाला आहे तो, या दोघांत कसी अधिक योग्यतेचा कोण? हें मजला आतां कृपा करून सविस्तर सांगावें.' ईश्वर म्हणतात-(३६) 'पट्टाभिषेक ज्याला होतो तो उत्तम (अधिक योग्यतेचा) होय, आणि ज्याला उपदेश देण्यांत येतो तो त्याहून कमी योग्यतेचा होय. पट्टाभिषिक्त माहेश्वरापेक्षां उपदेश पावलेला माहेश्वर केव्हांही श्रेष्ठ होणार नाहीं. ह्मणून दीक्षेनें ज्याचा पट्टाभिषेक होतो तोच गुरु होय यांत संशय नाहीं.'

पार्वत्युवाच

अन्यशाखाप्रसूतस्य दीक्षितस्यापि शंकर ॥ गुरोः पीठाधिकारस्तु भवेद्वा न कथं वद ॥ ३७ ॥ गोत्रादिलक्षणैर्युक्तं गुरुत्वेन प्रतिष्ठितम् ॥ हित्वाऽन्यं भजते यस्तु तस्य किं वा फलं वद ॥ ३८ ॥

ईश्वर उवाच

अन्यशाखाप्रसूतस्य यस्यान्यत्रोपदेशतः ॥ गुरोः पीठाधिकारस्तु नास्ति जन्मशतैरपि ॥ ३९ ॥ स्वशाखासु प्रसूतस्य यस्यान्यत्रोपदेशतः ॥ न तस्य गुरुपीठादावधिकारस्तु शस्यते ॥ ४० ॥ अन्यशाखाप्रसूतस्य स्वशाखोक्तविधानतः ॥ यदि दीक्षा भवेत्तस्य गुरोः पीठं तु गौणतः ॥ ४१ ॥ स्वशाखासु प्रसूतस्य स्वशाखोक्तविधानतः ॥ यस्य दीक्षा भवेत्सैव मुख्यतो गुरुरुच्यते ॥ ४२ ॥ तस्यैव गुरुपीठादावधिकारः प्रशस्यते ॥ पट्टबंधनमे-

---

पार्वति ह्मणते— ( ३७ ) 'हे शंकरा, दीक्षा जरी घेतली तथापि ( जो दीक्षा घेणारा ) दुसऱ्या शाखेंत उत्पन्न झाला असेल, तर गुरुपीठाचा तो अधिकारी होईल किंवा कसें? तें सांगावें. ( ३८ ) किंवा गोत्र वगैरे ( मागें सांगितलेलीं ) लक्षणें ज्याचे ठिकाणीं आहेत व जो गुरु मानला गेला आहे, त्या गुरूला सोडून जो दुसऱ्या गुरूला भजतो ( दुसऱ्याजवळ उपदेश घेऊन त्याची गुरु ह्मणून सेवा करितो ) त्याला काय फळ मिळतें? तें सांगावें.' ईश्वर ह्मणतात–'( ३९ ) दुसऱ्या शाखेंत उत्पन्न होऊन जो दुसऱ्याचा उपदेश घेतो त्याला शंभर जन्मांनींही गुरुपीठाचा अधिकार ( ज्या शाखेंत तो उत्पन्न झाला नाहीं व ज्या शाखेंतील गुरूपासून त्यानें उपदेश घेतला नाहीं, त्या शाखेंतील गुरुपीठाचा अधिकार ) मिळत नाहीं. ( ४० ) आपल्या शाखेंत उत्पन्न होऊनही दुसऱ्याकडून ( दुसऱ्या शाखेंतलि गुरूकडून ) उपदेश मिळाला असेल तर त्याला गुरुपीठाचा ( ज्या शाखेंत तो उत्पन्न झाला आहे त्या शाखेंतील गुरुपीठाचा ) अधिकार पोहोंचत नाहीं. ( ४१ ) दुसऱ्या शाखेंत उत्पन्न होऊनही आपल्या शाखेंतील विधीप्रमाणें एखाद्याला दीक्षा देण्यांत आली असेल, तर त्याला गौणत्वानें ( या शेवटील शाखेंतील ) गुरूपीठाचा आधिकार येतो ( ४२ ) आपल्या शाखेंत जो उत्पन्न झाला आहे आणि आपल्या शाखेंतील विधीप्रमाणें ज्याला दीक्षा मिळाली आहे तोच त्या शाखेचा मुख्यत्वेंकरून गुरु ह्मणवितो, ( ४३ ) आणि गुरुपीठावर त्याचाच पूर्ण अधिकार पोहोंचतो. ए-

कस्य कृत्वा कालान्तरे यदि ॥ ४३ ॥ तदन्यस्य स्वगोत्रस्य त्वन्यगोत्रस्य वा पुनः ॥ ये पट्टबन्धं (द्धं) कुर्वन्ति ते यान्त्यन्धतमं ध्रुवम् ॥ ४४ ॥ यस्तु मोहादहंकारात्प्रमादाद्धनदानतः ॥ पुनः पट्टं प्रबध्नाति स याति नरकं ध्रुवम् ॥ ४५ ॥ प्राक्तनं गुरुमुत्सृज्य यश्च गुर्वन्तरं व्रजेत् ॥ गुरुरन्यश्च शिष्योऽपि भुंजाते नरकं ध्रुवम् ॥ ४६ ॥ तस्मात्पूर्वं पट्टबद्धः स पूज्यो भुवि नापरः ॥ पूर्वस्मिन्पट्टबद्धो यो बहूनामपि संमतः ॥ ४७ ॥ स एव लोके पूज्यः स्याद्दर्शनं तस्य मुक्तिदम् ॥ पादस्पर्शनमेतस्य तीर्थस्नानफलं भवेत् ॥ ४८ ॥ तेनैव सह सल्लापः पंचाक्षरजपो भवेत् ॥ अतः पूर्वं पट्टबद्धः सर्वेषामुत्तमो भवेत् ॥ ४९ ॥ अतस्तद्गोत्रसंजातशिष्यास्तं परिपूजयेत् ॥ अपूजयित्वा तच्छिष्यो नरकानेव विंदते ॥ ५० ॥ कदाचित्तं विहायाथ सेवन्ते ये द्वितीयकम् ॥ ते सर्वे नरकं यान्ति यावच्चंद्रदिवाकरौ ॥ ५१ ॥ स्वयमेवाभिषिक्तो यः पूर्वपट्टादनंतरम् ॥

---

काला पट्टाभिषेक केल्यावर कांहीं काळानें जर (४४) त्या शिवाय दुसऱ्या कोणा स्वगोत्रजाला किंवा अन्य गोत्रजाला जे कोणी पट्टाभिषेक करितील तर ते खरोखर नरकाला जातील. (४५) जो मोहानें, गर्वानें, आपल्या दुर्लक्ष्यानें किंवा पैशाच्या लालचीनें पुनः पट्टाभिषेक करितो, तो खरोखर नरकांत पडतो. (४६) पूर्वीच्या गुरूला सोडून देऊन जो दुसऱ्या गुरूकडे जातो, तो शिष्य आणि तो दुसरा गुरु हे दोघेही खरोखर नरकांत जातील. (४७) ह्मणून पूर्वी ज्याचा पट्टाभिषेक झाला असेल तोच पृथ्वीवर पूज्य होय. त्यावांचून दुसरा कोणी पूज्य नाहीं. ज्याचा आधींच पट्टाभिषेक झाला असेल आणि जो पुष्कळांना मान्य असेल, (४८) तोच जगांत पूज्य होतो. त्याचें दर्शन घेतल्यानें मुक्ति मिळेल, त्याच्या पायांला स्पर्श केला (नमस्कार केला) ह्मणजे तीर्थस्नानाचें फळ मिळेल, (४९) आणि त्याच्याशीं गोड बोलल्यानें पंचाक्षरीमंत्राचा जप केल्याचें श्रेय येईल. ह्मणून पूर्वी ज्याचा पट्टाभिषेक होतो, तो सर्वांमध्यें उत्तम होय. (५०) यास्तव त्याच्या गोत्रांतील शिष्यांनीं त्याचीच सेवा करावी. त्याचा जो शिष्य त्याची सेवा करणार नाहीं तो नरकांत जाईल. (५१) जे शिष्य त्याला सोडून केव्हांही दुसऱ्याकडे जातात. ते सगळे यावच्चंद्रदिवाकर (चंद्र सूर्य असेपर्यंत) नरकांत पडतात. (५२) पूर्वी एकाचा पट्टाभिषेक झाल्यानंतर त्याची संमति नसतांना जो पुनः आपल्याला पट्टाभिषेक करवून घेतो

असंमतश्च पूर्वस्य स याति नरकं ध्रुवम् ॥ ५२ ॥ द्वितीयपट्टव-द्धस्य यदि संदर्शनं भवेत् ॥ श्वानयोनिशतं प्राप्य पश्चाद्रौरव-मश्नुते ॥ ५३ ॥ पूर्वं प्रतिष्ठितं लिंगं बिल्ववृक्षमथापि वा ॥ छेदि-तॄणां तु यत्पापं तत्पापं लभते नरः ॥ ५४ ॥ इति पट्टाभिषेक-विधिः समाप्तः ॥

## अथ चरपतिविधानम्

अतःपरं प्रवक्ष्यामि चिन्हं चरपतेः क्रमात् ॥ कुलीनं सत्यसंधानं सर्वलक्षणसंयुतम् ॥ ५५ ॥ शिवसिद्धान्ततंत्रज्ञं गुरुक्रमसमन्वि-तम् ॥ लक्षणैस्तं परीक्षेत बहुशः शास्त्रकोविदः ॥ ५६ ॥ ततः श्रीभस्मतांबूलं दक्षिणां च यथाक्रमम् ॥ महेशेभ्यः प्रदत्वाऽथानुज्ञां प्राप्य महामतिः ॥ ५७ ॥ संस्नाप्य कलशोदैस्तु फलपल्लवसंयुतैः ॥ पंचब्रह्ममयैः सम्यगौषधीभिः सुपाचितैः ॥ रुद्राध्यायेन चाब्लि-गैर्मन्त्रैर्मंत्रपरायणः ॥ ५८ ॥ अलंकुर्याद्यथाशक्ति वस्त्रहेमांगुली-यकैः ॥ उपवेश्य च पीठादौ पूजादिकमथाचरेत् ॥ ५९ ॥ ततः शंखद्वयं सर्वलक्षणैश्च समन्वितम् ॥ संपूज्य विधिवद्भक्त्या दण्ड-

---

तो स्वतः अक्षय नरकाला जातो. ( ५३ ) दुसऱ्यानें पट्टाभिषिक्त झालेल्या म-नुष्याचें दर्शन झाल्यास, दर्शन घेणारा मनुष्य शंभर वेळां कुत्र्याचा जन्म पा-वून नंतर रौरवनरकाला जातो, ( ५४ ) आणि एकदां स्थापिलेल्या लिंगाचा किंवा बिल्ववृक्षांचा उच्छेद करणाऱ्याला जें पातक लागतें तें त्या मनुष्याला लागतें.' येथें पट्टाभिषेकविधि संपला.

चरपतिविधानः—( ५५ ) यापुढें क्रमानें चरपतीचें लक्षण सांगतों. कुलीन, सत्यानें वागणारा, सर्व लक्षणांनीं युक्त, ( ५६ ) शैवसिद्धान्ताचीं तंत्रें जाण-णारा व गुरुपरंपरेनें आलेला अशा पुष्कळ लक्षणांच्या मनुष्याची परीक्षा करून शास्त्रें जाणणाऱ्या गुरूनें ( ५७ ) नंतर विभूति व विडा रीतीप्रमाणें माहेश्वरांना देऊन त्यांची संमति घ्यावी. ( ५८ ) उत्तम औषधि ज्यांत घातल्या आहेत व फळें आणि पानें ज्यांत ठेविलीं आहेत अशा पंचब्रह्ममय कलशांतील पाण्यानें रुद्र व अब्लिंग मंत्र म्हणत त्याला स्नान घालावें. ( ५९ ) वस्त्रें सोन्याच्या अं-गठ्या वगैरे अलंकार यथाशक्ति त्याच्या अंगावर घालून पीठावर बसवून त्याची पूजा वगैरे करावी. ( ६० ) त्या प्रमाणेंच उत्तम लक्षणांचे दोन शंख, दंड व

पात्रे तथा गुरुः ॥ ६० ॥ संप्रदायानुसारेण शिक्षयेत्तं प्रयत्नतः॥ शिवोत्कर्षं वीरशैवमतं स्वाचारमुत्तमम् ॥ ६१ ॥ स्थापय त्वं यथाशास्त्रं चरमूर्तीन्प्रतोषय ॥ संचारं कुरु सर्वत्रेत्यादिश्य गुरुरादरात् ॥ ६२ ॥ ततः शंखद्वयं दण्डं पात्रं चोध्दृत्य मंत्रतः ॥ दद्यात्तस्मै महेशानैरनुज्ञातो महामतिः ॥ ६३ ॥ आशीर्वादं ततः कुर्याद्वीरमाहेश्वरांस्तथा ॥ भोजयेच्च यथाशक्ति वित्तशाठ्यं न कारयेत् ॥ ६४ ॥ इत्येवं दीक्षितस्यादौ चरपत्यस्य लक्षणम् ॥ गदितं गृहिणां लक्ष्म वेदितव्यं त्वया क्रमात् ॥ ६५ ॥

इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे वीरशैवप्रकाशिकावीरशैवकौस्तुभानुसारेण शिष्यवर्गपुत्रवर्गसंप्रदायपट्टाभिषेकचरपतिलक्षणकथनं नाम चतुर्दशप्रकरणं समाप्तम् ॥

---

पात्र यांची गुरूनें विधिपूर्वक पूजा करावी. ( ६१ ) ही पूजा आपल्या संप्रदायाला अनुसरून करावी. मग त्याला सांगावें कीं, ' शिवभक्तीचा उत्कर्ष, वीरशैवमत आणि आपला उत्तम आचार यांची ( ६२ ) यथाशास्त्र स्थापना कर. जंगमांना संतुष्ट कर, व सर्व ठिकाणीं संचार कर ' अशी गुरूनें निक्षून आज्ञा करावी, ( ६३ ) नंतर ते दोन्ही शंख, दंड व पात्र हीं उचलून माहेश्वराची संमति घेऊन बुद्धिवान् गुरूनें तीं मंत्र ह्मणत त्याला द्यावीं, ( ६४ ) व आशीर्वाद द्यावा. मग पैसे खर्चण्यांत लवाडी न करितां माहेश्वरांना यथाशक्ति भोजन घालावें. ( ६५ ) ज्याची प्रथम दीक्षा झालेली असते त्या चरपतीचें याप्रमाणें लक्षण सांगितलें, गृहस्थाचें लक्षण क्रमानें जाण.

याप्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील वीरशैवप्रकाशिका व वीरशैवकौस्तुभ यांना अनुसरून लिहिलेलें ' शिष्यवर्ग व पुत्रवर्ग यांचा संप्रदाय व पट्टाभिषेक आणि चरपतिलक्षण ' नांवाचें चवदावें प्रकरण संपलें.

---

# अथ निराभारिस्थलस्थस्वयचरपरलक्षणकथनं नाम पंचदशप्रकरणम्

## अथ निराभारिलक्षणम्

सुप्रभेदागमे ॥ यः शंभुः सर्वलोकानां मुक्त्यर्थं धरणीतले ॥ चरत्यतिथिरूपेण नमस्तस्मै चरात्मने ॥ १ ॥

देव्युवाच

भगवंस्त्वन्मुखादेव गुरोर्लिंगस्य लक्षणम् ॥ श्रुत्वा तद्द्वयमाहात्म्यमहं धन्याऽभवं विभो ॥ २ ॥ इदानीं चरमाहात्म्यं तच्चिन्हं तस्य गौरवम् ॥ तदाचारविधिं श्रोतुं ममेच्छा वर्तते विभो ॥ कृपया केवलं नाथ वद कारुण्यसागर ॥ ३ ॥

ईश्वर उवाच

सम्यक्पृष्टं त्वया गौरि साधु सन्मति मत्प्रिये ॥ वक्तुं तच्चरमाहात्म्यं कल्पकोटिशतैरपि ॥ ब्रह्मादीनां च सर्वेषामशक्यं मम तु प्रिये ॥ ४ ॥ तथापि त्वन्मुदे देवि संक्षेपेण वदाम्यहम् ॥ गोपनीयं प्रयत्नेन मंत्रवत्प्राणवल्लभे ॥ ५ ॥ जंकाराज्जननं दूरं गकाराद्गतिनाशनम् ॥ मकारान्मरणं नष्टं जंगमस्त्र्यक्षरात्मकः ॥ ६ ॥

---

निराभारिलक्षण:—( १ ) ( सुप्रभेदागम ) सर्व लोकांना मुक्ति देण्याकरितां जो शंभु अतिथिरूपानें या पृथ्वीतलावर संचार करितो, त्या चरात्मक ( जंगमरूपी ) शंभूला नमस्कार असो. देवी म्हणाली–( २ ) ' भगवन् , आपल्या मुखानेंच गुरूचें व लिंगाचें लक्षण आणि त्या दोहोंचें माहात्म्य ऐकून मी धन्य झाल्यें. प्रभो, ( ३ ) आतां जंगमाचें माहात्म्य, त्याचें लक्षण, त्याचें श्रेष्ठत्व व त्याचा आचारविधि ऐकण्याची माझी इच्छा आहे. ह्मणून हे प्रभो, हे दयासागरा, हे नाथा, तें सगळें कृपा करून स्पष्ट सांगावें. ' ईश्वर ह्मणतात–'( ४ ) शाबास प्रिये! तूं बुद्धिमान् आहेस. गौरि, तूं चांगलें विचारिलेंस. प्रिये, ब्रह्मा वगैरे देवांना व मला तें जंगमांचें माहात्म्य कोट्यवधि कल्पांपर्यंतही सांगतां येणें अशक्य आहे. ( ५ ) तथापि, हे देवि, तुझ्या संतोषाकरितां मी संक्षेपानें सांगतों. प्राणवल्लभे, मंत्राप्रमाणें हें माहात्म्य गुप्त ठेवावें. ( ६ ) ' जं ' जन्म दूर करणारा, ' ग ' संसारांत सांपडण्याची गति नाहींशी करणारा व ' म ' मरणाचा नाश करणारा. याप्रमाणें तीन अक्षरांचा मिळून जंगम शब्द झाला आहे.

यस्य नास्ति पुनर्जन्म गतिर्नास्ति कदाचन ॥ बाधते यं न मरणं शृणु नाथे स जंगमः ॥ ७ ॥ जरामरणशून्यत्वाद्गमागमनवर्जनात् ॥ मनुष्याचाररहित्याज्जंगमोऽयमुदाहृतः ॥ ८ ॥ निरालंबो निर्विकल्पः कर्मपाशविवर्जितः ॥ निःशून्यो निष्कलः साक्षाज्जंगमः स परः स्मृतः ॥ ९ ॥ गुणातीतः क्रियातीतः कलातीतश्चिरंतनः ॥ तत्वातीतः परः साक्षाज्जंगमः शृणु मत्प्रिये ॥ १० ॥ निर्मोही निष्प्रियः शून्यः सत्वादिगुणवर्जितः ॥ निराभारी निष्प्रपंचः सच्चिदानंदलक्षणः ॥ ११ ॥ शुद्धदेहः शुद्धमनाः शुद्धभावः शिवात्मकः ॥ शुद्धबुद्धिः शुद्धगतिः शुद्धानां शुद्धिदायकः ॥ १२ ॥ सदसद्वस्तुरहितः सत्यासत्यविवर्जितः ॥ कर्माकर्मविनिर्मुक्तश्चरः साक्षान्निरंजनः ॥ १३ ॥ स्वयश्चरः पर इति जंगमेऽस्मिन्निरंजने ॥ अस्ति भेदत्रयं सम्यग्ज्ञातव्यं वल्लभे त्वया ॥ १४ ॥

---

( ७ ) प्रिये, ऐक. ज्याला पुनः जन्म नाहीं, ज्याला कधींही गति ( संसारांत फिरणें ) नाहीं व ज्याला मरणाची बाधा होत नाहीं, तो जंगम होय. ( ८ ) प्रपंचांतील ज्ञातारपण व मरण यांच्या अभावामुळें जाणें येणें यांपासून दूर असल्यामुळें व मानवी आचारांपासून वेगळा असल्यामुळें याला जंगम ह्मणतात. ( जंगमाला ज्ञातारपण नाहीं व मरण नाहीं, प्रपंचाच्या फेऱ्यांत तो सांपडत नाहीं व मानवी आचारांपासून तो वेगळा आहे. हीं लक्षणें असतात ह्मणून त्याला जंगम ह्मणतात. ) ( ९ ) जंगम हा स्वतंत्र, विकल्परहित, कर्मपाशांत न सांपडणारा, निःशून्य ( शून्या पलीकडचा ) व अखंड असा साक्षात् परमात्माच आहे. ( १० ) प्रिये, ऐक. गुणांच्या पलीकडचा, क्रियेहून वेगळा असणारा, भेदाहून अतीत, शाश्वत व तत्वांपासून भिन्न असणारा, साक्षात् परमात्माच जंगम होय. ( ११ ) मोहरहित, निष्प्रिय, शून्य, सत्वादि गुणांपासून अलिप्त, निराभारी, प्रपंचापासून वेगळा राहिलेला, सत् चित् व आनंद या लक्षणांचा, ( १२ ) पवित्र शरीराचा, शुद्धमनाचा, शुद्धभावाचा, शिवस्वरूपी, शुद्धबुद्धीचा, शुद्धगतीचा, शुद्धवस्तूंना शुद्ध करणारा, ( १३ ) चांगलें व वाईट या दोहों पलीकडचा, खरें व खोटें यांपासून भिन्न असलेला व कर्म आणि अकर्म यांपासून वेगळा राहणारा हा जंगम प्रत्यक्ष निरंजन ( परमात्माच ) होय. (१४) या निरंजन जंगमाचे स्वय, चर व पर, असे तीन भेद आहेत. प्रिये, ते तूं नीट समजून घे.

देव्युवाच

स्वामिन्सत्करुणावार्धे तस्य भेदत्रयस्य च ॥ लक्षणं श्रोतुमिच्छामि वद सत्कृपया विभो ॥ १५ ॥

ईश्वर उवाच

साधु साधु महाभागे सम्यक्पृष्टं त्वयाऽधुना ॥ ज्ञातुं शक्यं न सर्वेषामिदं तेऽद्य वदाम्यहम् ॥ १६ ॥ अंगीकृत्य सदाचारं धृत्वा जंगमलक्षणम् ॥ ज्ञात्वा सद्धर्ममखिलं भूत्वा सुज्ञानवान्शुचिः ॥ १७ ॥ त्यक्त्वा दुष्कर्मनिचयं मुक्त्वा दौर्जन्यलक्षणम् ॥ हित्वा दुष्टमतिं शास्त्रं मत्वा सद्वेदशैवकम् ॥ १८ ॥ मठमेकं समाश्रित्य कृत्वा सल्लिंगपूजनम् ॥ तत्पुरस्थितसद्भक्तगृहे भिक्षामटन्मुदा ॥ १९ ॥ तद्भिक्षार्जितसद्द्रव्येष्वास्थां हित्वा निरंतरम् ॥ सावधानमनाः सम्यक्सत्यज्ञानपरो भवेत् ॥ २० ॥ गतागतेशभक्तानां चराणामौपचारकम् ॥ कुर्वन्यो वसते नित्यं स एव स्वयजंगमः ॥२१॥

अथ चरजंगमलक्षणम्

षट्स्थलाचारसंपत्तिं धृत्वा हित्वाऽष्टदुर्मदान् ॥ षड्वर्गविक्रि-

---

देवी ह्मणते—'( १५ ) हे नाथा, हे दयासागरा, त्या तिन्ही भेदांचें लक्षण ऐकण्याची माझी इच्छा आहे तर प्रभो, कृपा करून तें सांगावें. ईश्वर ह्मणतात—'( १६ ) शाबास! शाबास! महाभागे, त्वां आतां चांगला प्रश्न केला. जें कोणालाही समजणें शक्य नाहीं, तें मी आज तुला सांगतों. (१७) सदाचाराचा अंगीकार करून जंगमाच्या चिन्हाचें धारण करून आपला श्रेष्ठ धर्म सगळा जाणून ज्ञानी व पवित्र व्हावें. ( १८ ) सर्व वाईट कर्मांचा त्याग करावा. दुर्जनपणाचें लक्षण टाकून द्यावें. वाईट बुद्धि सोडून वेदाचें व शैवशास्त्रांचें मनन करावें, ( १९ ) एका मठांत राहून लिंगपूजा करावी. त्या गांवांतील सद्भक्तांच्या घरीं आनंदानें भिक्षा मागावी. ( २० ) त्या भिक्षेंत मिळालेल्या द्रव्यावरील आस्था सोडून निरंतर सावधमनानें सत्यज्ञानांतच चांगलें गढून जावें. ( २१ ) आल्या गेलेल्या ईश्वरभक्तांचा आदरसत्कार करावा. या प्रमाणें जो नित्य वर्तन करीत असतो तो स्वयजंगम होय. आतां चरजंगम लक्षण—( २२ ) षट्स्थलाचाररूपी संपत्तीचें ग्रहण करून ( षट्स्थलाचारानें वागून ) आठ प्रकारचा मद टाकावा. षड्वर्गांच्या दुष्टक्रियांचा त्याग करून ष-

-र्यां त्यक्त्वा कृत्वा षट्कर्मभंजनम् ॥ २२ ॥ षडूर्मिकचयं नीत्वा भित्वा षड्भ्रमणोन्मदम् ॥ षडक्षरमनुं जप्त्वा भूत्वा तद्वन्निरंजनः ॥ २३ ॥ पंचाक्षरमनुं ध्यात्वा पंचक्लेशान्विपाटयन् ॥ वंचयन् वंचतां सम्यग्ज्ञानं संपत्तिवैभवात् ॥ २४ ॥ मलत्रयतरुं छित्वा धुलीकुर्वन्मदाचलम् ॥ छिंदन्पाशाष्टकलतां भिंदन् व्यसनसप्तकम् ॥ २५ ॥ वीरमाहेश्वराचारसंपद्वृद्धिं दिने दिने ॥ पालयित्वा प्राणसमं कायवाङ्मानसैः परम् ॥ २६ ॥ शैवानुभावकं शास्त्रमंगीकृत्य पुराश्रयम् ॥ तदेवाखिलशिष्याणामुपदिश्य दिने दिने ॥ २७ ॥ तदन्तःस्थमलं क्षाल्य कृत्वा तानखिलान् शुचीन् ॥ तैः समं निखिलान् देशान्संचरन् शुद्धभावतः ॥ २८ ॥ तद्देशस्थमहाभक्तनिवहैः कृतपूजनम् ॥ स्वीकुर्वन्मोदतोऽबाधं पावयंस्तान्महाजनान् ॥ २९ ॥ कांश्चिद्दर्शनमात्रेण कांश्चिदंघ्रिसमीलनात् ॥ हस्तस्पर्शनतः कांश्चित्पावयन्प्रणिनोयने ( प्रणतान् जनान् ) ॥ ३० ॥ एवं रीत्या भक्तिभिक्षां स्वीकुर्वन्संचरन्सदा ॥ चरपट्टाधिकारी यः स एव चरजंगमः ॥ ३१ ॥

---

ट्कर्मांचा नाश करावा. ( २३ ) षडूर्मींना दूर करून व सहा प्रकारचा उन्माद नाहींसा करून षडक्षरमंत्राचा जप करावा आणि निरंजन ( उपाधिरहित ) व्हावें. ( २४ ) पंचाक्षर मंत्राचा जप करीत पांच प्रकारचा क्लेश उपटून टाकावा. सत्यज्ञानरूपी ऐश्वर्यानें मायेला फसवावें. ( २५ ) मलत्रयरूपी ( तीन प्रकारचा मळ हेंच झाड त्या ) झाडाला तोडून मदरूपी पर्वत फोडावा. अष्टपाशरूपी वेली छाटून सप्त व्यसनें नाहींशीं करावीं. ( २६ ) वीरमाहेश्वराच्या आचाररूपी संपत्तीचें कायावाचामनानें प्राणाप्रमाणें उत्तम रीतीनें रोज संरक्षण करावें. ( २७ ) शिवाचा महिमा ज्यांत सांगितला आहे अशा मुख्य आधारभूतशास्त्राचा अंगीकार करून त्याचाच सर्व शिष्यांना दररोज उपदेश करावा. ( २८ ) आणि त्या योगानें त्यांच्या अंतःकरणांतील मळ धुवून त्यांना शुद्ध करावें. त्यांना बरोबर घेऊन शुद्धभावानें सर्व देशांत फिरावें. ( २९ ) त्या त्या देशांतील मोठमोठ्या भक्तांनीं केलेल्या पूजेचा आनंदानें स्वीकार करून त्या महाजनांना पावन करावें. ( ३० ) कोणांला दर्शनानेंच, कोणांला त्यांनीं केलेल्या नमस्कारानें, व कोणांला हस्तस्पर्शानें या प्रमाणें शरण आलेल्या प्राण्यांना पावन करावें. ( ३१ ) या रीतीनें भक्तिभिक्षेचा अंगिकार करीत नेहमीं संचार करणारा जो चरपट्टाधिकारी तोच चरजंगम होय.

देव्युवाच

भो स्वामिन् करुणासिन्धो भवता भाषितं खलु ॥ चरपट्टाधिकारीति तत्कथं वद मे विभो ॥ ३२ ॥

ईश्वर उवाच

सत्यं सन्मतिके गौरि मयोक्तं नलिनेक्षणे ॥ वदामि शृणु संमोदाच्चरपट्टस्य लक्षणम् ॥ ३३ ॥ चरते निखिलान्देशान् रटत्यैशानभावकम् ॥ पठते स्वात्मनि परं चरपट्टं तदेव हि ॥ ३४ ॥ गुरुः स चरभक्तानां संमुखे सर्वसंमतम् ॥ ददाति यस्य शिष्यस्य स एव चरपट्टवान् ॥ ३५ ॥

देव्युवाच

स्वामिन्नेतन्महापट्टं दातव्यं कीदृशे यथा ॥ दातव्यं सर्वमेतस्य लक्षणं वद मे विभो ॥ ३६ ॥

ईश्वर उवाच

सम्यग्ज्ञानवति ख्याते सर्वचातुर्यवित्प्रिये ॥ वदामि तस्य सर्वं ते लक्षणं शृणु संमुदा ॥ ३७ ॥ कुष्ठिने पंगवेऽधाय कुब्जायात्यन्तकामिने ॥ श्रद्धाभक्तिविहीनाय दुर्मदाय दुरात्मने ॥ ३८ ॥ अनधीतात्मविद्याय परनिंदापराय च ॥ परस्त्रीपरवित्तादिपरिग्राहाद-

---

देवी ह्मणते, '(३२) हे स्वामिन्, हे दयासागरा, चरपट्टाधिकारी असें आपण ह्मटलें, तें कसें? तें, प्रभो, मला सांगावें.' ईश्वर ह्मणतात–'(३३) हे बुद्धिमति गौरि, मी खरें सांगितलें. हे कमळाक्षि, चरपट्टाचें लक्षण सांगतों, आनंदानें ऐक. (३४) सर्व देशांत फिरतो, ईश्वरावरील भावाविषयीं सांगतो ( ईश्वरावर भाव ठेवा असें सांगतो ) व अंतःकरणांत परमात्म्याचें स्मरण करितो, ह्मणून त्याला चरपट्ट ह्मणतात. ( ३५ ) जंगमांच्या व भक्तांच्या समक्ष सगळ्यांच्या अनुमतीनें गुरु ज्या शिष्याला चरपट्ट देतो तोच चरपट्टाचा अधिकारी होय.' देवी ह्मणते, '( ३६ ) नाथा, हें चरपट्ट कोणत्या प्रकारच्या शिष्याला द्यावें व कशा रीतीनें द्यावें, तें सगळें लक्षण हे विभो, मला सांगावें.' ईश्वर ह्मणतात. '( ३७ ) हे कीर्तिमति, तुजमध्यें खरें ज्ञान वसतें. तूं सर्व चातुर्य जाणतेस. प्रिये, तीं सर्व लक्षणें तुला आनंदानें सांगतों, ऐक. ( ३८ ) जो कुष्ठरोगी, पंगु, आंधळा, कुबडा, अतिशय कामी, भावभक्तिहीन, मदोन्मत्त, दुष्ट, ( ३९ ) आत्मविद्या न जाणणारा, दुसऱ्याची निंदा करणारा, परस्त्री, परधन इत्यादि परिग्रहाचें ग्रहण करणारा,

राय च ॥ ३९ ॥ व्रतभ्रष्टाय सत्कार्यकृतविघ्नाय दुर्हृदे ॥ दुर्दोषाहितचित्ताय दुराचारपराय च ॥ ४० ॥ कृतघ्नाय गुरुद्रोहकृतचित्ताय सर्वथा ॥ न देयं ज्ञानहीनाय चरपट्टं वरानने ॥ ४१ ॥ दमितेंद्रियवर्गाय सत्याचारपराय च ॥ निरहंकारिणे सत्यवचसे शुध्दचेतसे ॥ ४२ ॥ शिवानुभावसच्छास्त्रकथनात्ताधिकारिणे ॥ पुरातनीयसन्मार्गनिरताय सदात्मने ॥ ४३ ॥ कुलीनाय सदालिंगजंगमार्चापराय च ॥ परद्रव्यावलामुख्यग्रहणेऽनात्तचेतसे ॥ ४४ ॥ नखनेत्रादिसर्वांगेष्वक्षताय च धीमते ॥ श्रध्दाभक्तिमते सम्यग्देयं तत्कमलानने ॥ ४५ ॥ अस्मै तदेव दातव्यमित्यास्था स्याद्गुरोरपि ॥ शुध्दाचारवतां भक्तमाहेशानां समाज्ञया ॥ ४६ ॥ देयं तद्गुरुणा तस्मै भक्तमाहेशसंमुखे ॥ तत्संमतः स हि नचेन्न देयं गुरुणा हठात् ॥ ४७ ॥ आत्मीयाखिलशिष्याणां भक्तमाहेशसंसदाम् ॥ यः संमतो भवेत्तस्मै देयं तद्गुरुणा शिवे ॥ ४८ ॥ प्रापंचिकव-

---

( ४० ) व्रतभ्रष्ट, सत्कार्यांत विघ्न करणारा, दुष्ट अंतःकरणाचा, पापबुद्धीचा, दुराचारानें वागणारा, ( ४१ ) कृतघ्न किंवा मनानें गुरुद्रोह करणारा असेल, व जो ज्ञानहीन असेल, त्याला, हे सुंदरि, चरपट्टाधिकार देऊं नये. ( ४२ ) ज्यानें सगळीं इंद्रियें ताब्यांत ठेविलीं आहेत, जो सदाचारानें वागतो, जो निगर्वी, सत्यवचनी, व शुद्ध मनाचा आहे ( ४३ ) ज्यानें शिवाचें माहात्म्य व शैवशास्त्रें सांगण्याचा अधिकार संपादिला आहे, प्राचीन अशा उत्तम मार्गानें जो चालतो, जो निर्मलांतःकरणाचा, ( ४४ ) कुलीन, लिंग जंगमांची सेवा करण्यांत नेहमीं तत्पर, परद्रव्य, परस्त्री इत्यादिकांचें ग्रहण करण्यांत चित्त न ठेवणारा, ( ४५ ) नख नेत्र इत्यादि कोणत्याही अवयवांत ज्याला व्यंग नाहीं असा, जो बुद्धिमान् आणि भावभक्तियुक्त असेल, त्यालाच, हे कमलमुखि, हें चरपट्ट उत्तम रीतीनें द्यावें. ( ४६ ) अमक्याला हें चरपट्ट द्यावें असें गुरूनें ठरविल्यानंतर सदाचारी अशा भक्त व माहेश्वरांच्या आज्ञेनें ( ४७ ) त्या भक्त व माहेश्वरांच्या समक्ष गुरूनें त्याला चरपट्ट द्यावें. तो ( ज्याला चरपट्ट द्यावयाचें असेल तो शिष्य ) जर त्यांना ( भक्त व माहेश्वर यांना ) मान्य नसेल, तर गुरूनें त्याला आपल्याच हेक्यानें चरपट्ट देऊं नये. ( ४८ ) पार्वति, आपल्या सर्व शिष्यांपैकीं जो भक्तमाहेश्वरांच्या सभेला पसंत पडेल, त्यालाच गुरूनें चरपट्ट द्यावें. ( ४९ ) प्राप्त होणाऱ्या अडचणी दूर करण्याकरितां ह्मणून प्रापंचिक मनुष्याप्रमाणें ( एखाद्याच्या

दागांतुकान्यबाधानिवृत्तये ॥ पत्रमांत्यं लिखित्वास्मै न देयाद्गुरुरीश्वरि ॥ ४९ ॥ दातव्यं गृहिभिः सर्वैः पार्थिवैः परभीतये ॥ आशाहीनैर्विरक्तैस्तन्न देयं न विभेत्तदा ॥ ५० ॥ एतच्छास्त्रं विचार्येत्थं भक्तमाहेशसंमुखे ॥ देयात्तं चरपट्टं हि गुरुः शिष्याय धीमते ॥ ५१ ॥ गुरौ लिंगैक्यतां यातेऽप्यदत्वा स्वाश्रमं तदा ॥ भक्तमाहेश्वराः सर्वे मिलितास्तदनंतरम् ॥ ५२ ॥ तदंतेवासिनिचये दृष्ट्वा तं ज्ञानिनं शुचिम् ॥ दापितव्यं तदा तस्मै चान्यपट्टाधिकारिणा ॥ ५३ ॥ शिवानुभावसच्छास्त्रपुस्तकादानपूर्वकम् ॥ गृहीत्वा गुरुणा पट्टं चरते स चरः स्मृतः ॥ ५४ ॥

## अथ परजंगमलक्षणम्

तृणं ब्रह्मा तृणं विष्णुस्तृणानींद्रादिदेवताः ॥ तृणान्यष्टौ महाभोगास्तृणान्यष्टौ विभूतयः ॥ ५५ ॥ सिद्धयोऽष्टौ तृणान्यन्ये भोगा अपि तृणोपमाः ॥ चतुर्विधपदान्येवं तृणानि त्रिजगंति च ॥ ५६ ॥ लोकस्थितावलामुख्यमहाभोगास्तृणानि वै ॥ स्वर्णालंकारमुख्यानि तृणानीति निराशया ॥ ५७ ॥ मत्वैतानि च वस्तूनि निरस्येतर-

---

नांवानें ) मृत्युपत्र करून त्याला चरपट्ट गुरूनें देऊं नये. ( ५० ) मृत्युपत्रानें अधिकार गृहस्थांनीं व शत्रूंच्या भयामुळें सर्व राजांनीं द्यावा. परंतु आशाहीन अशा विरक्तांनीं देऊं नये व भिऊंही नये. ( ५१ ) या शास्त्राचा याप्रमाणें विचार करून गुरूनें बुद्धिमान् शिष्याला भक्तमाहेश्वरांच्या समक्ष चरपट्ट द्यावें. ( ५२ ) आपला चरपट्टाधिकार ( कोणत्याही शिष्याला ) न देतां गुरु लिंगैक्य पावला तर ( गुरूनें देह ठेविला तर ) मग सर्व भक्तमाहेश्वरांनीं मिळून ( ५३ ) त्याच्या शिष्य समूहांतून ज्ञानी व पवित्र अशा शिष्याला निवडून दुसऱ्या पट्टाधिकाऱ्याकडून त्याला चरपट्ट देववावें. ( ५४ ) शिवमाहात्म्य ज्यांत आहे अशीं शास्त्राचीं ( शिवानुभव शास्त्राचीं ) पुस्तकें वगैरे गुरूकडून घेऊन त्याच्या गादीवर जो वसतो त्याला चर म्हणतात. परजंगम लक्षणः—( ५५ ) ब्रह्मा, विष्णु इंद्रादि देव, अष्ट महाभोग, अष्ट विभूति गवता प्रमाणें समजून ( ५६ ) अष्टसिद्धि, सर्व भोग, चार प्रकारची मुक्ति व त्रैलोक्य हें सर्व काडीमोल मानून ( ५७ ) जगांतील स्त्रीसुख वगैरे मोठ्या सुखांना तुच्छ मानून, सोन्याचे अलंकारादिक ही तुच्छ समजून निराशा ( ५८ ) या प्रत्येक वस्तूविषयीं वाळगून आणि दु-

संपदः ॥ यत्र यत्र स्पृहास्पर्शस्तत्र तत्रैव संचरन् ॥ ५८ ॥ श्रीखण्डपंकयोर्मल्लीसुमबर्बूरपुष्पयोः ॥ लोहकांचनयोरुग्रविषपीयूषयोरपि ॥ ५९ ॥ कुकुंदेऽपि च पिष्टे च शाखाशाल्यन्नयोरपि ॥ पयस्तूष्णीकयोर्दिव्यमंचलोष्ठाव्रतावनौ ॥ ६० ॥ कार्पासे पट्टवासे च गाजौ रत्ने च मौक्तिके ॥ क्षोणीभृद्बरयोर्लक्ष्मीवदकिंचनयोरपि ॥ ६१ ॥ गंगापल्वलयोः क्षेत्रे श्मशानेऽपि च दैवते ॥ मानुषे भाषणे मंत्रे सत्येऽसत्ये शुभेऽशुभे ॥ ६२ ॥ मृगद्विण्मेषयोः सर्पपृथुरोम्नोश्च सर्वदा ॥ सर्वत्रैकमतिं कृत्वा समदृष्टिं समक्षमाम् ॥ ६३ ॥ भवितव्यमिदं मह्यं भवितव्यमिदं न मे ॥ अकृत्वास्थामिति सदा भोग्येषु द्रव्यराशिषु ॥ ६४ ॥ सदा तृप्तिं समासाद्य सदानंदी भवन् स्वयम् ॥ स्वपाददर्शनादेव भक्तानां चान्यदेहिनाम् ॥ ६५ ॥ मृगपक्षिपतंगानां पश्वादीनां च जीविनाम् ॥ दत्वा मोक्षं विधींद्रादीन्सुरसंदोहदुर्लभाम् ॥ ६६ ॥ स्वपादतीर्थतस्तोयं तीर्थं कृत्वा चरेत्सदा ॥ निरंजनः सन् यो लोके स एव पर-

---

सऱ्या कोणत्याही संपत्तीकडे दुर्लक्ष्य करून जेथें जेथें आशेचा स्पर्शही राहणारा नाहीं, तेथें तेथेंच संचार करावा. ( ५९ ) चंदन आणि चिखल, जाईचें फूल आणि बाभळीचें फूल, लोखंड आणि सोनें जालीम विष आणि अमृत, ( ६० ) कुकुंद ( रांगोळी ज्यापासून तयार करतात तो धोंडा ) आणि पीठ, झाडपाला आणि शाल्यन्न ( पक्कान्न ), दूध आणि कण्हेरी, पलंगानें अच्छादिलेली जागा आणि ढेंकळांनीं आच्छादिलेली जागा, ( ६१ ) कापसाचें वस्त्र आणि रेशमी वस्त्र, कांच आणि रत्नें, मोतीं, राजा आणि भिक्षुक, श्रीमान् आणि दरिद्री, ( ६२ ) गंगा आणि डबकें, क्षेत्र आणि स्मशानभूमि, दैवत आणि मनुष्य, भाषण आणि मंत्र, सत्य आणि असत्य, शुभ आणि अशुभ, ( ६३ ) सिंह आणि बोकड, सर्प आणि मासा या सर्वांच्या ठिकाणीं नेहमीं सारखा भाव, सारखी दृष्टि आणि सारखी सहनशीलता ठेवावी. ( ६४ ) असुक माझें व्हावें असुक माझें होऊं नये अशा प्रकारची द्रव्याचर किंवा भोग्य वस्तूंवर आस्था ठेवूं नये. ( ६५ ) स्वतः नेहमीं संतुष्ट असावें आणि आनंदांत असावें. आपल्या पाउलांच्या दर्शनानेंच भक्तांना, दुसऱ्या मनुष्यांना ( ६६ ) मृग, पक्षी व किडे यांना पशू वगैरे जीवांना आणि ब्रह्मा, इंद्र इत्यादिकांना—अनेक देवांनाही दुर्लभ अशी—मुक्ति देत ( ६७ ) आपल्या पायाच्या तीर्थानें पाणीच तीर्थ करीत नेहमीं संचार करावा. ( याप्रमाणें ) जगांत जो निरंजन ( सर्व उपाधींपा-

जंगमः ॥ ६७ ॥ अयं साक्षात्परंब्रह्म ह्ययमेव निरंजनः ॥ अयमेव महायोगी ह्ययमेव सदात्मकः ॥ ६८ ॥ देहं धृत्वाऽपि निर्देही गुणवानपि निर्गुणः ॥ एतस्योत्कर्षतां वक्तुं ममाशक्यं महेश्वरि ॥ ६९ ॥ इति परजंगमलक्षणम् ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहे निराभारिस्थलस्थस्वयचरपरलक्षणकथनं नाम पंचदशप्रकरणं समाप्तम्

---

सून अलिप्त ) राहतो तोच परजंगम होय. ( ६८ ) हा साक्षात् परब्रह्मच होय हाच निरंजन, हाच महायोगी आणि हाच सत्पुरुष होय. ( ६९ ) हा देहधारी असूनही देहरहित आणि गुणयुक्त असूनही गुणांपासून वेगळा आहे.' देवि, याचें माहात्म्य सांगणें मला अशक्य आहे.' येथें परजंगमलक्षण संपलें.

याप्रमाणें श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहांतील निराभारिस्थलांतील स्वयजंगम चरजंगम आणि परजंगमलक्षणकथन नांवाचें पंधरावें प्रकरण संपलें.

## ॥ इति श्रीमद्वीरशैवसदाचारसंग्रहः समाप्तः ॥



---

सोलापूरः— "श्रीदत्तप्रसाद" छापखान्यांत छापिला.

|| श्रीशिवाय नमः ||



# पंचाचार्यपंचमोत्पत्तिक्रमवर्णन.

वीरशैवलिंगिब्राह्मणांना आपलें सूत्र, गोत्र, शाखा, प्रवर वगैरे समजणें अवश्यक आहे. ह्मणून, *सुप्रबोधागमांत श्रीपरमेश्वराचीं पांच मुखें **सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष** व **ईशान** यापासून **रेवणाराध्य, मरुळाराध्य, एकोरामाराध्य, पंडिताराध्य,** आणि **विश्वाराध्य** हे पांचजण आचार्य अनुक्रमें उत्पन्न झाले. त्यांची जन्मभूमि, सिंहासनाधिपत्यस्थानें, त्यांचीं गोत्रें, त्यांचीं महासूत्रें, प्रवर, शाखा, कलशांचे धातु, त्यांचीं तत्वें, बीजमंत्र (बीजाक्षर), व प्रत्येक महासूत्राचीं उपसूत्रें सांगितलीं आहेत. त्याचप्रमाणें पंचवक्र गणाधीश्वराचीं पांच मुखें **सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष, ईशान** यापासून अनुक्रमें **मखारि, कालारि, पुरारि, स्मरारि, वेदारि** हे मुख्यपंचम उत्पन्न झाले. त्यांचे गुरु, त्यांचीं गोत्रें, सूत्रें, प्रवर, शाखा वगैरे क्रमवार माहिती सांगितली आहे ती ज्याची त्यास समजावी यासाठीं पुढील पृष्ठावर दिली आहे.

---

*पाशुपत तंत्र वगैरे ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, सद्योजातमुखापासून मरुळाराध्य, वामदेव मुखापासून एकोरामाराध्य, अघोरमुखापासून रेवणाराध्य, तत्पुरुषमुखापासून पंडिताराध्य, आणि ईशानमुखापासून विश्वाराध्य, उत्पन्न झाले. आह्मांस तर सुप्रबोधागमावरून, पंचतत्वावरून व पंचप्रणवांवरून ( मंत्रावरून ) असें दिसतें कीं, सद्योजातमुखापासून रेवणाराध्य व वा[illegible]पासून मरुळाराध्य, अघोरमुखापासून एकोरामाराध्य, तत्पुरुषमुखापासू[illegible]राध्य आणि ईशानमुखापासून विश्वाराध्य उत्पन्न झाले हेंच खरें आहे.

हसस्कंद
ग्रमुखस्कंद
त्र वगैरे त्या

| परमेश्वराचीं पांच मुखें. | सद्योजात. | वामदेव. | अघोर. | तत्पुरुष. | ईशान. |
|---|---|---|---|---|---|
| पंचाचार्यांचीं नांवें. | रेवणाराध्य. | मरुळाराध्य. | एकोरामाराध्य. | पंडिताराध्य. | विश्वाराध्य. |
| त्यांची जन्मभूमि. | कोल्लिपाकी क्षेत्रांत सोमेश लिंगापासून जन्म. | वटक्षेत्रांत सिद्धेश लिंगापासून जन्म. | धातुकुंड क्षेत्रांत श्रीमल्लिकार्जुन लिंगापासूनजन्म | द्राक्षाराम क्षेत्रांत रामनाथ लिंगापासून जन्म. | काशी क्षेत्रांत विश्वेश्वर लिंगापासून जन्म. |
| सिंहासनाधिपत्यस्थानें. | रंभापुरी (बाळी हळ्ळी) | उज्जयनीपुरी | श्रीशैलपर्वत | हिमवत्केदार | कोल्लिपाकी ( काशी ) |
| त्यांचीं गोत्रें. | वीर. | नंदि. | वृषभ. | भृंगि. | स्कन्द |
| त्यांचें सूत्र. | पडविडि. | वृष्टि. | मुक्तागुच्छ. | लंवन. | पंचवर्ण |
| त्यांचे प्रवर. | वीरशैव. | वीरशैव. | वीरशैव. | वीरशैव. | वीरशैव |
| त्यांच्याशाखा | ऋग्वेद. | यजुर्वेद. | सामवेद. | अथर्वणवेद. | अजपवेद |
| कलशांचे धातु. | सोनें. | रुपें. | तांवे. | लोखंड. | शिसें |
| त्यांचें तत्व. | पृथ्वी. | अप् | तेज. | वायु. | आकाश |
| त्यांचे वीजमंत्र (वीजाक्षर) | नकार. | मकार. | शिकार. | वाकार. | यकार |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ांचीं उपसूत्रें. | १ | पुराण | लोहकंथा | गोणीकंथा | त्रिपुटी | पंचवर्ण |
| | २ | पच्छकंथा | स्वर्णकंथा | दंती | रज्जु | कंवाल |
| | ३ | षडंग | शृंगी | जठर | कंथा | वृषभ |
| | ४ | सुरगि | मसणी | त्रिगुण | भस्मी | दशवक्त्र |
| | ५ | महिषी | कुठार | केशकंथा | शिखरी | जरत्कंथा |
| | ६ | दिगंवर | भैत्री | ललाट | रौप्यक | पंचमुख |
| | ७ | वेणी | कठार | व्याघ्रकंथा | चंद्रगुंड | गुहाग्र |
| | ८ | भित्ति | चामरी | लोचन | मृत्कंथा | गोचर |
| | ९ | मोरट | कवाट | भगिनी | काष्ठक | गगन |
| | [illegible] | नाटी | कुक्षकंथा | जालकंथा | पवन | मुसली |
| | [illegible] | शौरी | ज्वलत्कंथा | नटन | रामगिरि | लगुड |
| | [illegible] | मुसडी | सिंही | बदडि | खड्गी | शिथिली |

| पंचवक्त्र गणाधीश्वरांचीं पांच मुखें. | सद्योजात | वामदेव | अघोर | तत्पुरुष | ईशान |
|---|---|---|---|---|---|
| मुख्य पंचमांचीं नांवें. | मखारि | कालारि | पुरारि | स्मरारि | वेदारि |
| पंचमांचे गुरु. | रेवणाराध्य. | मरुळाराध्य | एकोरामारा॰ | पंडिताराध्य | विश्वाराध्य |
| पंचमांचीं गोत्रें | वीर | नंदि | वृषभ | भृंगि | स्कन्द |
| पंचमांचीं सूत्रें | पडिविडि | वृष्टि | मुक्तागुच्छ | लंवन | पंचवर्ण |
| पंचमांचे प्रवर | वीरशैव | वीरशैव | वीरशैव | वीरशैव | वीरशैव |
| पंच. शाखा. | ऋग्वेद | यजुर्वेद | सामवेद | अथर्वणवेद | अजपवेद |
| पंचमांचे कलशांचे धातु. | सोनें | रुपें | तांवें | लोखंड | शिसें |
| पंचमांची तत्वें | पृथ्वी | आप् | तेज | वायु | आकाश |
| त्यांचे वीजमंत्र (वीजाक्षर) | नकार | मकार | शिकार | वाकार | यकार |
| पंचमांचे उपपंचम १ | शतांग | केशराक्ष. | अभियुक्त | सहस्रशीर्ष | पश्चाद्दक् |
| २ | प्रमुख | मृगारि | हारीत | पीतांग | विश्वपुष्ट |
| ३ | शर्कर | नाकेश | जावाल | नगमाल | गोमुख |
| ४ | वृषभ | वृषण | निर्जर | निराशन | गिरिवक्त्र |
| ५ | सहस्राक्ष | शिलांग | निशित | यमद्युति | सुवर्णनखर |
| ६ | धर्म | शृंगशीर्ष | शशांक | सप्तांग | अजांघ्रि |
| ७ | विषम | नीलांवर | ललाटाक्ष | लतांग | दशानन |
| ८ | मोचक | कुहासन | कराक्षक | मृत्युनाशन | विषानन |
| ९ | वृकभेदी | शतवाहु | पादास्य | अतनु | उग्रदेह |
| १० | कुंजरारि | वहुजिव्ह | विकटांग | घोटवक्त्र | शतपद |
| ११ | शेष | नागदंत | शिलींद | नीरोग | सहस्रस्कंद |
| १२ | शिखिहरित | षणावपु | हस्तिमुख | भव | त्रिमुखस्कंद |

* पंचमांच्या गुरूंचे जें सूत्र, गोत्र वगैरे आहे तेंच सूत्र, गोत्र वगैरे त्या पंचमांपासून उत्पन्न झालेल्या उपपंचमांचें आहे असें समजावें.

## विक्रीस तयार.

| | | |
|---|---|---|
| १. | शिवपरअभंग. ... ... ... ... ... | ८७. |
| २. | शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी भाग १ ला. ... ... | ८५. |
| ३. | ,, भाग २ रा. ... ... | ८५. |
| ४. | ,, भाग ३ रा. ... ... | ८४. |
| ५. | मराठी सिद्धरामेश्वर चरित्र. ... ... ... | ८७ |



